# नवभारत ग्रंथमालेचीं
## लवकरच प्रसिद्ध होणारीं पुस्तकें

### राजपुतांचा इतिहास
**लेखक—श्री. हरिहर वामन देशपांडे.**

'राजपूत सस्कृति' हा ग्रथ जे वाचतील त्यास श्री हरिहरराव देशपाडे याची या विषयावर लिहिण्याची योग्यता कशी अनन्यसाधारण आहे याची कल्पना येईल राजपुताचा अद्भुत व स्फूर्तिदायक इतिहास एखाद्या कादबरीतील प्रकरणाप्रमाणे या पुस्तकात सागितला असल्यामुळे हे पुस्तक प्रस्तुत पुस्तकापेक्षाही अधिकच मनोरजक व उद्बोधक झाले आहे

### रसायनांतील क्रान्ति
**लेखक—प्रो. वा. वि भागवत**

वास्तव व रसायन या शास्त्रावरील प्रो भागवत याचे लेख ज्यानी वाचले आहेत त्यास हा ग्रथ किती नवलपूर्ण व उद्बोधक होईल हे सागावयास नको ज्या शास्त्राच्या प्रगतीमुळे इतर जड वस्तूच काय परतु चालता बोलता मनुष्य देखील आम्ही रासायनिक सयोगाने निर्माण करू अशी धमक शास्त्रज्ञास वाटू लागली त्या शास्त्राचा अद्भुतरम्य इतिहास या ग्रथात निवेदन केलेला आहे

### महानुभाव पंथ
**लेखक—श्री नलिकंठ बळवंत भवाळकर व हरि नारायण नेने**

वाङमयाचे व समाजस्थितीचे जुन्या पिढीतील मार्मिक व बहुश्रुत विवेचक या नात्याने श्री भवाळकर याचे नाव पूर्वीपासूनच साहित्यक्षेत्रात ख्यात होतें त्यात महानुभाव वाङमयाचे सशोधक व अभ्यासक या नात्याने त्यानी मिळविलेल्या ख्यातीची अधिकच भर पडली आहे श्री नेने याची विषयाच्या रहस्याचा ठाव घेणारी चिकाटीची अभ्यासू वृत्ति आजपर्यंत पुष्कळच निबधाच्या द्वारे प्रकट झाली आहे अशा या सशोधकाच्या जोडीने लिहिलेला महानुभाव पथाचे सर्वांगपरिपूर्ण विवेचन करणारा हा ग्रथ महानुभाव पथावर झालेल्या सर्व लिखाणामध्ये श्रेष्ठ ठरेल हे कोणास सागावयास नको

# राजपूत संस्कृति

## ( विधायक समालोचना )

लेखक

वैद्य हरिहर वामन देशपांडे

वाङ्मयविशारद

सुविचार प्रकाशन मंडळ, लिमिटेड.

शके १८५८ ] नागपूर व पुणें [ सन १९३६

# किंचित प्रास्ताविकम्

प्रस्तुत ग्रथ हा, अमरावतीच्या श्रीहनुमान व्यायाम प्रसारक मडळाचे माजी अध्यक्ष परमपूज्य गु डॉक्टर शिवाजी गणेश पटवर्धन यान्याच केवळ अखड स्फूर्तीचे व कृपाप्रसादाचे फळ होय त्याच्यासारख्या प्रभावी व्यक्तीचा अकुश अहोरात्र मागे नसता तर अभावितपणे व अगदीच अमकल्पित ठिकाणी ह्या विषयाचा अभ्यासही माझ्याच्याने झाला नसता, मग ग्रथनिष्पत्ति तर लाबच ! ह्यातील साऱ्या उद्बोधक व विचारप्रवर्तक कल्पना डॉ शिवाजीराव पटवर्धन ह्याच्या व माझे शिवणी कारागृहातील मित्र, जबलपूर म्युनिसिपल कमिटीचे माजी अध्यक्ष व लेजिस्लेटिव्ह असेब्लीचे माजी सदस्य प द्वारकाप्रसाद मिश्र ह्याच्या होत ही गोष्ट कृतज्ञतापूर्वक नमूद करून ठेवणे भाग आहे

गु वीर वामनराव जोशी, गु प्रो श्रीकृष्ण नीलकठ चापेकर, मि रा सा. रघुनाथ दत्तात्रय सरजामे, मि सीताराम तात्याजी पुराणिक, प्रो श्रीनिवास नारायण बनहट्टी, वैद्यभूषण पुरुषोत्तम सखाराम हिर्लेकर शास्त्री इत्यादि सुहृज्जनानाच ह्या ग्रथातील चागलेपणाचा वाटा मिळाला पाहिजे कारण त्यानी ग्रथाची हस्तलिखित प्रत वाचून पाहिली व अनेक महत्त्वपूर्ण सूचना केल्या तसेच लोकनायक माधव श्रीहरि अणे, श्री यशवत खुशाल देशपाडे, श्री पुरुषोत्तम यशवत देशपाडे, श्री बाळकृष्ण गणेश खापर्डे, डॉ लक्ष्मणराव कोकर्डेकर, श्री नारायणराव बामणगावकर, श्री उमेदसिंह ठाकूर व श्री दाजीसाहेब बेदरकर याच्या आत्यतिक उत्तेजनामुळे व प्रो शालीनदत्त शिदोरे व श्री रघुनाथराव सरजामे यानी स्वत आपली शिफारसपूर्वक मध्यस्थी नवभारत ग्रथमालेच्या चालकापाशी केल्यामुळेच प्रस्तुत ग्रथ प्रसिद्ध होण्याचा हा सुयोग येत आहे ग्रथ उत्कृष्ट स्वरूपाने प्रकाशनात आणण्याचे सर्व श्रेय मालेचे सपादक प्रो

बनहट्टी व सुविचार प्रकाशन मडळाचे चालक श्री बलकुदी व श्री पा. ना बनहट्टी यानाच आहे ते मी न दिले तरी सुज्ञ वाचक देणारच ! त्यानी माझ्यासारख्या नवख्या ग्रथकाराला इतक्या आपुलकीने वागविले ह्याबद्दल त्याचे किती आभार मानावेत ! आणि आभार मानावे कोणाचे व सोडावे तरी कोणाला ? कारण ग्रथलेखनास आवश्यक ते वाचन सुरू केल्यापासून तो ग्रथ प्रस्तुत स्वरूपात बाहेर पडेपर्यंत अनेक आप्तेष्टानी नानाप्रकारे मला साहाय्य केलेले आहे सरतेशेवटी माझे मित्र आणि आमच्या भारत आयुर्वेद विद्यालयातील विद्यार्थी श्री गोविद बाळकृष्ण तळणीकर, बी ए, यानी सूची तयार करण्याच्या कामी मला जे साहाय्य केले त्याबद्दल त्याचा आभारपूर्वक उल्लेख करून ही नामावलि नाइलाजाने येथेच पुरी करितो

अखेरीस

तेजो यत्ते रूप कल्याणतम तत्ते पश्यामि ।
योऽसावसौ पुरुष सोऽहमस्मि ।

ह्या ईशावास्य श्रुतीतील वचनाप्रमाणे प्रत्येकाने परमेश्वराचे कल्याणप्रद असे तेजोरूप पाहण्याचा व तदाकार बनण्याचा प्रयत्न करावा अशी प्रार्थना करून हे 'किंचित् प्रास्ताविक' पुरे करितो

ॐ शाति शाति शाति.

**हरिहर वामन देशपांडे**



"राजस्थानची सद्य स्थिति—सामाजिक दिग्दर्शन" हे परिशिष्ट श्री. दि ब गडकरी, एम् ए. यानी लिहून दिले याबद्दल आम्ही त्याचे आभारी आहो

**प्रकाशक**

# आधारभूत ग्रंथ


१ रा ब गौरीशकर ओझा राजपूताने का इतिहास, खड १, २ ३.
२. कुलपति चि वि वैद्य मध्ययुगीन भारत, भाग १, २ व ३.
३ श्री गो स सरदेसाई मराठी रियासती
४. कै वि का राजवाडे ऐतिहासिक प्रस्तावना
५. डॉ श्री व्य. केतकर ज्ञानकोश
६ प्रो इद्र मोगल साम्राज्य का इतिहास
७ हिंदी कविता कौमुदी
८ मिश्रबधु हिंदी नवरत्न
९ आल्हा काव्य
१० श्री जगदीशचद्र गुहिलोत मारवाड का इतिहास
११ प्रो श द जावडेकर राजकारणशास्त्रपरिचय
१२. श्री न चि. केळकर · राज्यशास्त्र
13. Dr. Balkrishana *Shivaji the Great*
14. Col. Todd : *Annals and Antiquities of Rajasthan*
15 William Irwine *Later Mughals*
16 Harwilas Sarada *Hindu Superiority*
17. Sir John Woodroffe *Is India Civilised ?*
18 Henry Sidgwick *Elements of Politics*




# अनुक्रमणिका







# राजपूत संस्कृति
## ( विधायक समालोचना )



### प्रकरण पहिलें
## धर्मसंस्था व त्यांचे परिणाम

१. **प्राचीन परंपरा.** वास्तविक पाहता राजपूत हे प्रथम पंच-नदात, ब्रह्मावर्तात आणि सौराष्ट्रात राहणारे आर्य असून परकीय आक्रमणामुळे त्यानी तेथून निघून राजपुतान्यासारख्या बिकट प्रदेशाचा आश्रय केलेला आहे आर्यांच्या संस्कृतीचा पूर्ण विकास गंगायमुनांच्या तटाकी प्रथम झाला व तेथून ती सर्व भरतखंडभर पसरली इतकेच नव्हे, तर बऱ्याच पौरस्त्य व ग्रीनसारख्या पाश्चिमात्य विद्वानाच्याही मते गंगेच्या पवित्र सान्निध्यात उगम पावलेल्या आर्यसंस्कृतीचा केवळ भरत-वर्षातच नव्हे तर विद्यमान जगतातील बहुतेक भागात प्रसार झालेला होता परंतु ग्रीक, शाक, कनिष्क, तुरुष्क, इत्यादि पश्चिमेकडून येणाऱ्या प्रबळ आक्रमणकारी लोकानी जेव्हा प्रथम पंजाब व नंतर गंगातटाकीचे प्रदेश आणि सौराष्ट्र काबीज केले तेव्हा तेथील स्वातंत्र्यभिमानी आर्यांनी तेथून अन्य सुरक्षित ठिकाणी जाऊन वसति करण्याचे ठरविले, आणि ज्या ज्या ठिकाणी अशा तऱ्हेने आर्यलोक गेले त्या त्या ठिकाणी गंगा-

तटाकी उगम पावलेली आर्यांची सस्कृति, धर्म, ज्ञान, मस्था, कला व वैभवेच्छा इत्यादि सर्व गोष्टी त्याच्याबरोबर गेल्या गगातटाकाहून अथवा सौराष्ट्रातून प्रबळ विधर्मी शत्रूच्या आक्रमणामुळे अन्यत्र निर्वासन करू इच्छिणाऱ्या आर्यांना नजीकच अरवलीच्या दुर्लघनीय अद्रिराजीनी सरक्षित अशी राजस्थानची भूमि आढळून आली राजस्थानचा भूभाग काही बाजूनी पर्वत तर काही बाजूनी घोर वालुकामय प्रदेश यानी आवृत असा असल्याकारणाने तो त्यानी अधिक पसत केला, व म्हणूनच उत्तर भारतात हस्तिनापूर अथवा कनौजची मोठमोठाली साम्राज्ये नाश पावल्यानतर, अथवा सौराष्ट्रातील वल्लभी अथवा सिधुदेश यासारखी मोठमोठाली राज्ये लयास गेल्यानतर राजस्थानातच बहुतेक हिदु राज्याचा उदय झालेला आहे विशेपत, प्रारभी महमद बिन कासिम, नतर महमूद गजनी व अखेरीस शियाबुद्दीन घोरी याच्या पश्चिमेकडून झालेल्या आक्रमणानतर आणि सिधुदेश, सौराष्ट्र, हस्तिनापूर व कनौज येथील राज्ये त्यानी पादाक्रान्त केल्यानतर तेथील धर्माभिमानी, स्वसस्कृतिप्रिय व स्वतत्र प्रकृतीच्या लोकाना राजस्थानातच प्रथम सुरक्षित आश्रय मिळाला युरोपमध्ये कान्स्टान्टिनोपल येथे तुर्कांचे राज्य स्थापन झाल्यानतर ख्रिस्ती धर्म व सस्कृति याचे अभिमानी असे पडित, विद्वान्, शिलपज्ञ व कलावत तेथून निघून सर्व युरोपभर पसरले व त्यामुळेच एरव्ही अधकारात व अज्ञानात चाचपडत पडलेल्या युरोपात एकप्रकारच्या धार्मिक पुनरुज्जीवनाच्या व सस्कृतिप्रचाराच्या युगास प्रारभ झाला तद्वतच गगातटाकाहून निघालेल्या आर्यांनी राजस्थानात येऊन वसति केल्यानतरही आपला प्राचीन धर्म, सस्कृति, चालीरीति, सस्था, वाङमय, कला, ज्ञान इत्यादिकाचाच अनुकार केला ही गोष्ट लक्षात ठेऊनच एकदर राजस्थानच्या व त्याचे प्रतीकस्वरूप असलेल्या विशेषेकरून मेवाडच्या राजकीय, धार्मिक व सामाजिक इतिहासाकडे आपण पाहिले पाहिजे ह्यापैकी अन्य गोष्टीचे यथोचित स्थळी विवरण येईलच परतु प्रस्तुत प्रकरणात ज्याचा आपणाला विचार करावयाचा आहे त्या धर्मसस्थाच्या बाबतीतही राजपुतानी आपल्या पूर्वपरपरेस धरून पण परिस्थित्यनुसार इष्ट ते फेरफार करून वागण्याचे धोरण अवलबिले होते, ही गोष्ट प्रारभीच लक्षात ठेविली पाहिजे

**२. तत्कालीन परिस्थिति.** परतु आठव्या शतकानतर उदय पावणाऱ्या राजपूत राज्यातील धर्मसस्थाचा विचार करताना एकदर भरतवर्षातील तत्कालीन परिस्थितीवर सामान्य प्रकाश पाडल्याशिवाय राजपुताच्या विशिष्ट धर्मसस्थाचे महत्त्व व त्याचे राजकारणादिकावर झालेले परिणाम याचे मार्मिक ज्ञान होऊ शकणार नाही

ख्रिस्ती शकाच्या पूर्वी सहाशे वर्षे भरतखडात बौद्ध व जैन या धर्मांचा उदय झाला यज्ञयागादिकाच्या निमित्ताने हिदुधर्मात अतिरिक्त वाढलेल्या हिसावादास प्रतिबध घालण्याकरिता आणि चातुर्वर्ण्य अथवा जातिभेद यानी उत्पन्न झालेले सामाजिक उच्चनीच भाव व पृथक्करण नष्ट करून एक प्रकारचा समभाव व सघटन निर्माण करण्याकरिता म्हणून या धर्मांचा—अथवा कित्येक विद्वान् मानतात त्याप्रमाणे आर्य अथवा वैदिक धर्मातीलच ह्या पाखडवादी पथाचा—उदय झाला त्याननर सहाशेच वर्षांनी स्थूलत याच्या सारखीच मते प्रतिपादन करणाऱ्या ख्रिस्ती धर्माचा उदय होऊन अशा तऱ्हेने पश्चिमेस ख्रिस्ती व पूर्वेस जैन व बौद्ध या धर्मांचा सर्वत्र प्रसार झाला ख्रिस्ती शकापूर्वी सहाव्या शतकापासून तो ख्रिस्ती शकानतर सहाव्या शतकापर्यंत ह्या अहिसावादी धर्मांचा अटलाटिक महासागरापासून तो पासिफिक महासागरापर्यत प्रसार झाला होता असे म्हणण्यास हरकत नाही तिकडे युरोपखडात या काळातल्या युगास **कृष्णयुग** म्हणतात, तर त्याच काळातील हिदुस्थानातील युगास **सुवर्णयुग** असे म्हणतात युगाच्या नामाभिधानात हा असा केवढाही फरक असला तरी अहिसेच्या दृष्टीने दोहीकडे सारखाच परिणाम झालेला होता तिकडे ख्रिस्ती धर्मगुरु आपापल्या मठात एका सुईच्या अग्रावर किती देवदूत नृत्य करू शकतील यासारख्या प्रश्नाचा मोठ्या गभीरपणे खल करीत बसले होते, तर इकडील अशोक अथवा हर्षासारखे मोठमोठे सम्राट हत्तीना व घोड्याना देखील गाळून पाणी पाजण्यात यावे, नाही तर पाण्यातून त्याच्या पोटात जाणाऱ्या जतूचा नाश होऊन हिसा होईल, अशा आज्ञा राज्यभर प्रसृत करीत होते अशा तऱ्हेने पूर्वेस व पश्चिमेस सर्व वातावरण अहिसेने भरून गेले असताना तिला प्रतिक्रियास्वरूप अशा हिसाधर्माचा प्रचार करणारा व तरवारीने काफिराना मारून धर्मप्रसार करण्यासाठी

राज्यामागून राज्ये जिकत सुटणारा इस्लामी धर्म निर्माण झाला किबहुना तो निर्माण होणे अपरिहार्यच होते असे म्हटले तरी चालेल सातव्या शतकात निर्माण झालेल्या या कडव्या धर्माने थोडक्याच कालात पश्चिमेस मोठमोठाली साम्राज्ये स्थापून युरोपातही हातपाय पसरले आणि स्पेन व पोर्च्युगाल काबीज करण्यापर्यंत मजल मारली युरोपात इतक्या लाब स्पेनपर्यंत मजल मारणारे इस्लामचे कृपाणपाणि प्रचारक त्या मानाने पुष्कळच जवळ असलेल्या हिदुस्थानात न येणे कसे शक्य आहे? सातव्या शतकात स्थापन झालेल्या इस्लाम धर्माच्या प्रचारकानी हज्जाज, हरून अलरशीद व अल्मसूर यासारख्या महत्वाकाक्षी खलीफाच्या आज्ञावरून भूमि व जल उभयमार्गे भरतवर्षावर आक्रमण केले आठव्या शतकात महमद बिन् कासीमने स्वारी करून सिधुदेश काबीज केला, मुलतान जिकले व कनौजच्या प्रबळ राज्यावर आक्रमण करण्याचे मनसुबे बाधले त्याच काळात अजमीरच्या हिदु राजास मारून तेथे त्यानी इस्लामी राज्य स्थापन केले महमृद गजनीने अकराव्या शतकात अफगाणिस्थानच्या ब्राह्मण राजास ठार मारून तेथील हिदु पठाणाना इस्लामी धर्माची दीक्षा दिली आणि बाराव्या शतकाच्या अखेरीस शियाबुद्दीन घोरीने पृथ्वीराज चौहान व जयचद राठोड यास ठार मारून दिल्ली येथे प्रबळ इस्लामी सत्तेचे अधिष्ठान माडले सिंध–सौराष्ट्र–गुर्जर व पजाब–दिल्ली–कनौज येथे अशा तऱ्हेने महमदी राज्ये स्थापन झाली, त्या वेळी तेथील धार्मिक आर्यांनी राजस्थानात येऊन वसति केली हे पूर्वी सागितलेच आहे

**३ कुमारिलभट्ट व श्रीशंकराचार्य** अशा तऱ्हेने महमदी धर्म भारतात येऊन पोचण्याच्या बेतात असताना खुद्द हिदुस्थानात एका निराळ्याच घटनेस प्रारभ झालेला होता बौद्ध व जैन या धर्मांच्या विरुद्ध प्रतिक्रिया या काळात सुरू झाली व हिदुधर्माचे पुनरुज्जीवन करणारे व पाखडधर्मांच्या महत्त्वाचे समूळ उच्चाटन करणारे कुमारिलभट्ट व श्रीमदाद्यशकराचार्य हे दोन महापुरुष निर्माण झाले कुमारिलभट्टाने आपल्या अखडनीय प्रमाणानी बौद्धमताचा बीमोड केला व यज्ञयागादि-प्रधान अतएव पश्वादिकाची हिसा मान्य असणाऱ्या वैदिक धर्माचे मडन केले कुमारिलभट्टाच्या प्रखर तर्कपद्धतीपुढे बौद्धपडित व जैनपडित परास्त

झाले परतु त्या धर्माच्या त्याग व अहिसा या तत्त्वाची मुळे समाजात इतकी खोलवर रुजली होती की, त्यामुळे कुमारिलाने प्रवर्तित केलेल्या स्वर्गकाम अर्थात् रम्यभोग साध्य करणाऱ्या यज्ञयागादिप्रधान धर्माचा लोकानी मनोभावे स्वीकार केला नाही श्रीशकराचार्यांनी जनतेच्या मनोवृत्तीतले हे इगित बरोबर ओळखले होते, व म्हणूनच अहिसा व सन्यास या दोन तत्त्वाचा प्रामुख्याने अतर्भाव करणाऱ्या मोक्षकाम उत्तरमीमासाधर्माचे त्यानी प्रतिपादन केले त्यासरशी आसेतुहिमाचल सर्व लोकानी परत हिदुधर्माचा मोठ्या आनदाने स्वीकार केला तथापि त्यामुळे कुमारिलभट्टाच्या कामगिरीचे महत्त्व मुळीच कमी होत नाही फार काय पण 'शाकरदिग्विजया'त सुद्धा—

**श्रुत्यर्थधर्मविमुखान्सुगतान्निहन्तुं**
**जातं गुहं भुवि भवन्तमहं नु जाने ॥**

म्हणजे "वेदाचा विरोध करणाऱ्या बौद्धाना परास्त करणारा तू प्रत्यक्ष गुह म्हणजे कार्तिकस्वामी आहेस असे मला वाटते" आणि—

**कुमारिलमृगेंद्रेण हतेषु जिनहस्तिषु ।**
**निष्प्रत्यूहमवर्धन्त श्रुतिशाखाः समंततः ॥**

म्हणजे "कुमारिलरूपी सिहाने जैनपडितरूपी हत्तीना जिकिल्यावर वेदवेदागाचा अप्रतिहत प्रचार झाला," अशी कुमारिलभट्टाची प्रशसा केली आहे

श्रीशकराचार्यांनी केलेली दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे विविध देवताची पूजा करणाऱ्या लोकाच्या पूजाविधीचा समन्वय करून त्यानी 'पचायतनपूजा' स्थापन केली विष्णु, महादेव, गणपति, देवी व सूर्य ह्या पाच देवताचो पूजा तत्कालीन समाजात प्रामुख्याने प्रचलित असून त्याच्या भक्तामध्ये वादविवाद व असहिष्णुताजन्य युद्धे सुरू होती श्रीशकराचार्यांनी त्याच्या ठिकाणी ह्या पचायतनपूजेच्या द्वारा सहिष्णुवृत्ति निर्माण करून हिदुधर्मातील ह्या परस्परात विवदमान मताचे सघटन निर्माण केले मुसलमानाचे हिदुस्थानावर आक्रमण झाले तेव्हा कुमारिलभट्ट व श्रीशकराचार्य ह्याच्या कर्तृत्वाने हिदुधर्माची पुनश्च प्रतिष्ठापना होऊ

लागली असून बौद्ध व जैन याचे महत्त्व कमी होऊ लागले होते मुसलमानाच्या आक्रमणानी त्रस्त झालेल्या हिंदूनी जेव्हा राजस्थानाचा आश्रय केला, तेव्हा वरील पाचही देवताची पूजा त्यानी आपल्याबरोबर नेली

पुढे पुढे मुसलमानाच्या धागर्डधिग्यापुढे शाततािप्रय जैन व बौद्ध धर्मीयाना सुद्धा टिकाव धरणे अशक्य झाले व अखेरीस त्याच्यापैकी सहस्रावधि लोकानीही राजस्थानचा सुरक्षितपणा जाणून त्याचाच आश्रय घेतला पर्शियनाच्या आक्रमणामुळे वल्लभीचा नाश झाल्यानतर तेथील तीस हजार कुटुबानी आपापल्या पुरोहिताबरोबर राजस्थानात निर्वासन केले त्या वेळी सौराष्ट्रात व विशेषत वल्लभीच्या राज्यात जैनाचे अत्यधिक महत्त्व असल्याने आणि वल्लभीच्या राजाप्रमाणेच अनेक मोठमोठी कुटुबेही वैदिक धर्मानुयायी असूनही जैन पुरोहिताच्या वजनाखाली राहत असल्याकारणाने ज्या पुरोहितानी ह्या तीस सहस्र कुटुबाना बल्लभीहून निर्वासित करून राजस्थानात आणले त्यात बरेचसे जैन पुरोहित असले पाहिजेत हे उघड आहे अशा तऱ्हेने हिदु व जैन या उभयधर्मीय लोकानी राजस्थामात आश्रय घेतला होता हे स्पष्ट दिसते विशेषत राजस्थानातले पहिले उदयोन्मुख व महत्त्वाचे राष्ट्र जे मेवाड त्याच्या गादीवर असणाऱ्या वल्लभीच्याच आदित्य परपरेतील राजाचा त्यानी आश्रय सपादन केला

४. **पंचायतन पूजा.** खुद्द मेवाडचे राणे हे आपणास आदित्य वशीय म्हणवीत असल्याकारणाने मूळचे सूर्योपासक होते ह्या सूर्योपासनेचेच दर्शक म्हणून त्यानी आपल्या राष्ट्रीय ध्वजावर प्रभातकालच्या स्फुरण पावणाऱ्या उषेमुळे रक्तवर्ण झालेल्या पार्श्वभूमीवर बालसूर्याचा उदय अकित करून ठेविला आहे परतु त्याचा मूळ सस्थापक जो बाप्पा रावळ उर्फ बाप्पादित्य ह्याने हारीत मुनीजवळ शकराची उपासना ग्रहण केली होती, व भगवान एकलिंगजीचा दिवाण ह्या नात्यानेच तो व त्याचे सर्व वशज मेवाडचा राज्यशकट हाकीत आले आहेत देवीचीही उपासना बाप्पादित्यानेच स्वीकारली होती सौराष्ट्रातील ज्या राजकुमारीबरोबर त्याने विवाह केला होता तिच्या कुलदेवतेची–व्यानमातेची–मूर्ति तेथून चितोडास आणून त्याने तिची प्रस्थापना केली होती, हीच व्यानमाता चितोडास राज्य करणाऱ्या सर्व राजपुरुषाची कुलदेवता सम-

जण्यात येऊ लागली तथापि भगवान् एकलिंगजीची उपासना सर्व राजपूत समाजाची सामान्यत , व मेवाडच्या अधिपतींची विशेषत , प्रधान उपासना होय शिवोपासकाप्रमाणेच राजपुतामध्ये देवीच्या उपासकाचाही एक मोठा वर्ग होता व आहे

औरगजेबाने आपल्या मदिरे पाडण्याच्या मोहिमेत जेव्हा मथुरेकडे मोर्चा वळविला तेव्हा तेथील भगवान् श्रीकृष्णाच्या उर्फ कन्हय्याच्या मदिराच्या पुजाऱ्यानी त्या वेळचा मेवाडचा राणा राजसिंह ह्याजवळच आश्रय मागितला, व त्यानेही औरगजेबाविरुद्ध हिम्मत धरून त्याना मोठ्या आनदाने आश्रय दिला राजसिंहाने आपली सेना पाठवून मथुरेहून कृष्ण–कन्हय्याची मूर्ति मेवाडात आणविली व उदयपुराहून वीस मैलावर असलेल्या नाथद्वारा येथे तिची प्रतिष्ठापना करविली अशा तऱ्हेने आगतुक आलेल्या ह्या देवतेचेही मेवाडातच नव्हे तर उभ्या राजस्थानात मोठ्या प्रचड प्रमाणात स्वागत होऊन तिचीही उपासना सर्वत्र सुरू झाली एवच शिव, देवी व कृष्ण याच्या उपासनेकरिता राजस्थानात अनेक मदिरे निर्माण होऊन हिदुधर्मसस्था रूढ झाल्या सूर्य आणि गणपति ह्याच्याही उपासना वरील तीनही देवताच्या उपासनेप्रमाणेच सुरू झाल्या होत्या ह्याप्रमाणे ही पचायतन पूजा राजस्थानात उभारली गेली हिंदु धर्मसस्थाच्या बरोबरच स्वराष्ट्रात आश्रयार्थ आलेल्या जैनश्रावकाना राजपूत राजानी उदारबुद्धीने आश्रय दिला व त्याच्या नेमिनाथ, पारसनाथ, आदिनाथ इत्यादि देवाची मोठमोठी देवालये बाधली जाऊन जैन धर्मसस्थाही रूढ झाल्या

५ **रुद्रस्वरूपाचा बोध.** शकराचे सर्व पुजारी गोसावी आहेत त्यानी आजन्म अविवाहित राहून व इद्रियनिग्रह करून आपल्या देवतेचें आराधन केले पाहिजे असा नियम आहे शकर ही देवता रुद्र, युद्धप्रिय, अज्ञान जीवाचा उद्धार करणारी व मादक औषधि, वनस्पति व पेये सेवन करणारी असल्याकारणाने तिच्या पुजाऱ्यातही ह्या सवयीचा व गुणाचा सचार झाला असल्यास काही नवल नाही गोसाव्याच्या सगतीने अन्य शिवभक्त राजपुतातही अफू, भाग, गाजा ह्यासारख्या मादक वल्लीचा अतिरिक्त प्रचार झाला शाक्तपथाची उपास्य देवता जी जगन्माता ती तर

बोलून चालून रणरणकदायिनी चडी ! गळयात नररुडमाला धारण कर-णारी, रिपुरुधिराच्या पिपासेने सदैव लोलायमान जिव्हा धारण करणारी, व आपल्या चार, आठ अथवा सोळाही हातात शस्त्रे ग्रहण करून शत्रूचा नाश करीत त्याच्या मासाने कर्दममय झालेल्या समरभूमीवर लीलेने ताडवनृत्य करणारी म्हणून ती प्रसिद्ध आहे तिला रुधिराचा टिळा व मदिरेचा नैवेद्य अत्यत आवडतो त्यामुळे तिच्या भक्ताना सदैव आपल्या शत्रूचे कदन करून त्याच्या रुधिराने तिला अभिषेक करावा लागतो व मदिरेचा नैवेद्य दाखवून तिचे प्रसाद म्हणून आनदाने पान करावे लागते समर गाजविल्याशिवाय आपली देवता प्रसन्न होऊ शकत नाही अशी त्याची ठाम समजूत ! मनुष्याच्या स्वरूपातील शत्रू तिच्या समोर बलि देण्यास आढळला नाही तर लाब दाढीचे बोकड अथवा मठ्ठ मेदूचे महिष आणून ते तिच्या समोर बलि देण्यात येतात

परमेश्वर हा हिसा व अहिसा अशा दोन्ही स्वरूपानी नटला आहे त्याच्या समग्र स्वरूपाचे दर्शन करू इच्छिणाऱ्या भक्ताने त्याच्या केवळ जगदुत्पत्ति करणाऱ्या राजस ब्रह्मदेवाच्या, अथवा त्याचा प्रतिपाळ करणाऱ्या सात्विक विष्णूच्याच स्वरूपाचा बोध करून घेऊन चालणार नाही तर अखिल विश्वाचा सहार करणाऱ्या चडप्रतापी अद्भुत रुद्रस्वरूपाचाही बोध करून घेतल्याशिवाय त्याच्या ज्ञानास पूर्तता येणार नाही बौद्ध, जैन व ख्रिस्ती धर्म केवळ अहिसाप्रधान आहेत तर महमदी धर्म केवळ हिसाप्रधान आहे परतु हिदुधर्म हा उभयप्रधान आहे व हाच त्याचा विशेष आहे हिसा व अहिसा याच्या योग्य समिश्रणाने अर्धनारीनटेश्वर स्वरूपात तो नटला आहे महमदी आक्रमणानतर विकलाग व हतबल झालेल्या हिदुसमाजात हिदुधर्माच्या ह्या रुद्रस्वरूपाचा जर कोठे अवशेष शिल्लक राहिला असेल तर तो राजस्थानात व विशेषत मेवाडातच होय ! व त्याचे श्रेय राजपूत राजाच्या व प्रजेच्या ह्या भव–भवानीच्या उपासनेसच दिले पाहिजे ह्यात शका नाही

**६. राजपूत राजांची सहिष्णुता.** राजस्थानात शिव, कृष्ण इ० हिदु देवाची व जैनाचीही मदिरे सर्वत्र पसरलेली आहेत राजपूत राजानी उदार सहिष्णुतेने सर्व देवस्थानाना भारत्याच देणग्या, वर्षासने,

अथवा जहागिरी नेमून दिल्या आहेत मेवाडच्या राज्यातील एकपचमाश जमीन मदिरे, ब्राह्मण, पुरोहित व चारण ह्याच्या ताब्यात आहे एकटया नाथद्वाऱ्याच्या पुजाऱ्यास दरमहा वीस हजार रुपये उत्पन्न होईल इतकी नेमणूक आहे ह्या नेमणुकी परत घेण्याचा कोणाही सत्ताधिकाऱ्यास अधिकार नाही तसे करणारा मनुष्य साठहजार वर्षे नरकात पडेल असा त्याचा ठराविक अभिशाप आहे.

हिंदूच्या शैव, वैष्णव, शाक्त इत्यादि पथाबरोबरच जैनाचाही अनेक दृष्टीनी विशेष उल्लेख करता येण्यासारखा आहे सामान्यत राजपूत जाति हिदुधर्माभिमानी असली व शिव-शिवानीच्या उपासनेने तिने आपले प्राचीन लढाऊ स्वरूप कायम टिकविले असले तरी तिच्यावर जैनधर्मानेही बराच परिणाम केलेला आहे ही गोष्ट नाकबल करून चालणार नाही त्या परिणामाचा विचार पुढे करावयाचा असला तरी येथे इतके सागणे अवश्य आहे की, राजस्थानात जैनी लोकाची सख्याही फार मोठी आहे त्याच्या एका ओसवाल जातीचीच मेवाडसारख्या एका सस्थानात एक लक्षावर कुटुबे आहेत हिदुस्थानातील अर्ध्यापेक्षा अधिक सपत्ति आज जैन लोकाच्या हातात खेळत आहे देशातील बहुतेक व्यापार, बँका, पेढया, इत्यादि सपत्तीची महत्त्वाची केद्रे जैनी लोकानी आपल्या हातात ठेवली आहेत बहुतेक राजपूत सस्थानातील मुलकी राज्यव्यवस्थेत त्याचा फार मोठा अश आहे मोठमोठ्या मुलकी अधिकाऱ्याच्या व न्यायाधिशाच्या जागा त्यानीच व्यापलेल्या आढळतील त्याच्या शातताप्रिय व अहिसाप्रधान वृत्तीमुळे त्याच्या हातून नैसर्गिक रीत्याच मुलकी कामे जितकी चोख रीतीने पार पडू शकतात तितकी पोलीस अथवा फौजोखात्यात त्याची योग्यता दिसून येत नाही

राज्यव्यवस्थेतील मुलकी विभागामधील जैनाच्या या वर्चस्वावरून, ज्याच्या ठिकाणी जो गुण असेल त्याचा त्याबद्दल सादर उपयोग करून घेण्याची राजपूत राजाची बुद्धि व्यक्त होते जैन लोकाच्या धर्मसरक्षणा-करिता त्याना आवश्यक त्या सर्व सवलती राजपूत राजानी दिलेल्या होत्या किंबहुना, राजस्थानचा सुप्रसिद्ध इतिहासलेखक कर्नल टॉड म्हणतो

त्याप्रमाणे ह्या सहिष्णुतेच्या उदार भावनेमुळे एखादा कट्टा ख्रिस्ती मिशनरी अथवा मुसलमान मुल्ला यासही राजपूताच्या प्रदेशात जितका सुरक्षितपणाने आश्रय मिळेल व जितक्या सभ्यपणाने त्याचे आदरातिथ्य करण्यात येईल तितके दुसऱ्या कोणत्याही देशात करण्यात येणार नाही, ही गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे

**७. अहिंसेची फर्मानें** महाराणा राजसिह अथवा त्यानतरच्या अन्य राजाच्या हातची जी काही आज्ञापत्रे साप्रत उपलब्ध झाली आहेत त्यावरून राजपूत राजानी जैनधर्मीयाना किती सहिष्णुतेने वागविले व त्याच्या अहिसाधर्माचाही किती आदर केला याची कल्पना येते

"प्राचीन काळापासून जैनाची मदिरे व मठ ऊर्फ निवासस्थाने याना असा अधिकार देण्यात आला आहे की, त्याच्या हद्दीमध्ये कोणत्याही जनावराची कत्तल करण्यात येणार नाही हा त्याचा प्राचीन हक्क आहे

"कोणताही प्राणी–मनुष्य अथवा जनावर–मारण्यासाठी त्याच्या हद्दीत नेल्यास त्याचा जीव वाचविण्यात येईल व त्यास अमर समजण्यात येईल (म्हणजे कोणासही व कोठेही त्यास मारण्याचा अधिकार राहणार नाही)" वरील आज्ञावरून जैनमदिराच्या अथवा मठाच्या हद्दीत अथवा त्याच्या मालकीच्या जमिनीवर कोणताही सजीव प्राणी मारण्याचा अधिकार कोणाही राजपुतास अथवा राजपूतेतरास नव्हता हे दिसून येईल वास्तविक हिंदुधर्माच्या दृष्टीने गोवध हा निषिद्ध असून सामान्यत राजपूत राज्यात गोवधास सर्वत्र मनाई होती व आहेही परतु जैनाच्या धर्मभावनाचा आदर करण्यासाठी गाईच काय पण कोणताही जिवत प्राणी–मनुष्य अथवा जनावर–मारण्याचा मनाई हुकूम प्रचलित करण्यात आलेला स्पष्ट दिसतो इतकेच नव्हे तर कित्येक ठिकाणी गावेच्या गावे जैन मदिराना अथवा धर्मगुरूना अर्पण करण्यात आली होती व अशा गावातून "जो कोणी शेळ्या, म्हशी, रेडे, बकरे अथवा अन्य जिवत प्राण्याची कत्तल करील त्याने सरकारचा अपराध केला असे समजण्यात येईल, व (ह्या अपराधाबद्दल) त्याचे घर, जनावरे व इतर सर्व सपत्ति सरकारजमा करण्यात येईल, आणि त्याला त्या गावातून हद्दपार करण्यात येईल," यासारख्या आज्ञा व त्याचा भग करणारास कठोर दड प्रचलित करण्यात आले होते

जैनाची मजल आपल्या हद्दीमध्ये अथवा गावामध्ये हिसा न होऊ देणे व आपल्या धर्मव्रताचे पालन करणे याच्याही पलीकडे गेलेली होती वास्तविक पशुहिंसा करून यज्ञयागादि पार पाडणाऱ्या हिन्दूशी त्याचा सदैव विरोधच होता म्हटले तरी चालेल हिन्दूच्या धर्माप्रमाणे त्याना त्याच्या देवताना बलि इत्यादि अर्पण करण्यास सर्वस्वी मोकळीक असावयास पाहिजे होती परतु जैन वर्चस्वाची छाप राजपूत राजाच्यावर इतकी पडलेली होती की, एखाद्या ठिकाणी आपल्या देवतेस बलि अर्पण करण्याच्या हेतूने चार लोक एकत्र झाले असले व त्यानी यज्ञीय महिष अथवा अजापुत्र देवीसमोर आणून त्याच्या मानेवर आता ते आपले हत्यार चालविणार असले, तरी इतक्यात जर हा प्रकार एखाद्या जैनाच्या लक्षात आला व त्याने जर हा प्राणी येथे बलि जाता कामा नये अशी आग्रहपूर्वक हरकत घेतली तर त्या प्राण्यास सोडून द्यावे व पुन केव्हाही त्यास वध्य समजण्यात येऊ नये अशा प्रकारच्याही राजाज्ञा प्रचलित होत्या अशा प्रकारे प्रसगविशेषी स्वधर्मीयाच्या भावनाना दुखवूनही राजपूत राजानी जैनाच्या धर्मभावनाचा आदर केलेला आहे ही गोष्ट महत्त्वाची आहे हा अहिसेचा ओघ हिदूच्या मार्फत जाणारे बलि इत्यादि बद करूनच थाबला असता तर गोष्ट निराळी होती परतु त्याने त्याच्याही पुढे मजल मारली आणि कित्येक ठिकाणी राष्ट्राच्या उद्योगधद्यास सुद्धा धोका पोचविला आहे

पावसाळ्याच्या चार महिन्यात बारीक सारीक किडे अतिशय वाढतात व कोणतेही काम करताना त्याची हिसा होणे अपरिहार्यच असते परतु ही हिंसा देखील थाबविण्याचा कित्येक स्थळी प्रयत्न करण्यात आल्याचे आढळून येते "आषाढ शु।। ११ पासून तो कार्तिक शु।। १५ पर्यंतच्या पावसाळी चातुर्मास्यात तलावाचे पाणी उपसण्यात येणार नाही, कोणतीही तेलचक्की चालविण्यात येणार नाही, अथवा कुभार मातीची भाडी तयार करणार नाहीत" मग वाटल्यास तलावाच्या पाण्यास घाण आली तरी चालेल, लोकाना तेल खाण्यास न मिळाले अथवा तेली व कुभार उपाशी मेले तरी चालतील! अशा तऱ्हेने लोकाचे आरोग्य बिघडून व उद्योगधद्याना उतरती कळा लागून राष्ट्राची हानि झाली तरी चालेल, परतु क्षुद्र जतूना

मारण्याची सुद्धा हिसा घडता कामा नये ! इतकेच काय पण लोकानी रात्री अधारात राहणे पत्करावे पण दिवे लाऊन त्याच्यावर किड्यानी येऊन मरणे व त्यायोगे हिसा होणे योग्य नव्हे असाही आदेश काही काही गावाना देण्यात आला होता

अहिंसेच्या अतिरेकाच्या बाबतीत याहीपेक्षा चमत्कारिकपणाचे उदाहरण राजस्थानच्या शेजारीच अनहिलवाडापट्टण येथे सापडते अनहिलवाड्याचा राजा जैनधर्मीय होता आणि शत्रु अगावर आला तरी देखील पावसाळ्याच्या दिवसात सैन्याच्या हालचाली त्याने बद ठेविल्या होत्या पावसामुळे रस्ते सैन्याच्या हालचाली करण्याच्या कामाचे राहिले नव्हते म्हणून नव्हे, तर मोठमोठ्या सेनाच्या हालचालीने पावसाळ्यात उत्पन्न होणाऱ्या नैसर्गिक जीवजतूची अतिशय हानि होईल म्हणून ! हिसा होईल म्हणून हिंदूनी आपापल्या देवताना आपल्या धर्मविधीप्रमाणे बलिदाने समर्पण करू नयेत, हिसा होईल म्हणून रात्री दिवे लावू नयेत, हिंसा होईल म्हणून तलाव साफ करू नयेत, उद्योगधदे चालवू नयेत, अधारात रहावे, उपाशी मरावे, आणि शत्रूने आक्रमण केले तरी करू द्यावे पण जीव-(सूक्ष्म जीवजतु)-हत्या न होईल एतदर्थ खबरदारी घ्यावी ! मग देश परकीयाच्या ताब्यात गेला तरी चालेल ! देशाच्या सर्व भागात अशा आज्ञा प्रचलित होत्या असा त्याचा अर्थ नव्हे आणि हा दुष्परिणाम सार्वत्रिक भोवला असेही म्हणण्याचा हेतु नाही परतु काही भागात का होईना, पण अशा प्रकारच्या आज्ञा प्रचलित करण्याइतका परिणाम राजपूत राजावर जैन धर्मसस्थानी घडवून आणला होता व अनहिलवाड्यासारख्या ठिकाणी एक दुवा तरी पूर्णपणे निखळला होता ही गोष्ट त्याबरोबरच विसरून चालणार नाही

**८. शरणाच्या अधिकाराची मीमांसा.** ह्या ठिकाणी हिदु व जैन या उभयताच्या मठमदिराना देण्यात आलेल्या एका समान हक्काची अथवा सवलतीची मीमासा करणे अवश्य आहे

"दशसहस्र गावे असलेल्या मेवाडातील प्रत्येक सरदार, मत्री, पाटील व पटवारी यास—

"तुम्ही आपापल्या ठाण्यावर हा हुकूम वाचून दाखवावा —

"देशद्रोही, चोर, बदमाष, अथवा तुरुगातून पळालेले लोक यानी जर आश्रयार्थ जैन मदिराची अथवा जैन यतीच्या मठाची शरण घेतली तर त्याना दरबारच्या नोकरानी पुन पकडू नये

"ही आज्ञा मिळाल्यानतर कोणीही यतीचा अपमान अथवा अमर्यादा करू नये त्याच्या हक्काचे पोषण करावे जो त्याची अमर्यादा करील त्याला हिंदु असल्यास गाईची व मुसलमान असल्यास डुकराची शपथ आहे "

वरील आज्ञा जैन मठ व मदिरे याना उद्देशून देण्यात आली असली तरी अन्य स्थळी हीच आज्ञा हिदूची शिवमदिरे व कृष्णमदिरे आणि त्याचे पुजारी व गोसावी याच्याही बाबतीत देण्यात आली आहे "श्री (नाथ)जी अथवा गुसाईजी याच्या जमिनीवर कोणीही अतिक्रमण करता कामा नये ज्या बाबतीत न्यायाची आवश्यकता आहे अशा नाथद्वाऱ्याच्या हद्दीत उत्पन्न होणाऱ्या सर्व तक्रारी, फिर्यादी व झगडे याचा तेथेच निकाल लावण्यात येईल त्यात कोणीही हस्तक्षेप करणार नाही गुसाईजीनी दिलेले निर्णय आमच्याकडून अवश्य मानण्यात येतील शरण आलेल्याना आश्रय देण्याचा श्रीजीचा हक्क नाथद्वाऱ्याच्या शहरात अथवा त्याना नेमणूक करून दिलेल्या गावात समत करण्यात येईल यात कोणी काही फरक केल्यास ती गोष्ट परमेश्वराच्या लक्षात आल्याशिवाय राहणार नाही "

वरील हुकुमावरून आणखी हीही गोष्ट लक्षात येईल की, हिदु मदिराच्या गोसाव्याना त्याना बहाल करण्यात आलेल्या गावामधील मुल्की व पोलीसचे सर्व अधिकार देण्यात आले असून त्याच्या हद्दीत होणाऱ्या सर्व गुन्ह्याचा निर्णय करण्याचे कार्य त्याच्यावरच सोपविले होते काही विशिष्ट धर्मगुरूना अथवा धर्माचार्यांना अथवा मठपतीना हे असले अधिकार देण्याची ही पद्धति जुनी आहे व हिदुस्थानाप्रमाणे युरोपातही ती सापडत असून तिच्याबद्दल फारसे वावगे असे कोणी कदाचित् बोलणारही नाही परतु 'शरणा'चा जो अधिकार जैन व हिंदु धर्ममठाना व मदिराना देण्यात आला त्याची उपयुक्तता मान्य होणे मात्र कठीण आहे एखाद्या माणसाने राजहद्दीमध्ये कोणताही अपराध करावा,

चोरी करावी—डाका मारावा, परस्त्रीगमन करावे, तुरुग फोडून पळून जावे, खून करावा, फार काय पण राजाचे विरुद्ध कट करणे अथवा त्यास ठार मारण्याचा प्रयत्न करणे, इ० राजद्रोहाचे अथवा देशद्रोहाचे कोणतेही कृत्य करावे, आणि नतर एखाद्या जैनमुनीच्या मठात अथवा कृष्णजीच्या मदिरात गुसाईजीजवळ शरण घ्यावी की, त्याचे अपराध माफ झालेच व त्याचे जीवित कायमचे सुरक्षित झालेच म्हणून समजावे !

शरण आलेल्याना आश्रय देण्याचा हा अधिकार कित्येक देशात प्राचीन कालापासून चालत आलेला आहे व बहुधा प्रत्येक ठिकाणी त्याचा दुरुपयोग—पुष्कळदा कल्पनातीत दुरुपयोग—झालेला आहे परतु असे असले तरी ह्या सस्थेचा मूळ उगम भूतदयेच्या भावनेने झालेला आहे यात शका नाही सूड अथवा प्रतिहिंसेच्या भावनेला प्रतिबध घालणे आणि दुर्बल अपराध्याचे त्याच्या अपराधाबद्दल त्याला होणाऱ्या कठोर दडापासून सरक्षण करणे इत्यादि हेतु ह्या सस्थेच्या मुळाशी आहेत युरोपात सुद्धा ख्रिस्ती धर्मगुरूना त्याच्या मठात शरण आलेल्यास आश्रय देण्याचा आणि अशा तऱ्हेने आश्रय मिळालेला अपराधी अदडच समजण्याचा अधिकार देण्यात आलेला होता मनुष्य, भावनेला वश होऊन, घोर पातके अथवा अपराध करतो पण त्याला अवकाश दिल्यास त्याचे अत करण पश्चात्तापदग्ध होऊन तो आपले जीवन सुधारू शकतो व नतर गतपापाचे प्रायश्चित्त म्हणून जीवनभर सदाचरणाचा अभ्यास करू शकतो पण एतदर्थ त्यास अवकाश देण्याची आवश्यकता असते कृतकर्माबद्दल पश्चात्ताप होऊन विदग्ध अत करणाने परमेश्वराची अनन्यभावे क्षमेसाठी करुणा भाकण्याचा अवसर परमेश्वराच्या द्वारी म्हणजे धर्मसस्थात मठामदिरातच चागल्या प्रकारे मिळू शकतो शिवाय परमेश्वराच्या दरबारात उपस्थित झालेल्या पाप्याच्या बुद्धीत पालट पाडण्याचे सामर्थ्य परमेश्वराच्या ठिकाणी असल्याने तो त्याच्या हातून इत पर असली घोर पातके होऊ देणार नाही, अशा श्रद्धेवरच जगातील अन्य देशात हे अधिकार देण्यात आले होते आणि राजपूत राजानीही तेच केले होते ह्या सस्थेचा उगम करणाऱ्याच्या अत करणात जरी अशा प्रकारचे शुद्ध हेतु असले व काही लोकाच्या बाबतीत ह्या सस्थाचा आश्रय मिळाल्याने पश्चात्ताप होऊन त्याचे जीवन

सुधारल्याची उदाहरणेही घडली असली, तरी बहुतेक शरण आलेल्या अपराध्याच्या बाबतीत ह्या सस्थाचा दुरुपयोगच झाला आहे असेच म्हणणे प्राप्त आहे खुनी–दरवडेखोर–चोर–बदमाष अथव. देशद्रोही याच्या मनात परमेश्वरासबधी कितपत श्रद्धा असू शकेल ? अदृश्य शक्तीच्या परमेश्वरावरील श्रद्धेने आपले वर्तन सुधारण्याच्या भावनेने ते ह्या सस्थाचा आश्रय घेतात की आपल्या पापाचे दृश्य शक्तीच्या नृपाकडून कठोर दडाच्या रूपाने मिळणारे भौतिक प्रायश्चित्त टाळण्याचे साधन म्हणून ते ह्या सस्थाचा उपयोग करतात? – आणि केवळ अशा भावनेने त्याचा उपयोग करणाऱ्या लोकाचे राजदडापासून सरक्षण करून त्याच्या अपराधाना अशा तऱ्हेने अप्रत्यक्ष उत्तेजन देणे राष्ट्रहिताच्या दृष्टीने उचित होईल काय?–हा भूतदयेच्या भावनेचा दुरुपयोग नव्हे काय?

९. **कांही अपवाद.** राजस्थानातही ह्या सस्थेचा असाच अतिरिक्त दुरुपयोग झालेला आढळून येतो मोठमोठ्या घोर अपराध्यानी आपले प्राण बचावण्यासाठी ह्या सस्थाचा आश्रय घेतलेला आहे आणि पूर्वराजानी दिलेल्या ह्या अधिकाराचे अतिक्रमण करण्याचे धाडस कोणत्याही सत्ताधिकाऱ्याने दाखविले नाही मागे दिलेल्या शरणाच्या आज्ञेचा नमुना महाराणा राजसिहाच्या हातच्या आज्ञेचा आहे महाराणा राजसिह हा दक्षिणेतील छत्रपति श्रीशिवाजी महाराजाप्रमाणे उत्तरेतील हिंदु राजाचा पुढारी होता त्याने अखिल राजस्थानचे सघटन करण्याचा प्रयत्न करून औरगजेबासारख्या प्रबळ व पराक्रमी बादशाहाबरोबर अनेकवार सामने देऊन त्याचा तीन वेळा पराजय केलेला आहे आणि राजपुताचा यशोगौरव वाढविला आहे परतु त्याच्यासारख्या सुज्ञ व उत्कृष्ट राजव्यवहार जाणणाऱ्या नृपतीला देखील आपण आज काढत असलेल्या ह्या शरणाच्या आज्ञेचे पुढे कसे दुरुपयोग होतील, इतकेच नव्हे तर त्यामुळे एखादे वेळी मठ व मदिरे हीच राजद्रोह व देशद्रोह करणाऱ्या लोकाची आश्रयस्थाने बनतील या गोष्टीची बरोबर कल्पना येऊ नये ही खेदास्पद गोष्ट आहे शरणाच्या ह्या आज्ञेबरोबरच ह्या हुकमाची जो अवज्ञा करील तो माझ्या रक्ताचाच नव्हे असा शाप आपल्या पुढील पिढ्याना अगोदरच देऊन ठेवलेला आढळतो एकट्या कोट्याच्या जालीम-

सिहाने मात्र या बाबतीत धैर्य व्यक्त केले होते त्याच्या काही देशद्रोही गुन्हेगाराना जेव्हा काही मदिराच्या पुजाऱ्यानी आश्रय देऊन लपवून ठेवले तेव्हा त्याने जरी मदिराच्या गुप्तभागातून अपराध्याना जबरदस्तीने ओढून बाहेर काढविले नाही, तरी 'जर अपराधी आमच्या स्वाधीन करण्यात येणार नाहीत तर मदिराची दारे बुजवून त्यास भुकेने तडफडत ठेवण्यात येईल व अशा तऱ्हेने मदिराच्या आत त्याची हत्या होईल' अशी धमकी त्याने दिली होती आणि त्याबरोबर मदिराच्या पुजाऱ्यानी अपराध्याना जालीमसिहाच्या स्वाधीन केले होते ग्रीक सत्ताधाऱ्याना ख्रिस्ती धर्ममठाना आगी लावण्याच्या धमक्या देऊन मठपतीनी आश्रय दिलेल्या गुन्हेगाराना आपल्या ताब्यात घ्यावे लागले होते राजस्थानचा इतिहास लिहिणाऱ्या कर्नल टॉडला सुद्धा एकदा असाच अनुभव आला होता एकलिगजीच्या मदिरात एका खुनी बदमाषास आश्रय मिळाला असता टॉडने त्याला मदिराच्या पुजाऱ्याकडून मागून घेतले व शिक्षा दिली साराश शरणागतीस आश्रय देणाऱ्या ह्या धर्मसस्थाचा आध्यात्मिक दृष्ट्या कितपत उपयोग झाला असेल हे सागणे कठीण आहे । पण आधिभौतिक दृष्ट्या मात्र त्याचा अत्यत दुरुपयोग झाल्याचे उघड दिसते राजपूत राष्ट्राच्या, विशेषत मेवाडच्या पतनाच्या दिवसात देशद्रोह करणाऱ्या लोकाचे ते एक लपून बसून आपले जीवित सुरक्षित ठेवण्याचे साधन आणि स्वदेशाविरुद्ध नवीन कारस्थाने रचण्याचे अड्डे तयार करण्याचे स्थान बनले होते ही गोष्ट कोणासही नाकबूल करून चालणार नाही

१० **धर्मसस्थांचें पोषण** राजस्थानच्या धर्मसस्थाच्या बाबतीत देशास अपायकारक ठरलेली दुसरी गोष्ट म्हणजे मदिरे व मठ, जैन यति, गोसावी व पुजारी, त्याचप्रमाणे ब्राह्मण, पुरोहित, धर्मगुरु व चारण इत्यादि लोकाना नेमून दिलेल्या कायमच्या जहागिरी होत मागे सागितल्याप्रमाणे देशातील सुमारे एकपचमाश जमिनी ह्या वर्गांच्या ताब्यात असल्यामुळे देशाच्या उत्पन्नाचा केवढा मोठा हिस्सा राष्ट्रोपयोगी कामास न लागता व्यर्थ जात असेल याची कल्पना येईल

कोणत्याही समाजात उत्पन्न झालेल्या धर्मसस्थाचे पालनपोषण करण्याची जबाबदारी त्या समाजातील राजे लोकावर असते राजे अथवा

क्षत्रिय ह्यानी आपण मिळविलेल्या द्रव्यातून, समाजाला शिक्षण देणारा, अथवा शास्त्र, कायदे, नीति, ज्ञान इत्यादि गोष्टींचा शोध लावणारा, अथवा अध्ययन–अध्यापन करणारा, अथवा अध्यात्मशास्त्राचा मार्ग चोखाळण्याकरिता आत्मोन्नतीच्या दृष्टीने वनौकस बनून तापसी जीवन घालविणारा असा जो वर्ग त्याचे उदरपोषण चालविले पाहिजे ही जबाबदारी कोणत्याही स्वतत्र देशात अथवा समाजात राजावर असते ही गोष्ट सर्वसम्मत आहे किबहुना राजानी अथवा क्षत्रियानी वर्षभर पराक्रम गाजवून अथवा शत्रूचे देश पादाक्रान्त करून जी सपत्ति मिळविली असेल ती त्या त्या वर्षाच्या अती, किवा जन्मभर मिळविलेली सपत्ति आयुष्याच्या अती, वर वर्णन केलेले निव्वळ समाजहिताचे व्यवसाय करणाऱ्या वर्गास दान करून टाकण्याची प्रथा मनुस्मृतीच्या आज्ञेप्रमाणे भरतवर्षांत प्राचीन कालापासून प्रचलित आहे भारतीय राजे आयुष्याच्या अखेरीस एखादा मोठा यज्ञ करून त्या निमित्ताने ह्या सर्व लोकाना एकत्र जमवीत व त्याना आपली सर्व सपत्ति दान करीत रघुवशात अजाने प्रथम सर्व पृथ्वी जिकून नतर विश्वजित् नावाचा मोठा यज्ञ केला व त्यात आपली सर्व सपत्ति दान करून टाकली——

स विश्वजितमाजह्रे यज्ञ सर्वस्वदक्षिणम्
आदान हि विसर्गाय सता वारिमुचामिव ॥

असेच वर्णन केले आहे भरतवर्षांत प्रचलित असलेली ही प्रथा कमी अधिक प्रमाणात युरोपातही प्रचलित होती असे म्हणण्यास हरकत नाही. शार्लमेनसारख्या सम्राटानेही आपली दोनतृतीयाश जमीन ख्रिस्ती धर्ममठास अर्पण केली होती आणि सामान्यत अर्वाचीन क्रातियुगाच्या अगोदर युरोपातील प्रत्येक देशातील जवळजवळ अर्धी जमीन ख्रिस्ती धर्ममठाच्याच ताब्यात होती

**११. ब्राह्मणांच्या उपजीविकेची व्यवस्था.** वरील विवेचनाप्रमाणे राजस्थानातील चद्र–सूर्यवशीय क्षत्रियराजानी आपल्या पूर्वजाप्रमाणेच ब्राह्मण, पुरोहित, चारण, धर्मगुरु, गोसावी, पुजारी, जैन व बौद्ध यति याचा प्रतिपाळ केलेला आहे ह्या वर्गातला मनुष्य सहसा उपाशी राहू

नये अशी ते शक्य तितकी काळजी घेत एकदा एका ब्राह्मणाचा मुलगा काही वृत्ति न मिळाल्याकारणाने एका तेल्याजवळ घाणा ओढण्याच्या कामास राहिला परतु असल्या कठीण कामाची सवय नसल्यामुळे ब्राह्मण-पुत्रास रक्ताच्या ओकाऱ्या झाल्या तेल्याने हे पाहून त्यास तू कोण आहेस हे विचारले तेव्हा त्याने मी ब्राह्मणपुत्र आहे असा जबाब दिला एका पुरोहिताच्या पुत्रास मी अशा तऱ्हेने कठोर कामास लावले ह्या गोष्टीचा खेद होऊन तेल्याने त्याची स्थिति नृपाधिकाऱ्यास निवेदन केली त्यासरशी त्या ब्राह्मणपुत्रास ४५ बिघे जमीन इनाम करून देण्यात आली व त्याच्या वृत्तीची सर्व व्यवस्था करण्यात आली याहीपेक्षा दुसरे चागले उदाहरण देण्यासारखे आहे राणा मोकलजी याच्या अजमीर जिल्ह्या-तील रामा नामक गावी बरेच ब्राह्मण वेदविद्येचे शिक्षण घेण्याची काहीच व्यवस्था नसल्याने कृषिकर्म करू लागले होते त्यावेळी मोकलजीने त्याच्या सागवेदपठणाची व्यवस्था केली असे कुभलगडावरील शिलालेखातील खालील उद्गारावरून स्पष्ट दिसून येते —

> यो विप्रानमितान्हल कलयत कार्ष्येण वृत्तेरल ।
> वेद सागमपाठयत्कलिमलग्रस्ते धरित्रीतले ।।

**१२. इनाम जमिनीवर करमाफी.** ब्राह्मण, चारण अथवा पुरोहित याच्याप्रमाणेच निरनिराळे मठ व मदिरे इत्यादि देवस्थानाना सार्वजनिक व त्याच्या गोसाव्याना अथवा पुजाऱ्याना खाजगी जमिनीही इनाम देण्यात येत ह्या इनाम जमिनीवर कोणत्याही प्रकारचा शेतसारा अथवा खड द्यावा लागत नसे इतकेच नव्हे, तर याहीपेक्षा बऱ्याच अधिक सवलती त्याना देण्यात येत, याची श्रीनाथजीच्या मदिराला मिळालेल्या पुढील आज्ञापत्रावरून कल्पना येऊ शकेल

"श्रीजीच्या शहरात अथवा खेड्यात कोणतीही राजाज्ञा प्रचलित करण्यात येणार नाही, अथवा त्याच्या जवळून कोणताही कर वसूल करून घेण्यात येणार नाही शहरात येण्याऱ्या मालावरील कर अथवा वाहतुकीचा कर त्याच्या जवळून घेतला जाणार नाही बाजारातील दुकानावरील कर, सोने-चादी इत्यादि किमती धातूवरील कर, सर्व प्रकारची दलाली, अथवा

शहराच्या दरवाजापाशी घेण्यात येणारी जकात, कोणत्याही प्रकारच्या पैदाशीवरील खड, हे सर्व कर श्रीजीना नजर करण्यात आले आहेत तेव्हा त्याच्यापासून येणारे सर्व उत्पन्न श्रीजीच्या कोषागारात जमा करण्यात यावे परदेशातून वैष्णवानी श्रीजीच्या दरबारात पाठविलेल्या सर्व प्रकारच्या मालावरील कर माफ करण्यात आला आहे

"अतएव सर्व सरदाराना व अधिकाऱ्याना हे कळविण्यात येत आहे की, नाथजीच्या मालाची कोणीही अमर्यादा करता कामा नये, त्याच्या सरक्षणाकरिता शिपाई देण्यात यावेत व प्रत्येक सरदाराने हा माल आपल्या हद्दीतून दुसऱ्याच्या हद्दीत सुरक्षितपणे पोचवून द्यावा

"जो माझ्या वशाचा असेल व जो माझा चाकर असेल तो सदैव सदैव या आज्ञेचे पालन करील"

वरील आज्ञेत मिळालेल्या सर्व सवलती अगदी स्पष्टच असल्याने त्यासबधी अधिक लिहिण्याची आवश्यकता नाही

**१३. ब्राह्मणादिकांचा शिपाईपेशा.** ब्राह्मण, पुरोहित, चारण, गोसावी, पुजारी आणि जैन यति इत्यादि लोकाचा जो हा एवढा मोठा वर्ग राजपूत राजानी पोसला त्याची प्रारभीच्या उत्कर्षाच्या काळात उपयुक्तताही उत्तम सिद्ध झाली आहे प्रारभी प्रारभी जेव्हा राजपूत राष्ट्राचा विशेषसा विस्तार झाला नव्हता आणि मदिरे व मठ याची विशेष भरभराट झाली नव्हती त्या वेळी ब्राह्मण, पुरोहित, गोसावी इत्यादि वर्ग तरवार हाती धरून लढाईस जात असत राजस्थानातला सामान्यत प्रत्येक तरुण पुरुष–मग तो कोणत्याही जातीचा असो–उत्तम लढवय्या असे, हा या देशाचा विशेष होय ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य इत्यादि सर्व जातीचे लोक शस्त्रविद्या जाणत व गरज पडली म्हणजे आपल्या राष्ट्राच्या ध्वजाखाली येऊन उभे राहत भरतवर्षातल्या अन्य स्थळाहून सुरक्षितपणासाठी म्हणून या निसर्गसरक्षित अशा राजस्थानचा त्यानी आश्रय केला असला तरी स्वसरक्षणाची कला ही प्रत्येकास अवगत असलीच पाहिजे या गोष्टीची त्याना परम आवश्यकता भासू लागली व त्यामुळे साहजिकच, प्रत्येक व्यक्तीस–मग ती पुरुष असो अथवा स्त्री असो–युद्धकलेचे शिक्षण घ्यावे लागले अशा परिस्थितीत ब्राह्मण, पुरो-

हित, चारण, गोसावी, पुजारी इत्यादिकाचा हा राजोपजीवि वर्ग देखील युद्धकलेमध्ये प्रवीण असाच राहिला शिवाय नतरच्या काळात ह्या वर्गास ज्या प्रमाणात जमिनी, देणग्या, इनामे वगैरे देण्यात आली तितकी प्रारभी नसल्याने सेनेत भरती होऊन शिपाई पेशाच्या बळावर पोट भरणे त्याना अपरिहार्यच झाले होते

**१४. राष्ट्रकार्यार्थ आत्मबलिदान.** ब्राह्मणादि वर्गांनी बरेच दिवस आपल्या शक्तीचा उपयोग राष्ट्रकार्यार्थ केल्याचे वर सागितलेच आहे विशेषत राजपुरोहितानी राष्ट्रीय गादीचा गौरव कायम राखण्यासाठी प्रशसनीय प्रयत्न केलेले आहेत अनेक प्रसगी परस्परात लढणाऱ्या राजपुत्राना असल्या आत्मघातापासून त्यानी परावृत्त केले आहे व हे कार्य साधण्या-करिता प्रसगविशेषी त्यानी आपले प्राणही अर्पण केले आहेत मेवाडचा सुप्रसिद्ध राणा प्रतापसिह व त्याचा भाऊ शक्त याच्या मधील कलह टाळण्यासाठी त्याच्या पुरोहिताने मध्ये पडून स्वत चे प्राण अर्पण केल्याची गोष्ट प्रसिद्ध आहे प्रताप व शक्त याच्यात स्पर्धा उत्पन्न झाली तेव्हा त्यानी आपल्या कर्तृत्वाचा निर्णय द्वद्वाने लावून घेण्याचा निश्चय केला त्याप्रमाणे जगलामध्ये जाऊन व आपापले भाले सरसाऊन कोणाच्या भाल्याची फेक सकस आहे हे सिद्ध करून देण्यास ते दोघेही पवित्र्यावर उभे राहिले आता एकमेकाच्या वक्षावर आघात करून ती विदीर्ण होणार इतक्यात त्याचा राजपुरोहित दोघाच्याही मध्ये घुसून उभा राहिला व ‘राष्ट्रविनाश व कुलविनाश टाळण्यासाठी तुम्ही कृपा करून एकमेकाचा नाश करू नका’ अशी त्याने त्याना कळकळीची विनती केली परतु त्याची ही विनवणी पालथ्या घागरीवरील पाण्यासारखी वृथा गेली पुन एकमेकावर वार करण्यासाठी त्यानी पवित्रे साधलेले पाहिल्याबरोबर त्या वृद्ध ब्राह्मणाने आपल्या कमरेतील कटयार बाहेर काढली व ती इतक्या वेगाने स्वत च्याच वक्ष स्थळात खुपसली, की तो तेथच्या तेथे गतप्राण होऊन पडला ब्राह्म-णाच्या उरातून निघालेल्या रक्तप्रवाहाने ती युद्धभूमि रजित झाली हे भयकर कृत्य—त्या ब्राह्मणाचा हा दिव्य आत्मयज्ञ—पाहून दोघाही बधूनी लज्जेने आपली मुखे अवनत केली आणि नतर एकाने चितोडच्या राजवा-ड्याचा तर दुसऱ्याने दिल्लीदरबारचा मार्ग धरला अशा तऱ्हेने स्वत च्या

उज्ज्वल प्राणाहुतीनी त्या ब्राह्मणाने होणारा राष्ट्रविनाश टाळला ज्या ठिकाणी आपल्या राजाच्या व राष्ट्राच्या हिताकरिता सदरहू ब्राह्मणाने अत्यत उदात्त भावनेने आत्मोत्सर्ग केला त्या ठिकाणी महाराणा प्रतापसिहाने बाधविलेली त्याची समाधि व त्याच्या वशजास नेमून दिलेले वतन आजही कायम आहेत

राष्ट्रहिताकरिता अशा प्रकारचा त्याग केवळ ब्राह्मणानीच केला असे नव्हे धर्मसस्थाशी निगडित असलेल्या गोसावी, चारण इत्यादि सर्वांनी एके काळी आपली उज्ज्वल राष्ट्रभक्ति व्यक्त केली आहे चारण वर्ग तर प्रारभापासून अखेरपर्यंत लढाईवर निघालेल्या राजपुताच्या ठिकाणी त्याच्या पूर्वजाचे उत्तेजक पोवाडे गाऊन दाखवून लढण्याची विलक्षण स्फूर्ति निर्माण करीत होता गोसावी वगैरे लोकही शस्त्रे बाधून सदैव लढण्यासाठी सिद्ध होत असत राणा अरिसिहाच्या वेळेस शिद्याने उदयपुरावर आक्रमण केले असता अरिसिहाने केवळ गोसाव्याच्या सेना तयार करून तिच्या बळावर मराठ्याना उदयपुराबाहेरील खिडीशी तीन दिवस रोखून धरले होते नाथद्वाऱ्याच्या गोसाव्याने तर स्वत च्या जातीचे असे ४००–५०० सशस्त्र घोडेस्वार तयार केले होते व त्याच्या बळावर राजपूत राष्ट्रे अखेरची इग्रजाच्या अकित होईपर्यंत, तो मराठे, इग्रज व राजपूत याच्या कलहामध्ये आपल्या मदिराचे स्वत च शक्य तितके सरक्षण करण्याचा प्रयत्न करीत होता साराश धर्मसस्थाशी सबध असलेला प्रत्येक वर्ग एक वेळेला लढाऊ व कर्तबगार असे व बरेच दिवसपर्यंत राष्ट्रहितार्थ त्याने आपली शक्ति खर्चही केली लढला नाही असा वर्ग एकच तो म्हणजे जैन यतीचा होय पण त्या वर्गाकडून लढाईची अपेक्षाही कोणी केली नव्हती

**१५. धर्मगुरूंचा अधःपात.** पण प्रारभी प्रारभी जी युयुत्सु वृत्ति या ब्राम्हण, चारण, पुजारी, गोसावी इत्यादि वर्गांत विद्यमान होती ती पुढे तितक्या प्रमाणात राहिली नाही मठामदिराना सार्वजनिक व त्याच्या पुरोहिताना, पुजाऱ्याना व यतीना खाजगी इनामे, जहागिरी व वर्षासने मिळाल्यानतर त्याच्या ठिकाणी पुष्कळ प्रमाणात ऐदीपणा व आळस उत्पन्न झाला ह्या ऐतखाऊपणाचा उपभोग घेणारे हजारो लोक होते

म्हटले तरी चालेल विनाप्रयासाने व सुखासमाधानाने उदरभरण होऊ लागल्याबरोबर देशभक्तीचा जोर हळू हळू कमी होऊ लागला आणि घरी बसून स्वस्थपणे दोन घास पोटात जात असता व स्त्रीपुत्राच्या सह-वासाचे सौख्य भोगावयास मिळत असता जाणून बुजून लढाईच्या मैदा-नावर जाऊन व मरणाचा प्रसग ओढवून घेऊन त्याना दु खार्णवात का लोटा ? आमच्या पश्चात् त्याची काय दशा होईल ? ही भावना वाढू लागली ज्या राष्ट्राने आपल्या पालनपोषणाची व्यवस्था केली, आप-णास सरक्षण दिले, आणि आपले व्यवसाय शक्य तितके निर्वेध चालावे अशी तरतूद करण्याचे प्रयत्न केले त्याच राष्ट्रावर पुढे आपत्तीचे डोगर कोसळले तरी या आळशी व अध पतित झालेल्या सुखलोलुप लोकानी त्यास शारीरिक व आर्थिक साहाय्य करण्याचे मनात आणले नाही साराश जो सस्था प्रथम देशातील ज्ञानादिकाच्या वृद्धीस कारणीभूत झाली व जो राष्ट्रीय आपत्तीच्या कित्येक प्रसगी हजारो शस्त्रधारी वीराना युद्धो-न्मुख वृत्तीने रणभूमीवर अवतीर्ण करती झाली, व म्हणूनच राष्ट्रीय सरकारने जिचा उत्तम प्रकारे प्रतिपाल केला तीच सस्था पुढे पुढे राष्ट्राच्या उतरत्या काळात सुखासीन, मूर्ख, लोभी, आळशी व बबठस लोकाचा अड्डा होऊन बसली आणि त्यायोगे लढाऊ वीर उत्पन्न होण्याची एक खाण कायमची बद झाली

**१६. राष्ट्राच्या उपयोगी न पडणारी संपत्ति.** जी स्थिति धर्मसस्थाशी निगडित असलेल्या व्यक्तीची झाली तीच त्याच्याशी सबद्ध असलेल्या सपत्तीचीही झाली आठव्या शतकात बाप्पा रावळने प्रथम भगवान् एकलिंगजीच्या मदिराची स्थापना केली त्यानतर शेकडो शिव-मदिरे राजस्थानात निर्माण झाली आपल्या पूर्वजानी निर्माण केलेल्या मदिराना देणग्या देणे व आपल्या स्त्रियाच्या आग्रहावरून नवीन मदिरे उभारणे व त्यानाही मोठमोठ्या नेमणुका करून देणे हा राजपूत राजाचा एक सर्वसाधारण क्रम असे राजपुरुष व राजस्त्रिया ह्याच्या मार्फत हिंदूच्या व जैनाच्या मदिराना सारख्याच देणग्या मिळाल्या आहेत. राजघराण्यातील स्त्रीपुरुषाव्यतिरिक्त देशातील अनेक धार्मिक वृत्तीचे श्रीमत स्त्रीपुरुष आपापल्या देणग्या या मठामदिराना देत आठव्या

शतकापासून सुरू झालेली ही प्रथा पुढे सारखी वाढतच गेली व कालाच्या ओघाबरोबर ह्या मठामंदिरातून यती–पुजाऱ्याजवळ अपार धनसंचय होऊ शकला देशातली एकपंचमांशापेक्षा अधिक जमीन त्यांना इनाम असल्याने तिच्यापासून होणाऱ्या कराच्या उत्पन्नास सरकारास मुकावे लागले व त्यामुळे अपरिमित आर्थिक हानि सोसावी लागली ही गोष्ट तर खरीच ! पण त्याहीपेक्षा दरवर्षाच्या नवीन देणग्या, नवीन वर्षासने, नवीन जहागिरी, नवीन सुवर्णतुला–रौप्यतुला–रत्नतुला इत्यादिकांनी ह्या मठा–मंदिराच्या व यती–पुरोहिताच्या संपत्तीत अतोनात भर पडत गेली व तितकेच राष्ट्राच्या सार्वजनिक संपत्तीचे परिमाण कमी झाले. शेकडो वर्षांची संपत्ति ह्या एकाच संस्थेतून समुच्चित झाली तिकडे देशात शेकडो लढाया, दुष्काळ व रोग निर्माण झाले व गेले तरी लोकांची वृत्ति पुन त्यांना आधिदैविक आपत्ति समजून त्यांच्या शमनार्थ परमेश्वराची उपासना म्हणून मठामंदिरांना व यतीपुरोहितांना दानादि देण्याकडे अभिमुख होती ती तशीच कायम राहिली राजघराण्यातील अथवा अन्य श्रीमंत पुरुषाच्या घराण्यातील धार्मिक गृहस्थाच्या स्त्रिया मेल्या की, दानाचा प्रवाह ह्या संस्थेकडे वळावयाचा हे ठरलेलेच ! अशा तऱ्हेने ह्या धर्मसंस्था राजस्थानात शेकडो वर्षांच्या धनसमुच्चयाने अतोनात श्रीमंत झाल्या व आजही आहेत सतराव्या शतकात मथुरेहून नाथद्वाऱ्यास येऊन वास्तव्य केलेल्या एकट्या श्रीकृष्णाच्या मंदिराची श्रीमंती आजघटकेस एखाद्या मोठ्या राजाहून अधिक आहे व भरतवर्षाच्या सर्वाधिकाऱ्यास (व्हाईसरायास) जितके मासिक वेतन मिळते तितके त्याच्या पुजाऱ्याचे उत्पन्न आहे

ह्या एवढ्या अफाट समुच्चित संपत्तीचा राष्ट्राच्या आपत्तिनिवारणासाठी कवडीचा उपयोग झाला नाही मठामंदिरांना अथवा यति-पुरोहितांना एकदा दानरूपाने दिलेली संपत्ति पुन परत घ्यावयाची नाही अशी हिंदुधर्माची आज्ञा असल्याने एकदा राष्ट्रीय उत्कर्षाचा काळ ओसरून गेल्यानंतर जेव्हा शंभर शंभर दीडदीडशे वर्षे स्वातंत्र्याची युद्धे लढविण्याचा प्रसंग आला, प्रबळ शत्रूच्या आक्रमणाने जेव्हा राजकोष रिकामे झाले, प्रजा वारंवार लुटल्या जाऊन उध्वस्त झाल्याकारणाने त्यांची

अर्थोत्पादन करण्याची शक्ति जेव्हा पार नष्ट झाली, युद्धाच्या धुमाकुळीत देशाचा व्यापार जेव्हा अजीबात क्षीण झाला, आणि अशा तऱ्हेने राष्ट्रीय कोषागारात सपत्ति येऊन पडण्याचे सर्व झरे जेव्हा आटून शुष्क झाले, तेव्हा ह्या मठामदिरात व यती–पुरोहिताजवळ अगणित सपत्ति विद्य-मान असूनही ती राष्ट्राच्या मुळीच उतयोगी पडली नाही त्यामुळे द्रव्याच्या अभावी राजपूत राजाना सेना उभारता आल्या नाहीत, कित्येक वेळा शत्रूबरोबर दोन हात करण्याची तयारी करता आली नाही, रानावनात व दऱ्याखोऱ्यात पळून जाऊन वनवासी जीवन घालवावे लागले, आणि ह्या सर्व गोष्टीचा परिणाम कधी मुसलमानाचे, कधी मरा-ठ्याचे, व अखेरीस इग्रजाचे कायमचे पारतत्र्य पत्करण्यात झाला द्रव्या-च्या अभावी राजपूत राजाना आपल्या मुलामुलींची लग्ने मराठा सरदा-राकडून कर्जे काढून लावण्याची पाळी आली, मराठ्यानी जबर खडण्या बसविल्या तेव्हा राजस्त्रियाच्या अगावरील जड–जवाहीर व दागदागिने विकून त्या भराव्या लागल्या, पूर्वजानी महत्प्रयासानी सगृहीत करून ठेवलेल्या प्राचीन मोलवान वस्तू विकून त्यायोगे उत्पन्न झालेल्या द्रव्याच्या बळावर युद्धे चालवावी लागली परतु मठा–मदिरातून व यती–पुरोहि-ताजवळ साचलेल्या ह्या अपरपार द्रव्यनिधीचा राष्ट्रास कवडीचा उपयोग झाला नाही, अथवा त्याच्या करट्या मालकानी, ज्या राजपुरुषानी व ज्या राष्ट्राने आपणास पोसून एवढे समृद्ध केले त्याच्या आपत्प्रसगी स्वत होऊन त्याना साहाय्य करण्याची कृतज्ञताबुद्धि व्यक्त केली नाही, असेच म्हणणे अधिक उपयुक्त होईल

**१७. यशवंतराव होळकराचा प्रयत्न.** राजपूत राष्ट्रावर हे अर्थशोषणाचे प्रसग अनेकवार आले राणा प्रतापसिहाच्या वेळेस राष्ट्रीय निधि सपल्याकारणाने त्यास अखेरीस देशनिर्वासनाचा विचार करावा लागला परतु त्याचा मत्री भामासाह याच्या औदार्याने त्यास पुन सेना उभारता आली जहागीरच्या अफाट सेनासागराबरोबर अठरा वेळ युद्धात हात मारून अमरसिह यशस्वी झाला परतु त्या भयकर अष्टादश युद्धात राष्ट्रीय कोषागार सपूर्ण रिकामे झाले त्याचाच परिणाम अमरसिहाने मोगलाचे अशत पारतत्र्य पत्करण्यात झाला त्यानतर पुन राजसिहावर

औरगजेबाशी युद्ध करीत असताना तोच प्रसग आला परतु त्याचा पुत्र जयसिह याने मोठ्या शर्थीने व बहादुरीने शत्रूचाच खजिना मारून राष्ट्रावरील आपत्ति टाळली ह्यानतर मराठ्याची जळू ह्या राष्ट्रास लागली व तिने त्याचे अतोनात अर्थप्राशन केले मराठ्याच्या चौथ सरदेशमुखीच्या खडण्या भरण्यापायीच त्याना राजस्त्रियाच्या अगावरील दागिने विकण्याची पाळी आली होती हे मागे सागितलेच आहे त्या सुमारास अमरचद बर्व्याने आपल्या कर्तबगारीने काही दिवस राष्ट्रास बचाविले अखेरच्या भीमसिहाजवळ फक्त पन्नास घोड्याची पागा उरली व स्वपरिवाराच्या खर्चासाठी चितोड व मडलगडच्या सरदारावर त्यास अवलबून राहावे लागले ही स्थिति एकट्या मेवाडच्या राजाची होय जी स्थिति त्याची तीच स्वातत्र्याभिमानाने राहू इच्छिणाऱ्या अन्य राजपूत राष्ट्राची समजली पाहिजे ह्यापैकी एकानेही आपल्या देशात भरगच्च भरलेल्या मठा–मदिराच्या अथवा यतीपुरोहिताच्या सपत्तीची अभिलाषा धारण केली नाही. ह्या निर्लोभ वृत्तीने फार झाले तर त्या त्या राजाच्या वैयक्तिक चागुलपणात भर टाकली असेल परतु त्यायोगे राष्ट्राचा लाभ झाला अथवा हानि याचाही विचार केला पाहिजे द्रव्याच्या अभावी राष्ट्राचा नाश होऊ द्यावा की, पापपुण्याची काल्पनिक भीति बाजूस सारून मठामदिरात साचलेल्या ह्या सपत्तीचा राष्ट्रहिताच्या कामी उपयोग करून घ्यावा ! या दोहोतले अधिक चागले कोणते ? ह्या गोष्टीचा निःपक्षपात दृष्टीने विचार करून राजपूत राजानी ह्या धर्मसस्थातील सचित सपत्तीचा उपयोग केला असता तर देशाचा लाभ झाला असता व तेच कृत्य अधिक श्रेयस्कर व कल्याणप्रद झाले असते असे म्हणण्याशिवाय गत्यतर राहत नाही पण राजपूत राष्ट्राच्या एकाही राजास ही कल्पना शिवली नाही नाही म्हणावयास मराठे सरदारापैकी यशवतराव होळकराने सपत्तीचे हे केद्र बरोबर हुडकून काढले होते व राष्ट्रहितासाठी तिचा उपयोग करण्याचा प्रयत्नही केला होता त्याने इग्रजाबरोबर सुरू असलेल्या युद्धात एकदोन वेळा नाथद्वाऱ्याच्या मदिराजवळून सुद्धा तीन तीन लाख रुपये खडणी घेतली होती. यशवतरावाचा हात जमता, त्यास इतर

मराठा सरदाराचे सहकारित्व प्राप्त होते व इग्रजाना घालवून देण्याच्या कार्याची सभवनीयता त्यास दिसून येती तर त्यासाठी त्याने हिदूची मठ–मदिरे मारून देखील सपत्ति उकळण्यास कमी केले नसते असे त्याच्या पूर्वकृत्यावरून म्हणता येते आज यशवतरावास राजपुतान्यातील व इतरही सर्व ठिकाणचे हिदु त्याने हिदु मदिरावर आक्रमण केले याबद्दल दोष देतात व जुलमी म्हणतात परतु त्याचा डाव यशस्वी झाला असता व इग्रजी सत्तेचे उच्चाटण होऊन पुन मराठी सत्ता प्रस्थापित झाली असती तर मठा–मदिराची जितकी सपत्ति त्याने लुटली होती त्याच्या दुप्पट त्याना बहाल केली असती व त्याबद्दल आजच्या त्याला शिव्या-शापाची लाखोली वाहणाऱ्या इतिहासकारानीच त्याचे ‘स्वातत्र्यप्रेमाचे कृत्य’, ‘सुवर्णाक्षरानी लिहून ठेवण्यासारखे कार्य’ म्हणून गोडवे गायिले असते यात शका नाही ज्या मठा–मदिरातील सपत्तीचा राष्ट्रावरील आपत्तीच्या काळातही राष्ट्रास काहीच उपयोग होऊ शकत नाही त्याना ठेऊन काय चाटावयाचे आहे ? अशी वृत्ति असल्या निर्वाणीच्या प्रसगी यशवतरावासारख्याच्या ठिकाणी उत्पन्न होणे स्वाभाविक नाही काय ?

---

## प्रकरण दुसरें

# साहित्य आणि कला–त्यांचीं साधनें व विनाश

**१. हिंदुस्थानचें अलेक्झांड्रिया.** राजपुताचा इतिहास जितका दीर्घकालीन तितक्याच प्रमाणात ह्या राष्ट्रात निर्माण झालेली साहित्य व कलेची सपत्ति विशाल असावयास पाहिजे मोठमोठाले साके, कत्तली, युद्धे, प्रलय, दुष्काळ व साथीचे रोग, आणि या सर्वांच्या जोडीस घडून आलेल्या निरनिराळ्या राज्यक्रान्त्या इत्यादि प्रकारच्या वेगवेगळ्या अवस्थातून सतत हजार बाराशे वर्षे एखादे राष्ट्र गेल्यानतर त्याने निर्माण केलेले साहित्य व कला याचा सागोपाग व यथार्थ इतिहास प्राप्त करून घेणे जवळ जवळ अशक्य असते धामधुमीच्या व राज्यक्रान्तीच्या काळात

राष्ट्राचे ज्या अनेक गोष्टीनी नुकसान होते ते मागेपुढे केव्हा तरी भरून निघण्याचा सभव असतो परतु साहित्य व कला याचे एकदा झालेले नुकसान मात्र केव्हाही भरून निघण्यासारखे नसते राजपूत राष्ट्राचा उदय आठव्या शतकापासून झाला आणि एकोणिसाव्या शतकात ती इग्रजी सत्तेच्या आहारी पडली ह्या एवढ्या काळात राजपुताचे प्रधान राष्ट्र जे मेवाड त्याच्या राजधानीचा–चितोडचा–तीन वेळा विध्वस झाला, जेसलमीरचा दोन वेळा विध्वस झाला, व तीच दशा कमी अधिक प्रमाणात जोधपूर, जयपूर इत्यादि राजधानीच्या शहराची झाली राजपूत राजानी पिढ्यानुपिढ्या आपल्या देशात शातता व सुव्यवस्था राखण्याचा प्रयत्न करून आपल्या राजधान्या व देश सपन्न करावा आणि त्यानतर एखाद्या क्रूर व जगली मुसलमान बादशहाची त्यावर वक्रदृष्टि झाली की, त्याने केवळ राजकीय दृष्ट्याच राजपूत राष्ट्राचे मर्दन करून थाबू नये, तर जे जे म्हणून राष्ट्रात सस्कृतिदर्शक सापडेल त्या प्रत्येकाचा –सौदर्य, साहित्य व कलाविषयक गोष्टीचा–पार नाश करून टाकावा हा नाश इतका भयकर असे की, त्यास अलेक्झाड्रिया येथे ग्रीक लोकानी सचित करून ठेवलेल्या ज्ञानभाडाराचा मुसलमानानी ते शहर जिकल्यावर जो विध्वस केला त्याचीच उपमा शोभेल पूर्वी काही होते किंवा नाही असा सदेह पुढच्यास उत्पन्न व्हावा अशी परिस्थिति निर्माण होत असे या विनाशाबरोबरच परचक्राशी स्वातत्र्याचे युद्ध लढत असताना राजपूत राजाना स्वत च आपला मुलूख बेचिराख करून टाकण्याची पाळी अनेकवार आली राणा हमीर व राणा प्रतापसिह यानी सतत वीसवीस पचवीस पचवीस वर्षे आपल्या हातानी नदनवनासारख्या आपल्या सुन्दर देशाचे ओसाड वाळवट अथवा काटेरी बाभळीचे नुसते रान बनवून टाकले होते राणा अमरसिहाने मोगल बादशहाशी जी एकदर अठरा युद्धे केली त्यात त्याचा सबध मुलूख उध्वस्त झाला राणा राजसिहाने मेवाडतर्फे व त्याची भगिनी महाराजा अजितसिहाची व जसवतसिहाची पत्नी हिने मारवाडतर्फे औरगजेबासारख्या प्रबळ बादशहाबरोबर जेव्हा स्वातत्र्याचे प्रखर समर केले तेव्हा त्यास देखील प्रथम असेच आपले सर्व राष्ट्र उजाड करून टाकावे लागले होते शिवाय त्या धर्मांध, कलाकौशल्यपराङ्मुख, अरसिक व जुलमी बादशहाने राजस्थानातील

शेकडो मदिरे उध्वस्त केली व ग्रथालये जाळून खाक केली त्यानतर राजपूत राष्ट्राच्या अधःपाताच्या उत्तरकालात चद्रावत व शक्तावत इत्यादि भिन्नभिन्न राजपूत कुलाच्यामध्ये उद्भूत झालेली पारस्परिक वैमनस्ये व तदर्थ होणारी युद्धे, शिंदेहोळकर इत्यादि मराठे सरदाराच्या आपसातील लढाया, त्या उभयताच्या राजपूत राजाबरोबर होणाऱ्या प्राणनाशक लढाया, इग्रजी व फरेंच तोफाचे धूमधडाम, पेंढाऱ्याचा उपद्रव वगैरे सतत शेदीडशे वर्षे चाललेल्या धागडधिंग्याने राजस्थानचा गजबजलेला प्रदेश अजीबात ओसाड करून सोडला होता व्यापारी, साहुकार, आणि शात वृत्तीने राहून परमार्थसाधन किवा शास्त्रसेवा करणारे ब्राह्मण–पुरोहित अथवा जैन यती यानी हजारोच्या सख्येने देशनिर्वासन केले होते साराश, वर वर्णन केल्याप्रमाणे आपत्तीच्या निरनिराळ्या प्रकारच्या ज्या एकाहून एक प्रचड लाटा राजस्थानवर येऊन आदळल्या त्यामुळे राजपुताच्या साहित्याचा व कलेचा केवढा भयकर विनाश झाला असेल व त्यायोगे भारतीय सस्कृतीची केवढी प्रचड हानि झाली असेल याची कल्पनाच करणे बरे !

**२. आश्चर्यकारक प्रगति.** इतक्या घोर विनाशानतरही जे साहित्य व कलेचे अवशेष अद्याप राजस्थानात शिल्लक राहिले आहेत त्यावरून देखील तेथील चद्र–सूर्यवशीय राजानी व त्याच्या आर्य प्रजाजनानी या बाबतीत किती आश्चर्यकारक प्रगति केली होती याची कल्पना करता येण्यासारखी आहे राजसमुद्र व जयसमुद्र यासारखी निव्वळ सगमरवरी पाषाणाने बाधून काढलेली सागरोपम विशाल सरोवरे, पिशोल्याचे नितात रमणीय सारस व त्याच्या आत व काठावर बाधण्यात आलेली अप्रतिम राजमदिरे, जयपूर व जोधपूर येथील अत्युत्कृष्ट व दृष्टि चकित करून सोडणारे सौंदर्यशाली भव्य राजमहाल, दिवाणखाने व देवालये, मोठमोठे गगनस्पर्शी विजयस्तम्भ व कीर्तिस्तम्भ, जैन यतीचे मोठमोठे मठ व कलापूर्ण निवासालये, इत्यादि सहस्रावधि गोष्टी आजही राजस्थानात विद्यमान असून त्या राजपूत जातीच्या कलाप्रियतेची व सौदर्याभिज्ञतेची साक्ष पटवीत आहेत आर्य सस्कृतीच्या अभिमानी अशा धर्मानुवर्ती राजपूत राजानी स्वर्गकामनेने इष्टापूर्तामध्ये म्हणजे मदिरे, वापी, कूप, तडागादि-

काचे उत्तमोत्तम नमुने निर्माण करण्यामध्ये पाण्यासारखा पैसा खर्च केला असल्यास त्यात काहीच आश्चर्यास्पद नाही

**३. स्फूर्तीचा निर्झर.** एकट्या साहित्याच्या दृष्टीने जरी पाहिले तरी उभ्या राजस्थानचा इतिहास निरनिराळ्या देशींविदेशी इतिहास-लेखकाना, नाटककाराना अथवा कथालेखकाना स्फूर्तीचा एक चिरतन व सातत्यपूर्ण निर्झरच होऊन राहिला आहे असे दिसून येईल सस्कृत, पाली, डिगल, हिदी, मेवाडी, मारवाडी, मराठी, बगाली, गुजराथी, अरबी, फारशी, उर्दू, इग्रजी व जर्मन भाषामध्ये मिळून एतद्विषयक शेकडो ग्रथ निर्माण झाले आहेत व त्या सर्वांच्या आधारे राजस्थानचा एक सुसबद्ध इतिहास निर्माण करण्याचे कार्य हिदी पुरातत्त्ववेत्ते सपादन करीत आहेत रायबहादूर गौरीशकर ओझा सारख्या सतत चार तपे सशो-धनकार्यामध्ये तपश्चर्या केलेल्या उत्तरहिदुस्थानच्या रजवाड्याने लिहू घातलेल्या राजस्थानच्या इतिहासाकरिता आधारादाखल घेतलेल्या ग्रथा-मध्ये ११० सस्कृत–पाली–प्राकृत भाषातील ग्रथ, ३१ हिंदी–गुजराथी-मराठी इत्यादि देशी भाषातील ग्रथ, २५ अरबी–फारशी–उर्दू इत्यादि मुसलमानी भाषातील ग्रथ आणि ७३ इग्रजी व जर्मन भाषातील ग्रथ आहेत यावरून देखील वरील विधानाची यथार्थता ध्यानात येण्यासारखी आहे

**४. प्राच्य इतिहासाची साधनें.** भरतवर्षाच्या सर्वच प्राच्य इतिहासाची साधने म्हणजे पुराण शिलालेख, ताम्रपत्रे, कीर्तिस्तम्भ आणि मदिरादिकावर खोदलेल्या प्रशस्ति ह्या होत छापखान्याची कला ही तर अगदीच नवीन आहे कागदावर लिहिण्याची कला मुद्रणकलेहून प्राचीन असली तरी पुराण म्हणण्याइतकी प्राचीन नाही–नव्हे आधुनिक म्हणण्या-इतकी नवीन आहे कागदाच्या पूर्वी ताडपत्रे अथवा भूर्जपत्रे यावर लिहि-ण्याचा प्रघात असे परतु त्याहीपेक्षा प्राचीन काळात मोठमोठ्या ताम्र-पत्रावर अथवा शिलाखडावर लिहिण्याचा प्रघात असे आर्यसस्कृतीचा ओघ आर्यावर्तांतून राजस्थानात वळल्यानतर तेथेही ह्या शिलालेखाचा अथवा ताम्रपत्राचा प्रघात सुरू झाला शिलाखडावर किंवा ताम्रपत्रावर अक्षरे खोदण्याचे काम फारच बिकट आहे यात शका नाही त्यामुळे त्यावर लिहून लिहिणार तरी कितीसे लिहिणार? अशी शका उत्पन्न होणे अगदी

स्वाभाविक आहे परतु साप्रत उपलब्ध झालेल्या शिला, खडक, गुहा स्तूप, स्तम्भ, मठ, मदिरे, तलाव, विहिरी, व ताम्राची स्वतत्र दानपत्रे वगैरे शतावधि साधनावरून असे स्पष्टपणे दिसून येते की, महाकाव्ये, नाटके, प्रशस्त्या, इतिहासादिकासारखे मोठमोठे साहित्यग्रथ आणि जैनाचार्यांचे धर्मग्रथ शिलादिकावरच खोदून काढलेले आहेत कागदावर अथवा भूर्जपत्रावर लिहिलेली वस्तु एकवेळ नष्ट होईल परतु शिला अथवा ताम्रपत्रें याजवर खोदलेला लेख सहसा नष्ट होऊ शकत नाही म्हणूनच हजार बाराशे वर्षांच्या सतताघातानतरही थोड्या प्रमाणावर का होईना पण प्राचीन साहित्य आज उपलब्ध होत आहे गगाधरकविविरचित ‘मडलीकचरित’, अकराव्या शतकात लिहिलेली ‘भर्तृपट्टाची प्रशस्ति’, ‘हमीरमदमर्दन’ नाटक, वीसलदेवकृत ‘हरकेली’ नाटक, सोमेश्वरकविकृत ‘ललितविग्रहराज’ नाटक, नयनचद्रसूरिकृत ‘हमीर महाकाव्य’ इत्यादि अनेक लहान मोठे ग्रथ शिलादिकावरच लिहून ठेवलेले आहेत प्राचीन कालापासून तो तहत अलीकडे अकबराच्या कालापर्यंत ज्यावर इतिहास, काव्ये, नाटके इ० ग्रथ खोदलेले आहेत असे शिलाखड सापडतात राजे, सरदार, श्रीमत लोक इत्यादिकाकडून मठ-मदिरे व यती–पुरोहित इत्यादिकाना देण्यात आलेल्या देणग्या, इनामे, जहागिरी, वगैरेची दानपत्रे ताम्रपत्रावर खोदलेली आहेत

**५. इतिहासलेखनाची पद्धति.** ह्या उपलब्ध प्राच्य साधनावरून केवळ प्राचीन राज्याचा राजकीय इतिहासच आढळून येतो असे नाही, तर साहित्य, कला, शिल्पशास्त्र, लिपिशास्त्र, राज्यसस्था, समाज व धर्मसस्था इत्यादिकाचाही इतिहास सापडतो मदिरे, तलाव, विहिरी अथवा मोठमोठे विशाल स्तूप वा स्तम्भ बाधून त्यावर प्राचीन कालातील अन्य देशाप्रमाणेच राजस्थानातही सर्व गत वृत्तात लिहून ठेवण्याची पद्धति असल्यामुळे साहित्य व कला या उभयताचे प्रवाह बरोबरच वाहत आले आहेत भरतवर्षांतील लोकाना इतिहास लिहून ठेवण्याची सवय नाही असा आक्षेप त्याच्यावर अनेक देशी–विदेशी विद्वानाकडून घेण्यात येतो परतु हा आक्षेप घेणारानी आमच्या सस्कृतीशी अगदीच भिन्न सस्कृतीच्या लोकानी या देशावर किती भयकर आघात केले, त्यात आमचे वाङ्मय,

सस्था, कला इ० अनेकविध गोष्टी कशा नाश पावल्या—नव्हे बुद्धिपुर सर नष्ट करण्याचा कसा प्रयत्न करण्यात आला, इग्रजी राज्य आल्यावर सुद्धा नूतन प्रभूनी व त्याच्याबरोबरच जर्मन, फरेंच, डच इत्यादि सशोधकानी या देशातील सस्कृतीचे असे लहान मोठे सस्कृत प्राकृत हस्तलिखित ग्रथ, शिलालेख, ताम्रपत्रे इ० साधने शेकडो हजारोच्या प्रमाणात कशी आपापल्या देशात लाबविली व तेथील वस्तुसग्रहालयात साठवून ठेविली, इग्रजी अमदानीच्या प्रारभी या देशात जे मोठमोठाले दुष्काळ पडले व भीषण स्वरूपाचे साथीचे रोग पसरले त्यात साहित्यसेवी विद्वानाची मोठमोठी कुटुबेच्या कुटुबे कशी गारद झाली असावीत व त्याच्या घरी सगृहीत केली असलेली त्याच्या पूर्वजाची ग्रथसपत्ति कशी नाश पावली असावी, इत्यादि अनेकविध गोष्टी लक्षात घेणे अवश्य आहे

वास्तविक राजपुतानी निर्माण केलेल्या ऐतिहासिक साहित्याविषयी याच प्रकरणात पुढे विवरण येणारच आहे परतु जाता जाता येथे भारतीयात इतिहासलेखनाची प्रथा होती व त्याच्या अन्य अनेक विषयावरील ग्रथाबरोबरच ऐतिह्य ग्रथाचाही कसा नाश झाला असावा याचा उल्लेख करावासा वाटला इतकेच !

**६. राणा कुंभाची साहित्यिक योग्यता.** सामान्यत राजपूत राजे मोठे सुविद्य असत त्याच्यापैकी बहुधा प्रत्येकाच्या बाबतीत "तो मोठा विद्वान् होता, तो स्वत कवि असून विद्वानाचा परामर्ष घेणारा होता," असेच उद्गार सापडतात त्यापैकी अनेकानी स्वत ग्रथरचना केली असून आपल्या आश्रयाखाली निरनिराळ्या विद्वानाकडून ग्रथरचना करविलीही आहे इतिहास, काव्य, नाटक, सगीत, शिल्प, आयुर्वेद, ज्योतिष इत्यादि अनेक शास्त्रावर त्यानी स्वत ग्रथरचना केली आहे अथवा विद्वानाकडून करविली आहे मेवाडच्या गादीवर जितके राजपुरुष बसले त्यात अक्षरशत्रु असल्याबद्दल एकाचाही उल्लेख आढळत नाही

समस्त राजपूत राजामध्ये राणा कुभकर्ण उर्फ कुभ याचा विशेष उल्लेख करण्यासारखा आहे राणा कुभाच्या साहित्यसेवेचा वृत्तान्त राजपूत राजाच्या उपलक्षणार्थ येथे देत आहे राणा कुभ १५ व्या

शतकात झाला राणपूरच्या प्रसिद्ध जैनमदिरातील शिलालेखामध्ये त्याचा पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे —

" प्रथित हिदुसुरत्राणबिरुदस्य, सुवर्णसत्रागारस्य, षड्दर्शनधर्माधारस्य, चतुरगवाहिनीवाहिनीपारावारस्य, कीर्तिधर्मप्रजापालनसत्वादिगुणक्रियमाणश्रीरामयुधिष्ठिरादिनरेश्वरानुकारस्य, राणाकुभकर्णसर्वोर्वीपतिसार्वभौमस्य । "

वरील लेखात राणा कुभाच्या अनेकगुणोल्लेखाबरोबरच तो '**षड्दर्शनधर्माधार**' होता असे म्हटले आहे त्यावरून हिंदुतत्त्वज्ञानाच्या सहाहि दर्शनामध्ये तो पारगत असल्याचे दिसून येते त्याचप्रमाणे चितोडच्या सुप्रसिद्ध कीर्तिस्तभावर खोदण्यात आलेल्या प्रशस्तीमध्ये कुभाविषयी—

"किर्ति शेषसरस्वतीविजयिनी यस्यामला भारती।"

असे स्वच्छ उद्गार काढले आहेत राणा कुभाने कुभलगड उर्फ कोमलमीरचा जो सुप्रसिद्ध किल्ला बाधला त्यात त्याचे आज्ञेवरून 'कुभलगड-प्रशस्ति' नामक काव्य खोदण्यात आले असून सदर काव्यात त्याच्या कारर्कार्दीचे बरेच वर्णन आले आहे परतु 'एकलिंगमाहात्म्य' नामक जो ग्रथ कुभाने रचविला त्यात त्याची सर्वात उत्कृष्ट अशी साहित्यिक योग्यता व सर्वज्ञता खालीलप्रमाणे वर्णन केली आहे—

वेदा यन्मौलिरत्न स्मृतिविहितमत सर्वदा कठभूषा
मीमासे कुडले द्वे हृदि भरतमुनिव्याहृत हारवल्ली ।
मर्वांगीण प्रकृष्ट कवचमपि परे राजनीतिप्रयोगा
सार्वज्ञ बिभ्रदुच्चैरगणितगुणभूर्भासते कुभभूप ॥

"ज्याने वेद हा चूडामणि, स्मृतिमान्य मत कठाभरण, मीमासा (दोन) ही कुडले, भरत मुनीचे शास्त्र हा छातीवर रुळणारा हार, अनेक राजनीतीचे प्रयोग हेच सर्वांगकवच धारण केले आहे असा सर्वज्ञता धारण करणारा कुभराणा अगणित गुणाची खाण भासतो" वरील श्लोकाच्या पुढील श्लोकातच '**अष्टव्याकरणी**', '**षट्तर्की**', 'साहित्याच्या रगभूमीवर क्रीडा करणारा,' 'सिद्धाताच्या घनदाट अरण्यात वसति करणारा' अशा प्रकारचा कुभ नृपति 'प्रज्ञास्फुरत्केसरी' असल्याबद्दल वर्णन आले आहे

**७. संगीतशास्त्राचा मार्मिक अभ्यासू** एवच राणा कुभ साहित्यशास्त्राचा अष्टपैलू उपासक तर होताच, पण त्याबरोबरच कला व सौदर्य यावाही तो अतिशय भोक्ता होता याबद्दलही प्रमाणे उपलब्ध झाली आहेत विशेषत सगीतशास्त्राचा तो मोठा मार्मिक अभ्यासू असून त्या शास्त्रावर त्याने स्वत ग्रथरचना केली असल्याबद्दल चितोडच्या ‘किर्तिस्तम्भप्रशस्ती’मध्ये उल्लेख केला आहे

आलोड्याखिलभारतीविलसित सगीतराज व्यधात् ।
औद्धत्यावधिरजसा समतनोत् सूडप्रबन्धादिकम् ॥

“अखिल भारतीच्या विलासाचे आलोडन करून त्याने ‘सगीतराज’ व ‘सूडप्रबन्ध’ नामक ग्रथाची रचना केली ”—

असे सदर प्रशस्तीतच म्हटले आहे कुभाने ‘सगीतमीसासा’ नामक आणखी एक ग्रथ गायनशास्त्रावर रचला असल्याचाही उल्लेख आहे. सगीतज्ञाना मुग्ध करून सोडणाऱ्या जयदेव कवीच्या ‘गीतगोविद’ नामक काव्यावर त्याने ‘मुरारिरसप्रस्यन्दिनी’ अशी ‘रसिकप्रिया’ नामक आनद उत्पन्न करणारी टीका लिहिली असल्याबद्दलही सदर प्रशस्तीत म्हटले आहे, आणि ह्या टीकेमध्ये–

‘यस्यानगकुतूहलैकपदवी कुभल्लदेवी प्रिया’

आणि ‘महाराज्ञी श्री अपूर्वदेवीहृदयाधिनायेन महाराजाधिराजश्रीकुम्भकर्णमहीमहेद्रेण’ अशा शब्दात आपल्या कुभल्लदेवी व अपूर्वदेवी ह्या दोन प्रिय राण्याचा मोठा औचित्यपूर्वक उल्लेख करून कुभाने स्वत ची रसज्ञता व शृगारप्रियता प्रकट केली आहे ‘सगीतरत्नाकर’ नामक ग्रथावरही त्याने टीका लिहिली आहे गीतगोविदाच्या कर्त्याप्रमाणेच कुभानेही विविध रागतालामध्ये गाण्यासारखी अनेक देवताची गीते लिहिली आहेत, त्याचा एकलिंगमाहात्म्य नावाच्या ग्रन्थात ‘कुभकर्णमहेन्द्रेण विरचिते मुखवाद्यक्षीरसागरे रागवर्णनो नाम ’क अध्यायात सग्रह करण्यात आला आहे

“सकलकविनृपालीमौलिमाणिक्यरोचि–
र्मधुररणितवीणावाद्यवैशद्यबिन्दु । ”—

ह्या कीर्तिस्तम्भप्रशस्तीतील श्लोकात कुभाला **सकलकविनृपालौ०** म्हणजे सर्व कवीचा राजा आणि **वीणावाद्यवैशद्यबिंदुः** म्हणजे वीणा वाजविण्यात कुशल व त्यातून मधुर मधुर स्वरालाप काढणारा, रसाळ-वाणीचा व त्यामुळेच प्रेमरूपी चातकावर पयोदाप्रमाणे वृष्टि करणारी अशी रसभावपूर्ण दृष्टि धारण करणारा इत्यादि विशेषणानी गौरविले आहे ह्याव्यतिरिक्त त्याने कर्नाटक, मेदपाट (मेवाड), सुमहाराष्ट्र इत्यादि ठिकाणच्या भाषाचे ज्यात प्रयोग केलेले आहेत अशी चार उत्तम नाटके देखील लिहिली आहेत नाटचशास्त्रावर त्याचा उत्कृष्ट अधिकार असून त्याला तत्कालीन विद्वानानी **अभिनव भरतमुनि** अशी पदवी मोठ्या बहुमानाने अर्पण केली होती नाटचशास्त्राच्या बाबतीत नदिकेश्वराचे मत त्यास विशेष ग्राह्य असावे असे त्याच्या 'नदिकेश्वरमतानुवर्ती' ह्या विशेषणावरून दिसून येते

८ **शिल्पशास्त्रावरील ग्रंथरचना.** राणा कुभाने सगीत व नाटचशास्त्रावर रचलेल्या ग्रथाविषयी वर वर्णन केलेच आहे 'कुभल-गडप्रशस्ति' व 'कीर्तिस्तम्भप्रशस्ति' हे काव्यग्रथ असले तरी प्राधान्ये-करून ऐतिहासिक आहेत व कुभापूर्वीच्या अनेक राजाची वर्णने त्यात आली आहेत काव्य, इतिहास, नाटच, सगीत इत्यादि विषयावरील ग्रथा-बरोबरच त्याने शिल्पशास्त्रावर देखील इतराकडून ग्रथरचना करविली आहे 'देवतामूर्तिप्रकरण', 'प्रासादमडन', 'राजवल्लभ', 'वास्तुमडन', 'वास्तुशास्त्र', 'वास्तुसार' आणि 'रूपावतार' इतके शिल्पशास्त्रावरील ग्रथ सूत्रधारमडन नामक स्थापत्यविशारदाकडून कुभाने लिहवन घेतले होते सदर सूत्रधारमडनाचा बधु नाथा व पुत्र गोविद हे दोघेही तितक्याच योग्यतेचे शिल्पज्ञ असून त्यानी अनुक्रमे 'वास्तुमजरी' आणि 'उद्धार-धोरणी', 'कलानिधि' व 'द्वारदीपिका' नामक ग्रथ कुभाच्याच आश्रया-खाली लिहिले चितोडला जो प्रसिद्ध कीर्तिस्तम्भ कुभाने उभारविला त्यावरील प्रशस्तीबरोबरच, अशा प्रकारच्या कीर्तिस्तम्भाच्या रचनेसबधी एक शिल्पशास्त्रावरील ग्रथ जय व अपराजित ह्या प्रसिद्ध शिल्पज्ञाच्या मतानुसार लिहविला

९. **सौंदर्य व कलेची मूर्तामूर्त उपासना.** राणा कुभाची साहित्यसेवा कशी व्यापक व सर्वगामी होती याची वरील वर्णनावरून कल्पना

येऊ शकेल व त्यावरूनच राजपूत राजे विद्येचे किती अनुरागी होते याचाही सहज कयास करता येईल साहित्याप्रमाणेच कुभाने केलेली कलोपासना देखील सर्वतोभद्र अशीच असून ती सुद्धा राजपूत राजाच्या सबधाने उपलक्ष-णार्थच घेतली पाहिजे सौदर्य व कला ह्याचा अमूर्त असा एक भाग जसा साहित्याशी सलग्न आहे तसाच त्याचा दुसरा मूर्त भाग वास्तुशास्त्र अथवा स्थापत्य याशी सघटित आहे साहित्यकाराची लेखणी, गायनाचार्याची वीणा अथवा चित्रकाराची कुचली रसिक मनुष्याच्या हृदयावर जो परिणाम घडविते तोच मूर्तिकाराची हातोडीही घडवून आणते म्हणूनच तिच्या प्रतापाचे वर्णन करण्यासाठी साहित्यशास्त्र्यानाही आपली वाणी व लेखणी झिजवावी लागते लेखणी, तत्री व कुचली ह्या तीनही पदार्थांपेक्षा हातोडी कठोर आहे, आणि कागद, वीणा व पट ह्याच्यापेक्षा ज्या पाषाणावर मूर्तिकारास आपले कौशल्य वेचावे लागते तो पाषाण कितीतरी पट कठोर आहे हातोडी कठोर ! दगड कठोर ! पण त्या हातोडीने त्याच दगडावर उमटणारी प्रतिमा मात्र इतकी नयनाभिराम असते, की त्या एकटीत साहित्य, सगीत व कला ह्याचे अत्युत्कट मिश्रण झालेले आढळून येते शिवाय प्रत्यक्ष दर्शनामध्ये मूर्तीची भव्यता वरील तीनही पदर्थांपेक्षा अधिक हृदयग्राही असते ती वेगळीच ! अशी स्थिति आहे म्हणूनच कलेचा मूर्तभाग शिल्पशास्त्राशी निगडित आहे असे जे वर म्हटले आहे ते अगदी यथार्थ होय

राणा कुभ सौंदर्य व कला ह्याच्या मूर्तामूर्त अशा उभय विभागाचा उपासक होता प्रस्तुत स्थळी त्याच्या सौंदर्य व कला ह्या मूर्त विभा-गाच्या उपासनेबद्दल विवरण करावयाचे आहे मेवाडच्या ८४ किल्ल्यापैकी ३२ किल्ले एकट्या कुभाने स्वत बाधविले होते त्याने चित्रकूट म्हणजे चितोडच्या किल्ल्याचा विशेष प्रबन्ध करून त्याला ‘विचित्रकूट’ म्हणजे निरनिराळ्या प्रकारच्या बुरुजानी युक्त केला होता प्रथम ह्या किल्ल्यावर जाण्यास रथमार्ग नव्हता व त्यामुळे लोकाना फार त्रास होत होता म्हणून कुभाने ‘ भव्या सद्रथपद्धतिं जनसुखायाचूलमूल व्यधात् । ’ म्हणजे लोकाच्या सुखाकरिता वरच्या टोकापर्यंत भव्य असा रथमार्ग तयार कर-विला चितोडच्या किल्ल्याच्या तटास रामरथ्या, हनुमानगोपुर, भैरवाक-

विशिखा, महालक्ष्मीरथ्या, चामुडाप्रतोली, ताराथ्या आणि राजप्रतोली नामक सुदर दरवाजे निर्माण केले. ह्या दरवाजाचे 'मनोरम, भव्य, रम्यलीलागवाक्ष, शोभायमान' ही विशेषणे लाऊन वर्णन केलेले आढळते त्यात कित्येक ठिकाणी स्फटिक, रत्ने इत्यादि बसविलेली आहेत व त्याची शोभा शरदृतूतील मेघाप्रमाणे दृश्यमान होत आहे असेही त्याविषयी म्हटलेले आहे चितोडचा भव्य विजयसूचक कीर्तिस्तम्भ कुभानेच उभारला असा भव्य व भव्यतेने अधिक शोभायमान दिसणारा विजयस्तम्भ भरतवर्षातच काय पण जगाच्या पाठीवर अन्यत्रही विरळाच आढळेल

कुभस्वामी, आदिवराह इत्यादिकाची मदिरे, रामकुड, रहाट बसविलेल्या कित्येक वापी व कूप त्याने बाधविली आहेत त्याचप्रमाणे कित्येक तलावही त्याने निर्माण करविले आहेत कुभमेरू ऊर्फ कुभलगडचा किल्ला हे त्याचे चिरस्थायी स्मारक होय भगवान् एकलिंगजीच्या मदिराचा जीर्णोद्धार करून त्यास त्याने मडप, तोरण, ध्वजादड व कळस यानी अलकृत केले अबूच्या अचलेश्वराजवळ अचलदुर्गाचीही त्यानेच प्रतिष्ठा केली कुभलगडच्या किल्ल्यात त्याने जी सुदर बाग निर्माण केली तिचे कुभलगडप्रशस्तीत पुढीलप्रमाणे काव्यपूर्ण वर्णन केले आहे —

वृन्दावन चैत्ररथ च नन्दनम् मनोज्ञभृगध्वनिगधमादनम् ।
नृपाललीलाकृतवाटिकामिषात् वसन्त्यमून्यत्र समेत्य भूधरे ।।

साराश, राजस्थानचे हिंदी इतिहासलेखक पुरातत्त्वभूषण रायबहादूर ओझाजी म्हणतात त्याप्रमाणे कुभ मोठा "विद्यानुरागी, विद्वानाचा सन्मानकर्ता, साहित्यप्रेमी, सगीताचार्य, नाट्यकलाकुशल, कविशिरोमणि, अनेक ग्रथाचा रचयिता, वेद, स्मृति, व्याकरण, दर्शने, उपनिषदे इत्यादीचा मोठा ज्ञाता, सस्कृतादि अनेक भाषात प्रवीण आणि शिल्पाचा पूर्ण अनुरागी होता त्याच्या शिल्पपरिचयाच्याच साक्षिस्वरूप चितोडचा दुर्ग, तेथील प्रसिद्ध कीर्तिस्तम्भ, कुभस्वामीचे मदिर, चितोडचा रथमार्ग व दरवाजे, एकलिंगजीचे मदिर व त्याच्या पूर्वेचा कुभमडप, कुभलगडचा किल्ला, तेथील कुभस्वामीचे देवालय, अबूवरील अचलदुर्ग इत्यादि गोष्टी आजपर्यंत विद्यमान असून त्या प्राचीनवस्तुसशोधक आणि शिल्पप्रेमी निरीक्षकास मुग्ध करून टाकीत आहेत"

**१०. साहित्यसेवी स्त्रिया.** राजपूत राजाच्या उपलक्षणार्थ राणा कुभाची साहित्यसेवा व कलाभिज्ञता याचे वर जरा सविस्तर वर्णन केले आहे पण पूर्वी सागितल्याप्रमाणे हे दोन्ही गुण बहुतेक राजपूत राजात विद्यमान होते, व ज्याच्या ज्याच्या ठिकाणी त्याना हे गुण आढळून आले त्या सर्वांचा त्यानी सादर पुरस्कार केला बाप्पा, रायमल, प्रताप, अमरसिह, राजसिह, जयसिह, सवाई जयसिह इत्यादि अनेक राजपूत राजाची उदाहरणे याबाबत देता येण्यासारखी आहेत त्या प्रत्येकाच्या साहित्यसेवेचे पृथक् वर्णन करतो म्हटल्यास ते ह्या एवढयाशा ग्रथात तरी शक्य नाही याप्रमाणे राजस्थानचे राजपुरुषच साहित्यसेवी, विद्वानाचा परामर्ष घेणारे व विद्येस उत्तेजन देणारे झाले असे नव्हे तर त्याच्या घराण्यातील अनेक स्त्रियानीही या बाबतीत चागले नाव कमाविले आहे वैराग्य, साधुत्व, प्रेमळपणा, भगवद्भक्ति वगैरे गुणानी प्रात स्मरणीय बनलेल्या एकटचा मीराबाईचेच नाव वरील विधानाची सत्यता पटविण्यास पुरेसे आहे तिचा सतानुराग, तिची भक्तिरसाने ओथबलेली मधुर पदे, त्यामध्ये दिसून येणारा तिचा साहित्य व शास्त्र याचा व्यासग, भगवताच्या ठिकाणी असलेली तिची अपूर्व निष्ठा व तदर्थ प्राणासह वाटेल तो स्वार्थत्याग करण्याची तिची तत्परता, यामुळे तिचे नाव राजस्थानातच काय पण उभ्या भरतवर्षांत सर्वतोमुखी झाले आहे या देशात असे एक तरी हिदूचे घर असेल काय की, ज्यात 'मीरा का प्रभु गिरिधर नागर' तिच्याच शब्दात आळविला जात नसेल ? भक्तिपर पदाच्या बरोबरच गीतगोविंदाच्या धाटीवर 'रागगोविंद' नामक तिच्या गीतकाचा सग्रहही उपलब्ध झाला आहे मीराबाईप्रमाणेच किरणमयी, चपादे, कर्णावती इत्यादि अनेक राजस्त्रियाची उदाहरणे देण्यासारखी आहेत

**११ कर्नल टॉडचा अभिप्राय.** राजस्थानचा इतिहासलेखक कर्नल टॉड म्हणतो—"छगताई (मोगल) घराण्यातील राजाच्या साहित्यिक योग्यतेशी त्याच्या समकालीन युरोपियन राजाच्या साहित्यिक योग्यतेची जर तुलना केली तर आशियाखडातील राजाचेच पारडे जड भरेल मग युरोपच्या बाजूने पारडयात एलिझाबेथ व फरान्सचा चौथा हेन्री असले तरी पर्वा नाही मोगल राजात इतिहासकार, कवि,

ज्योतिषी, राज्यसस्थाचे प्रस्थापक, धर्मप्रणेते, योद्धे व सेनानी इत्यादि गुणान्वित पुरुष झाले ते आजही सादर प्रशसेस पात्र आहेत" या प्रमाणे युरोपीय व मोगल राजे याची तुलना करून राजपूत राजाच्या योग्यतेविषयी कर्नल टॉडच पुढे म्हणतो—"मेवाडच्या राजाची केवळ पत्रे जरी जमा केली व वाचली तरी त्यावरून सुद्धा ते इतर सर्व मनुष्यजातीपेक्षा श्रेष्ठ आहेत असे दिसून येईल आपल्या पूर्वजाच्या ज्ञानाविषयी ते जे काही बोलत असतात तो केवळ भाषेचा अलकार नव्हे त्यात सत्यार्थच भरलेला असतो त्याना जी शिकवणूक देण्यात येते तिला अत्यत पवित्र मानण्यात येते आणि युरोपातील कोणत्याही विश्वविद्यालयीन शिक्षणापेक्षा ती अधिक जबाबदारीची अतएव श्रेष्ठ दर्जाची असल्याचे दिसून येते कारण त्याच्या शिक्षणातून मनुष्यास आवश्यक अशी ज्ञानाची एकही शाखा वगळली जात नाही " परतु अद्याप पावेतो राजपूत राजाच्या वास्तविक योग्यतेचा यथार्थ इतिहास निर्माण झालेला नसल्याने व सामान्य वाचकाचे ज्ञान इग्रजी व तदनुकारी देशी इतिहासकारानी विकृत करून ठेवलेले असल्याने त्याची आपणास नीटशी कल्पना येऊ शकत नाही

**१२. सरस्वतीच्या मंदिरांतील दालनें** आतापर्यंत उपलब्ध झालेल्या साधनावरून पाहता राजस्थानात निर्माण झालेल्या साहित्याचे काव्येतिहासविषयक, नाट्यविषयक, धार्मिक आणि शास्त्रीय असे विभाग पडतात शास्त्रीय विभागात आयुर्वेदशास्त्र, शिल्पशास्त्र, सगीतशास्त्र, ज्योतिषशास्त्र इत्यादि शास्त्राचा अतर्भाव होतो आयुर्वेदशास्त्रात पशु व मनुष्य या उभयताच्या चिकित्सेच्या ज्ञानाचा, गायनशास्त्रात गायन-वादन-नर्तन इत्यादि उपशास्त्राचा आणि ज्योतिषशास्त्रात खगोलज्ञान, राशिज्ञान, गणितशास्त्र इत्यादिकाचा समावेश होतो सरस्वतीदेवीच्या मदिरातील आजपर्यंतच्या उपलब्ध दालनापैकी हीच प्रधान दालने होत हे कोणासही कबूल करावे लागेल

समाजाच्या सुधारणेचे आणि जिवतपणाचे एकमात्र लक्षण म्हणजे त्याची वर्धमान ज्ञानपिपासा हे होय एखादा समाज या ज्ञानाविष्काराच्या बाबतीत एक पाऊल पुढे असेल, एखादा मागे ! पण या पथावर चाल-

णारा प्रत्येक समाज सुधारलेला व सुसस्कृत असाच समजला पाहिजे या दृष्टीने पाहिले असता राजपुताचा समाज कोणाही पाश्चिमात्य समाजापेक्षा मागासलेला अथवा असस्कृत होता असे कोणासही म्हणता येणार नाही किबहुना विद्याभिरुचि व ज्ञानार्जन या बाबतीत कित्येक प्रसगी तो पुढेच असलेला आढळून येईल पुढील विवरणावरून त्या काळीं ज्ञानाच्या उपलब्ध असलेल्या वर वर्णिलेल्या बहुतेक सर्व शाखात त्याने प्रशसनीय प्रगति केली होती असे दिसून येईल व त्यायोगे भारतीय सस्कृतीच्या गौरवात त्याने मोठी भर टाकली आहे असेच कोणासही कबूल करावे लागल.

**१३. काव्येतिहासाच्या गंगायमुना.** काव्य आणि इतिहास हे अनोन्यसश्रयी विषय होत त्या दोहोचेही प्रवाह सर्वदा एकमेकात मिसळून वाहत असतात इतिहासाचा प्रवाह म्हणजे गगा होय तर काव्याचा यमुना ! गगेच्या सुनिर्मल व सिकताशुभ्र जलाप्रमाणे इतिहास विशुद्ध व सशोधित अशा सत्य घटनावर उभारलेला असतो, तर यमुनेच्या अथवा कालिदीच्या नीलमनोहर जलाप्रमाणे काव्याची प्रतिभा कल्पनेच्या लहरीवर विलास करीत असते इतिहास व काव्य ह्याच्या गगायमुना उत्तानदृष्टि मनुष्यास जरी भिन्न भिन्न दिसत असल्या तरी तत्त्वदर्शी मनुष्यास त्या सलग्न होऊन एकरूपाने वाहत आहेत असेच आढळून येईल सहृदय मनुष्याच्या अत करणात अनुकूल सवेदना उत्पन्न करण्यासाठी इतिहासातील रोमाचकारी कथानके कवि निवडून घेतो व आपल्या प्रतिभेचे सोनेरी पाणी चढवून त्यास अधिक रमणीय स्वरूप प्राप्त करून देतो इतिहासातील शुद्ध व सत्य घटनाना त्याच्या निर्व्याजमनोहर स्वरूपात निवडून त्यावर आपल्या विभिन्न रसाचा पोषाख आणि विविध अलकाराची आभूषणे कवि चढवितो व त्याना लोकाच्या समोर ठेवतो अशा तऱ्हेने काव्याची उभारणी प्राय ऐतिहासिक घटनावरच होत असल्याने काव्यातून इतिहास व इतिहासातून काव्यविषय तत्त्वान्वेषी वाचकास विविक्त करून घ्यावे लागतात ह्यूमसारख्या पाश्चिमात्य तत्त्वज्ञानेही "कवि आपल्या कल्पनेच्या भरारीने निश्चित स्वरूपाचा इतिहास कितीही विकृत करीत असला आणि विलक्षण निरकुशतेने सत्यास हवे तसे रूप देत असला तथापि त्यालाही आपल्या अतिरिक्त अतिशयोक्तीना इतिहासाच्याच साधारण

पायावर उभे करावे लागते, " ह्या आपल्या प्रसिद्ध वचनात हेच तत्त्व प्रतिपादन केले आहे राजपुताच्या इतिहासाकडे पाहताना हेच तत्त्व दृष्टीसमोर ठेवणे अवश्य आहे राजस्थानातील साहित्योपासकानी राजस्थानचा इतिहास काव्याच्या रूपात वर्णिलेला आपणास आढळेल तेव्हा राजस्थानी सस्कृतीच्या अभ्यासकाने विवेचकबुद्धीने इतिहास कोणता व काव्य कोणते याची योग्य निवड करून ती वाचकासमोर माडली पाहिजे

१४. **चारणांची अभिनव संस्था.** कोणाही अन्य देशापेक्षा राजस्थानात प्राचीन पूर्वजाचा इतिहास कायम ठेवण्याची पद्धति अभिनव आहे ती म्हणजे चारणाची होय राजस्थानातील प्रत्येक राजाच्या—राजाच्याच काय, सरदाराच्या देखील—पदरी चारण बाळगलेले असतात ह्या चारणाचे काम आपल्या धन्याच्या व त्याच्या पूर्वजाच्या सपूर्ण वशाचा इतिहास अवगत करून घेणे, कठस्थ करणे आणि जरूर पडेल त्या वेळी निवेदन करण्यास सिद्ध असणे हे होय केवळ राजाच्या दरबारात बसून राज्यात घडणाऱ्या घटनाची दप्तरात नोद करणाऱ्या बखरकारापेक्षा अथवा तवारिखवाल्यापेक्षा या चारणाचे काम फार वेगळे आहे. केवळ वशावळया जतन करून ठेवणे एवढेच त्याचे काम नाही, तर मोठमोठया कीर्तिमान पुरुषाचे पराक्रम व त्याची अन्य भव्य कृत्ये निवडून त्यावर स्फूर्तिप्रद काव्यरचना करणे आणि प्रसगानुसार आपल्या कवितागायनाने देशातील लोकाना, सरदाराना व राजानाही महत्कार्य सपादनासाठी उत्स्फूर्त करणे हेही काम त्यास करावे लागते देशातील सरदार आपापल्या सेनेसह जेव्हा शत्रूशी सामना करण्यासाठी जातात तेव्हा हे चारणही कटीस कृपाण बाधून त्याच्याबरोबर समरागणावर उपस्थित असतात व युद्धाच्या ऐन धुमाळीत आपल्या स्फूर्तिप्रद गायनाने स्वपक्षाच्या सैनिकाच्या ठिकाणी आवेश निर्माण करतात चारण स्वत उत्तम लढवय्ये असून जातीने शत्रूवर प्रहार करीत असताना अथवा शत्रूचा प्रत्याघात सहन करीत असतानाही आपल्या पूर्वजाच्या यशाचे पोवाडे ते गातच असतात, त्यामुळे स्वपक्षातील सैनिक कितीही अल्पसख्य असले तरी त्याच्या ठिकाणी शत्रूबरोबर प्राणपणाने लढण्याची विलक्षण स्फूर्ति उत्पन्न होते राजस्थानात ह्या चारणाची एक स्वतत्र जातीच असून

त्याना वशपरपरेने तेच कार्य करावे लागते चारणाच्या मुलास बालपणापासूनच आपल्या देशाचा सपूर्ण इतिहास अवगत करून घ्यावा लागतो व त्यावर स्फूर्तिप्रद गाणी रचण्याचा अभ्यास करावा लागतो वशपरपरा कराव्या लागणाऱ्या ह्या कार्याची त्याच्या ठिकाणी इतकी अभिजातवृत्ति दिसून येते की, भरसभेत अथवा भरयुद्धात तेथल्या तेथे चालू प्रमगावर ताबडतोब गाणी रचून ती मोठ्या आवेशयुक्त वाणीने खड्या सुरात गाऊन दाखविणे ही गोष्ट त्याना मुळीच कठोण वाटत नाही किबहुना एखाद्या नवख्या माणसाने एखाद्या राजदरबारात जाऊन मी चारण आहे असे सागितले की, त्यास एखादी समस्या अथवा प्रसग देऊन त्यावर तेथेच गीत रचण्यास सागतात व या परीक्षेत जो उत्तीर्ण होईल त्यासच खरा चारण समजण्यात येते

१५. **‘कामधेनू तडव करिय.’** ह्या चारणाना सर्वकाळ व्यवस्थित राजाश्रय मिळालेला आहे राणा कुभाने मात्र चारणाना काहीकाळ निर्वासित केल्यासबधीची एक आख्यायिका सागितली जाते एका ब्राह्मणाने ‘तू एका चारणाच्या हातून मरशील’ असे भविष्य सागितल्यावरून ह्या राण्याने सर्व चारणाना देशाबाहेर हाकून लावले होते त्यानतर एके दिवशी देवदर्शनास जात असताना मदिरासमोर एक गाय वीत असताना राणा कुभाने पाहिली, तेव्हापासून त्यास उन्माद रोग झाला अनेक उपचारानीही तो बरा होण्याचे लक्षण दिसेना त्या उन्मादाचे एक लक्षण असे की कोणी काहीही प्रश्न विचारला तरी ‘कामधेनू तडव करिय’ या चरणाचा तो उच्चार करी त्या वेळी एक चारण गुप्तपणे राण्याच्या एका सरदाराजवळ जाऊन राहिला होता तो सदर सरदाराबरोबर दरबारात गेला असता नेहमीप्रमाणे कुभाने ‘कामधेनू तडव करिय’ हा चरण म्हटला त्या वेळी त्या गुप्तवेषधारी चारणाने मारवाडी भाषेतील पुढील छप्पय बनवून म्हटला —

> जद धरपर जोवनी दीठ नागोर धरती ।
> गायत्री सग्रहण देख मनमाँही डरती ॥
> सुरकोटो तेतीस आण नीरता चारो ।
> नही चरन्त पीवन्त मनह करति हकारो ॥

कुभेण राण हणिया कलम आजस उरडर उतरिय ।
तिण दीह द्वार शकर तणै 'कामधेनु तडव करिय' ॥

भावार्थ—"नागोरमध्ये गोहत्या होत असलेली पाहून गायत्री फार भीत होती तेतीस कोटी देवता तिच्याकरिता चारापाणी आणीत होत्या पण ती खातपीत नव्हती जेव्हापासून राणा कुभाने कलमा पढणाऱ्या मुसलमानाना मारून नागोर जिंकले व गाईंची रक्षा केली, तेव्हा गायही हर्षित होऊन शकरजीच्या द्वारावर ताडवनृत्य करीत आहे" हा छप्पय ऐकून महाराण्याचा उन्माद गेला व तो फार प्रसन्न झाला पण त्याने त्या गुप्त चारणास 'तू साधारण राजपूत नसून चारण असला पाहिजेस' असे म्हणून ओळखले, व आपला उन्माद दूर करणाऱ्या त्या चारणास व त्याच्या सर्व जातभाईंस त्याच्या जहागिरी परत दिल्या

एखाद्या पराजयाने आपल्या देशाचा राजा हतोत्साह झाला असता हे चारण त्याच्यासमोर जाऊन त्याच्या निष्क्रियतेबद्दल त्यास दोष देतात, व पुन त्याने शत्रूवर आक्रमण करण्यासाठी त्यास प्रेरित करतात ह्या विषयीचे सर्वांत प्रसिद्ध उदाहरण म्हणजे राणा सगाचे होय बाबराने केलेल्या पराजयामुळे जेव्हा राणा सग अत्यत निराश झाला तेव्हा 'बारहठजमणा' नावाचा एक चारण त्याच्या जवळ गेला व त्याने त्यास पुढील गीत ऐकविले—

सनबार जरासध आगळ श्रीरग, बिमुहा टीकम दीध बग ।
मेळी घात मारे मधुसूदन, असुर घात नाखे अळग ॥१॥
पारथ हेकरसा हथणापुर, हटिया त्रिया पडता हाथ ।
देखजका दुरजोधण कीधी, पछै तका कीधी सज पाथ ॥२॥
इकरा रामतणी तिय रावण, मद हरेगो दह कमळ ।
टीकम सोहिज पथम तारिया, जगनायक ऊपरा जळ ॥३॥
एक राड भवमाह अवत्थी, अमरस आणै केम उर ।
मालतणा केवा ऋण मागा, सागा तू सालै असुर ॥४॥

आशय—"महाराणाजी, आपण निराश होऊ नका जरासधाने शभर वेळ पराजय केला तरी अखेरीस श्रीकृष्णाने त्यास हारविलेच

जेव्हा दुर्योधनाने द्रौपदीवर हात टाकला तेव्हा अर्जुन हस्तिनापुराहून निघून गेला खरा परतु मागाहून त्याने काय काय केले ? मूर्ख रावणाने एक वेळ सीतेचे हरण केले त्यावर रामचद्राने समुद्रावर दगडाचा सेतु बाधून कसा बदला घेतला ? हे राणाजी, एक वेळ हरल्यामुळे तुला इतके दु ख करण्याचे कारण नाही तू असुराच्या ( यवनाच्या ) करिता अद्याप दु खरूप होऊ शकशील ? ” हे गीत ऐकल्याबरोबर राणा सगाची उदासीनता पार नष्ट होऊन बाबरावर सूड उगविण्याचा त्याने पुन निश्चय केला परतु लवकरच तो मरण पावल्यामुळे त्यास आपली प्रतिज्ञा पूर्ण करता आली नाही. प्रतिपादनाचा मथितार्थ इतकाच की राजस्थानात चारणाच्या रूपाने पूर्वजाचा इतिहास कायम टिकविणारी सस्था प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे चारणाच्या गीताना साहित्याच्या दृष्टीनेही फार मोठी किमत आहे राजपूत राजानी त्याच्या उपजीविकेचा उचित प्रबन्ध करून ही सस्था जिवत ठेवली आहे

आत्यतिक अध पाताच्या व विपत्तीच्या काळात सुद्धा राजपूत राजानी चारणवर्गावर आपले कृपाछत्र धरून त्याचा योग्य परामर्ष घेतला होता हे पुढील आख्यायिकेवरून लक्षात येण्यासारखे आहे एक वेळ काही चारणानी मेवाडचा राणा भीमसिहाची प्रशसा केली असता त्याने त्याना यथोचित पुरस्कार दिला परतु त्यापैकी एकास काहीच मिळाले नाही त्यामुळे दुसरे चारण त्यास खिजवू लागले तेव्हा ‘तुम्ही तर महाराण्याची प्रशसा करून धन मिळविले, परतु मी आता निदा करून मिळवितो पहा ! ’ असे म्हणून एके दिवशी भीमसिहाची स्वारी कुठे बाहेर जात असताना तो रस्त्यात वाट अडवून उभा राहिला व उच्चस्वराने ओरडून म्हणाला— ‘भीमा तूभाटाह मोटा मगरा मायलो’—‘हे भीमसिह तू एखाद्या पर्वतावरील दगड आहेस ’ त्याच्या ह्या निंदेने महाराण्याचे चोपदार त्यास दटावू लागले परतु भीमसिहाने त्याच्या अत करणात काही दु ख असावे हे जाणून त्यास जवळ बोलाविले व त्याची एकदर हकीकत ऐकून त्यास सर्वापेक्षा अधिक पुरस्कार दिला तेव्हा चारणाने पुढील चरण म्हणून आपला सोरठा पुरा केला—‘कर राखूं काठोह शकरज्यू सेवा करू’—‘परतु तुला यत्नपूर्वक साभाळून आम्ही तुझी शकराप्रमाणे सेवा

करू !' महाराणा त्यामुळे अधिकच प्रसन्न होऊन त्यास पुनश्च पारितोषक देता झाला याप्रमाणे काव्याची शर्करा मिसळून इतिहासाचे मूळचेच मधुर दुग्ध राजस्थानचे चारण स्वत प्राशन करीत व आपल्या राजाना, सरदाराना व त्याच्या प्रजाजनानाही पाजीत अशा तऱ्हेने राजस्थानात मूलत च काव्य व इतिहास याचे प्रवाह एकाच पात्रातून एकात एक मिसळून वाहत आले आहेत

**१६. काव्येतिहासविषयक ग्रंथ व ग्रंथकार.** वरील वर्णनावरून फक्त चारणानी इतिहास मुखोद्गत करण्याचाच प्रघात राजस्थानात होता, लिहिण्याचा नव्हता असे जर कोणी समजेल तर ते साफ चुकीचे होईल कर्नल टॉडच्या वेळेस सशोधनकार्य इतकेसे प्रगल्भ झाले नसल्याने त्यास प्रामुख्याने चारणाच्या तोडून ऐकलेल्या हकीकतीवरच आपल्या सुप्रसिद्ध ग्रथाची उभारणी करावी लागली चारणाच्या वीररसप्रधान गीतानी व त्यातून उमटणाऱ्या राजपुताच्या उदात्त इतिहासाने टॉडला मुग्ध करून सोडले होतें परतु आता नवीन सशोधनानतर चारणाच्या मौखिक गीतकाच्या साधनापेक्षा अव्वल दर्जाची ऐतिहासिक लिखित साधने उपलब्ध झाली आहेत त्यावरून इनिहास लिहून ठेवण्याचीही पद्धति राजपुतात होती असे आता निश्चयाने सिद्ध झाले आहे चारणाच्या तोडचा वृत्तात ऐकीव व पुष्कळ पिढ्यापूर्वीचा ! आजाच्या तोडून बापाच्या तोडी व बापाच्या तोडून मुलाच्या तोडी जाताना त्यात विकृति होण्याचा बराच सभव असल्याने तो स्फूर्तिदायक असला तरी अस्सल ऐतिहासिक समजण्यात येत नाही परतु समकालीन लेखकानी अथवा कवीनी आपला वृत्तान्त समक्ष अवलोकन करून अथवा प्रामाणिकपणे श्रवण करून लिहिलेला असल्याने त्याचे मूल्य अर्थातच अधिक आहे प्राचीन काळी सामान्य वृत्तान्तही गद्यापेक्षा पद्यातच लिहून ठेवण्याचा प्रघात असल्याने राजस्थानच्या आर्यांनीही तोच क्रम पुढे चालविला आणि निरनिराळ्या राजाचे वृत्तान्त काव्यबद्ध करून लिहून ठेवले

सातव्या शतकापासूनचे अशा प्रकारचे वृत्तात शिलालेखादिकावर कोरलेले सापडतात इ० स० ६६१ मधला असाच एक शिलालेख सापडला असून त्यात बाप्पादित्याचाही आद्य पूर्वज जो गुहिल उर्फ गुहादित्य

त्याच्या वशजाची प्रशस्ति लिहून ठेविली आहे ‘ ह्या प्रशस्तीतील कविता मोठीच मनोहर असून तिचा लेखक चागला विद्वान् असला पाहिजे’ असा तज्ज्ञाचा अभिप्राय आहे इ० स०च्या १० व्या शतकातील एक शिलालेख उपलब्ध झाला असून त्यात मेवाडचा राणा भर्तृपट्टाच्या कारकीर्दीचे वर्णन लिहून ठेवलेले आढळते मेवाडच्या भर्तृपट्टाने महाराष्ट्रातील राष्ट्रकूटाच्या महालक्ष्मीनामक कन्येशी विवाह केला व तिच्या पोटी अल्लट नामक सुविख्यात पुत्र उत्पन्न झाला—

राष्ट्रकूटकुलोद्भूता महालक्ष्मीरिति प्रिया ।
अभूदस्याभवत्तस्या तनय श्रीमदल्लट ॥

असे त्याच प्रशस्तीमध्ये वर्णन केले आहे ह्या अल्लटाच्याही वेळचा म्हणजे दहाव्याच शतकातला आणखी एक शिलालेख उपलब्ध झाला असून त्यात अल्लट, त्याची माता लक्ष्मी, पुत्र नरवाहन, त्याच्या दरबारातील मुख्यमत्री, सधिविग्राहक (परराष्ट्रीयमत्री), अक्षपटलिक ( फडणीस उर्फ अर्थसचिव), भिषगाधिराज ( सार्वजनिक आरोग्यखात्याचा प्रमुख ) इत्यादि प्रसिद्ध दरबारी मत्र्याची नामावली दिली आहे तसेच तत्कालीन एकदर सामाजिक परिस्थितीचेही त्यात वर्णन आहे तसेच आहाडच्या देवकुलिकेस (उपमंदिरास) लावण्यात आलेल्या एका छिन्नभिन्न शिलाखडावरही अल्लटाच्या एका युद्धाचे व त्याच्या पराक्रमाचे वर्णन लिहून ठेवलेले आढळते असेच आणखीही कित्येक तत्कालीन राजकीय व सामाजिक परिस्थितीवर प्रकाश टाकणारे शिलालेख उपलब्ध झालेले असल्याने त्यामुळे सातव्या शतकापासून राजपुताचा इतिहास निर्माण करण्यास बरीच मदत झाली आहे ह्यानतर जया नामक एका प्रसिद्ध काश्मिरी पडिताने रचलेले ‘पृथ्वीराजविजयमहाकाव्य’ उपलब्ध झाले असून त्यात साभरच्या चौहान राजाचे वर्णन आलेले आहे ह्या काव्यावरूनही सातव्या शतकापासून तो बाराव्या शतकापर्यंतच्या इतिहासाचे धागेदोरे हाती लागू शकतात

ह्यानतर गगाधरकविविरचित ‘मडलीकचरित’ नामक काव्य, सोमेश्वर कविकृत ‘सुरथोत्सव’ नामक काव्य, चीरव्याच्या शिलालेखावरील प्रशस्ति, ‘पद्मावत’ नामक हिंदी काव्य, नयनचद्रसूरिकृत ‘हमीरमहाकाव्य’, ‘अमरकाव्य’, ‘जगत्प्रकाशमहाकाव्य’, ‘राजप्रशस्तिमहाकाव्य’, ‘अमरसिंह-

राज्याभिषेक काव्य', 'जगद्विलास', 'कुंभलगडप्रशस्ति', 'एकलिंगमाहात्म्य', 'एकलिंगपुराण', 'भीमविलास', 'अजितोदय काव्य', 'जयदेशकाव्य', 'कीर्तिस्तम्भप्रशस्ति', 'पृथ्वीराजरासा', 'खुमाणरासा', 'राणारासा', 'हमीररासा', 'कच्छवंशमहाकाव्य', 'सुर्जनचरित','शत्रुशल्यकाव्य', 'जगदीशमंदिरप्रशस्ति', 'राजविलास', 'अमरनृपकाव्यरत्न', 'वैद्यनाथमंदिरप्रशस्ति' इत्यादि अनेकानेक काव्यग्रंथ मिळतात व त्यामध्ये राजस्थानातील उदयपूर, जयपूर, जोधपूर, बिकानेर, इत्यादि ठिकाणच्या राजपूत राजांचे सविस्तर वृतान्त लिहून ठेवलेले आढळतात ही सर्व ऐतिहासिक काव्ये संस्कृत–प्राकृत–डिंगल–हिंदी–मेवाडी–मारवाडी भाषांमध्ये लिहिलेली आहेत त्यापैकी प्रत्येकाचे थोडक्यात वर्णन करतो म्हटले अथवा त्यातील वर्ण्यविषयाचा वाचकांशी थोडासा देखील परिचय करून देतो म्हटले तरी ते एक स्वतंत्र, प्रयासाचे व विस्तृत कार्य होणार आहे व सांप्रतच्या अल्पमर्यादेत ते करणे शक्यही नाही तथापि वरील ग्रंथ व ग्रंथकारांच्या एकंदर नामावलीवरून राजपुतांमध्येही इतिहासलेखनाची पद्धति होती ही गोष्ट उत्तम रीतीने सिद्ध होत आहे राजपूत कवींमधील भूषण कवीचे नाव तर महाराष्ट्रीय वाचकांच्या विशेष परिचयाचे आहेच त्याने आपली वाग्गंगा भगीरथाच्या रथाप्रमाणे जरी शिवचरित्राच्या मागे मागे वाहविली असली, तरी समस्त राजपूत जातीच्या भावनांचाच प्रवाह तिच्या विशाल पात्रातून दुथडी भरून वाहत आहे किंबहुना भूषण कवीचे प्रत्येक कवन राष्ट्रीय वृत्तीने, दिव्य तेजाने, प्रखर स्वाभिमानाने व उज्ज्वल धर्मप्रतिभेने थबथबलेले आहे आणि त्यावरून राजपूत जाति आपल्या भावनांना कसे व्यक्त स्वरूप देत असे याची कल्पना येण्यासारखी आहे

**१७ मुहिणोत नैणसी.** या शिवाय निरनिराळ्या प्रकारच्या वंशावळ्या, ख्याति इत्यादि लिहिण्याचाही प्रघात राजपुतांमध्ये असल्याने त्यावरूनही त्यांच्या इतिहासाची माहिती मिळू शकते निरनिराळ्या राजे लोकांनी आपापल्या दरबारात अशा प्रकारच्या ख्याति तयार करविल्या असून त्यांचे स्वरूप साधारणपणे मराठी बखरींच्याप्रमाणे आहे जोधपूर व बिकानेरच्या राज्यात अशा प्रकारच्या विस्तृत ख्याति आढळतात त्या सर्वांत मुहिणोत नैणसी नामक पुरुषाने तयार केलेली ख्यात विशेष

महत्त्वाची अतएव विशेष उल्लेखनीय आहे मुहिणोत नैणसीचा जन्म विक्रम सवत् १६६७ च्या मार्गशीर्ष महिन्यातील शुद्ध चतुर्थीस झाला व वि० स० १७२७ भाद्रपद वद्य १३ शीस त्यास देवाज्ञा झाली जोधपूरचे महाराजा जसवतसिंह यानी त्यास आपला दिवाण बनविले होते मुहिणोत शूर व मुत्सद्दी असून मोठा व्यवहारचतुर तर होताच, पण त्याबरोबरच इतिहासाचीही त्यास फार आवड असे जोधपूरसारख्या मोठ्या राज्याचा दिवाण झाल्यामुळे त्यास अन्य राजपूत व मुसलमान राज्यातील प्रसिद्ध पुरुषाचाही परिचय होता त्यामुळे अखिल राजस्थानातील भाट, चारण, बाडे, इत्यादि अनेक ऐतिहासिक साधने त्यास उपलब्ध होऊ शकली व त्याच्या आधारावरून त्याने आपला बृहत्सग्रह तयार केला प्रत्येक राज्यासबधी जितक्या जितक्या भिन्न गोष्टी अथवा वशावळ्या उपलब्ध होऊ शकल्या त्या सर्वांचा मुहिणोत नैणसीने उपयोग केला इतकेच नव्हे तर आधुनिक इतिहासकाराप्रमाणे त्याने कित्येक ठिकाणी आपले सदर्भ ग्रथ अथवा प्रमाणपुरुष याचाही उल्लेख केला आहे रायबहादूर ओझाजीनी आपल्या राजस्थानच्या इतिहासाच्या प्रस्तावनेत मुहिणोतचा समग्र वृत्तान्त दिला असून त्याची उचित प्रशसाही केली आहे ओझाजीच्या मते मुहिणोतने बृहद्राजस्थानच्या इतिहासाचे सकलन करण्याचा प्रयत्न केला असून त्यात १५, १६ व १७ शतकाचा व सविस्तर वृत्तात सापडतो वास्तविक पाहता समग्र राजस्थानचा सगतवार इतिहास सर्व प्रथम लिहिण्याचे श्रेय आजपर्यंत कर्नल टॉडला देण्यात येत असे परतु आता मुहिणोत नैणसीने टॉडकडून ते स्थान स्वत करिता मिळविले असून राजस्थानचा पहिला आधुनिक इतिहासकार असा उचित मान सपादन केला आहे

**१८. डिंगलगीतें, पत्रें इत्यादि.** शिलालेख, ऐतिहासिक काव्ये, वशावळ्या व ख्याति याच्या व्यतिरिक्त डिगल भाषेत लिहिलेली हजारो गीते आज उपलब्ध झाली आहेत ह्या गीतकाचा प्रकार हा राजपूत वाङमयातला एक विशेष होय त्याचे परिशीलन करून वाङमयदृष्ट्या त्याच्यावर विशेष प्रकाश पाडण्याचे कार्य अद्याप व्हावयाचे आहे परतु राजस्थानच्या वीरतेचा परिचय करून देणारी ती मोठी प्रभावी साधने होत यात शका नाही राजपूत राजे व सरदार याची वीरकृत्ये, स्त्रीदाक्षिण्य

व परोपकार याचे प्रसग, युद्धात मरणे व मारणे, महत्त्वाची दाने, राजस्त्रिया व सरदारस्त्रिया यानी स्वपतीबरोबर केलेल्या सहगमनाचे रोमाचकारी धीरोदात्त प्रसग, इत्यादि गोष्टी ह्या गीतकाचे वर्ण्यविषय होत. राजे, सरदार, सरकारी अधिकारी, राजघराण्यातील पुरुष व स्त्रिया, चारण, भाट व मोतीसर इत्यादि लोकाच्या दप्तरातून अशा प्रकारच्या दोन दोन हजार गीताचे सग्रह सापडतात ही वीररसपूर्ण गीतके राजस्थानात मोठ्या उत्साहाने व भावपूर्ण हृदयाने गायिली व ऐकली जातात. या गीताच्या बरोबरच डिगल भाषेतील प्राचीन दोहे, छप्पय, सोरठे इत्यादि अनेक प्रकारची कविता उपलब्ध झाली ती राजपूत वाङमयसमृद्धीचे एक महत्वाचे प्रमाण झाले असून शिवाय तिचा पूर्वेतिहासावर प्रकाश पाडणाऱ्या दीपिकेप्रमाणेही उपयोग सिद्ध झाला आहे

वरील सर्व साधन बरोबरच इतिहासज्ञानाचे आणखी एक साधन उपलब्ध झाले आहे साहित्यशास्त्राच्या दृष्टीने त्यास विशेष किमत आहेच हे साधन म्हणजे राजपूत राजानी आपल्या सरदाराना, कर्मचाऱ्याना अथवा अन्य राजाना लिहिलेली पत्रे हे होय "त्याचा (राजाचा) आपल्या लेखणीवर अप्रहित अधिकार असे त्यानी लिहिलेली पत्रे वाखाणण्याजोगी आहेत राजस्थानचे राजे व सरदार याच्यात झालेला पत्रव्यवहार त्याचा आपल्या मनावर किती ताबा असे याची उत्तम साक्ष देतो अभियुक्त वाङमयाच्या छटा त्यात जागोजाग आढळतात व मनुष्यजातीच्या स्वभावाचे त्याचे मार्मिक निरीक्षणही त्यातच दिसून येते" असे या पत्राच्या साहित्यिक योग्यतेविषयी कर्नल टॉडने उद्‌गार काढले आहेत ही पत्रेही इतिहासज्ञानाचे महत्त्वाचे साधन म्हणून उपयोगी पडण्यासारखी आहेत

१० **नाट्यशास्त्रांतील प्रगति.** काव्य आणि इतिहास या नतर नाट्याचा अनुक्रम लावला पाहिजे वस्तुत काव्याचे प्रकार दोन, एक श्राव्य तर दुसरे दृश्य. सर्गप्रतिसर्गात्मक काव्य हे पहिल्या प्रकारात समाविष्ट होते तर दुसऱ्या प्रकारास नाट्य ही सज्ञा आहे अशा प्रकारे नाट्याचा काव्यातच समावेश होत असला तरी ती दोन शास्त्रे साप्रत इतकीं परस्परनिरपेक्ष विकसित झाली आहेत की, कोणत्याही एकाचा

दुसऱ्यात समावेश केल्यास त्याचा सकोच झाल्याशिवाय राहणार नाही म्हणूनच नाटचास काव्याहून स्वतत्र महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे

नाटचाचा ज्याप्रमाणे काव्यात तसाच इतिहासात सुद्धा समावेश करता येण्याजोगा आहे कारण नाटकाच्या करिता राजस्थानच्या कवीनी आपली मविधानके इतिहासातूनच वेचून घेतली आहेत व त्यावर आपल्या प्रतिभेचा विलास केला आहे त्यामुळे राजपुताच्या इतिहासाचे बरेच धागेदोरे या नाटचग्रथातूनही सापडतात परतु प्रस्तुत स्थळी नाटकातून राजस्थानचा इतिहास निवडून वाचकासमोर माडण्याचे कार्य करावयाचे नसून साहित्याच्या विविध शाखापैकी राजपूत समाजाने याही शाखेत समाधानकारक प्रगति केली, राजपूत समाज आपल्या बरोबरीच्या समकालीन अन्य समाजाच्या निदान मागे तरी खास नव्हताच, एवढेंच दिग्दर्शित करावयाचे आहे ज्याप्रमाणे नाटचातला इतिहास निवडून काढणे हा या ग्रथाचा हेतु नाही, तद्वतच राजपुताच्या नाटकाची वाङमय-विषयक योग्यता ठरविण्याच्या दृष्टीने सोहापोह चर्चा करणे हाही या लेखनातला हेतु नाही हेही वाचकानी लक्षात ठेविले पाहिजे

सामान्यत पाहिले असता श्राव्य काव्याइतकी नाटचसाहित्याची निर्मिति प्राचीन आर्यानी केली नाही असे म्हणणे प्राप्त आहे शास्त्र या दृष्टीने नाटचाची त्या काळीही परिणति झाली असेल परतु एकदर रगभूमीचा आज जितका विकास झालेला दिसतो तितका प्राचीन काळी प्रत्यक्षात होता किवा नाही हे सागणे कठीण आहे तथापि प्राचीन आर्यानी आजच्याही जगाला वदनीय व अनुकरणीय वाटतील अशा उत्तमोत्तम नाटकाचा प्रसव केला आहे हेही विसरून चालणार नाही आज उपलब्ध असलेल्या साधनावरून पाहता राजस्थानातल्या कवीनीही नाटचविषयात चागलीच प्रगति केली होती असे दिसते राणा कुभासारखे राजे या शास्त्रात इतके प्रवीण होते की, 'नव्य एष भरतो महीपति' या वचनात दिग्दर्शित केल्याप्रमाणे 'नव्यभरत' उर्फ अभिनव भरताचार्य अशी पदवी तत्कालीन विद्वानानी त्याला समर्पण केली होती नाटचशास्त्राचा आदि-निर्माणकर्ता भरतमुनि त्यानतर दशरूपकाचा कर्ता धनजय इत्यादि

नाटचशास्त्रज्ञानी आपले ग्रथ लिहिले त्या सर्वांत नदिकेश्वराचे मत राजस्थानच्या कवीना विशेष ग्राह्य कारण कुभासारख्या तत्कालीन समाजावर प्रभाव गाजविणाऱ्या नाटचकलाप्रवीणाने त्या मताचा पुरस्कार केला होता राणा कुभाच्या ठिकाणी इतकी योग्यता येण्यास त्याच्यापूर्वी व त्याच्या समकालीही राजस्थानात अनेक उत्तमोत्तम नाटककार झाले असले पाहिजेत हे उघड आहे 'नाटकप्रकरणाकवीथिकासमवकारभाणके' ह्या कीर्तिस्तम्भप्रशस्तीतील वचनावरून नाटक, प्रकरण, अक, वीथिका, नाटिका, समवकार, भाणक, प्रहसन इत्यादि नाटचाच्या विविध भेदाचे परिपूर्ण ज्ञान तत्कालीन विद्वानाना असले पाहिजे असे दिसून येते त्याच प्रशस्तीत पुढे असाही एक श्लोक आहे की—

"श्रीकर्णाटकमेदपाटसुमहाराष्ट्रादिके योदय—
द्राणीगुफमय चतुष्टयमय सन्नाटकाना व्यधात्।"

ह्या श्लोकात स्वत राणा कुभाने चार नाटके लिहिली असून त्यात निरनिराळ्या भाषाचे प्रयोग केले आहेत असे म्हटले आहे मेवाडात चितोडच्या किल्ल्यावर बसून नाटके लिहिणारा राणा कुभ ज्या अर्थी आपल्या नाटकात महाराष्ट्री व कर्णाटकी भाषाचा प्रयोग करतो त्या अर्थी त्या दोन्ही भाषा त्यास उत्तम रीतीने अवगत असल्या पाहिजेत, त्याच्या पदरी त्या त्या भाषाचे कोविद राहत असले पाहिजेत व तत्तत्प्रातस्थ विद्वानानाही अन्य देशी भाषाचे महत्त्व व त्यातील ज्ञानभाडाराचे आलोडन करण्याची आवश्यकता पटली असली पाहिजे हे स्पष्ट दिसते त्याचप्रमाणे—

भारतीयरसभावदृष्टय प्रेमचातकपयोदवृष्टय ।
नदिकेश्वरमतानुवर्णनाराधितत्रिनयन श्रयन्ति य ॥

ह्या श्लोकावरून नाटचकार या दृष्टीने कुभाची योग्यता भारतीय रसज्ञाच्या मते किती थोर होती याची कल्पना येते, आणि राजस्थानात नाटचशास्त्राच्या बाबतीत नदिकेश्वराचे मत कुभाने किती लोकप्रिय बनविले होते याची कल्पना येते राणा कुभासारखा त्याकाळचा शिरोमणि व जवळ जवळ चक्रवर्तिपदास पोचलेला राजा नाटचशास्त्रास आश्रय देऊ लागल्यानतर त्याची किती भरभराट झाली असेल याची सहज कल्पना करता येते नाटयाचा उत्कर्ष भाषेत शक्ति उत्पन्न करीत असल्याने

पधराव्या शतकातील सस्कृत भापाही मोठी जोरदार व प्रभावी असणे अत्यत स्वाभाविक आहे

**२०. 'हंमीरमदमर्दन'.** जयसिह सूरि नामक एका गुर्जरस्थ जैन कवीने हे नाटक लिहिले आहे दिल्लीचा सुलतान शम्सउद्दीन अल्तमष याने मेवाडमधून गुजराथवर स्वारी करण्याचा जो प्रयत्न केला, त्यात मेवाडचा राणा जैत्रसिह याशी अल्तमषची लढाई होऊन तीत सुलतानाचा पराजय झाला ह्या घटनेचे वर्णन प्रस्तुत नाटकात आलेले आहे नाटकाचे नाव 'हमीरमदमर्दन' आहे म्हणून मेवाडचा सुप्रसिद्ध राणा हमीर याचा या नाटकाशी काही सबध असावा अशी प्रथम कल्पना होते पण ती साफ चुकीची आहे मुसलमानाच्या बरोबर पश्चिमेकडून आलेल्या काही नावाचे सस्कृतीकरण करण्याचा प्रयत्न त्या काळचे लेखक करीत असत उदाहरणार्थं, सुलतान हा त्याचा शब्द, परतु तोच इकडच्या लेखकानी सस्कृत लेखात 'सुरत्राण' असा बनवून त्याचा उपयोग केला हा सुरत्राण शब्द कधी हिंदुराजाना—विशेषे करून राजपूत राजाना—लावीत, तर कधी मुसलमान सुलतानानाही त्याचप्रमाणे 'अमीर' या मुसलमानी शब्दाचे 'हमीर' हे सस्कृतीकरण होय दिल्लीच्या अमीराचा म्हणजे सुलतानाचा ह्या लढाईंत मोड झाला म्हणून तिच्यावर लिहिलेल्या नाटकाचे नाव 'हमीरमदमर्दन' असे ठेवण्यात आले आहे ह्या नाटकातील सुलतानाचे नाव 'मीलच्छ्रीकार' असे दिले आहे परतु ह्या नावाचा कोणीही मुसलमान राजा झालेला नसल्याने तेही 'अमीरशिकार'चे अपभ्रष्ट रूप असावे असे दिसते कारण कुत्बउद्दीन ऐबकाने आपला गुलाम शम्सउद्दीन अल्तमष यास 'अमीरशिकार' ही पदवी बहाल केली होती आणि राणा जैत्रसिहाची त्याच्याच बरोबर लढाई झाली होती या हमीरमदमर्दन नाटकाचे त्यात दिलेले कथानक असे —

गुजराथेत सोळखी घराण्याचा दुसरा भीमदेव नावाचा दुर्बळ व कर्तृत्वशून्य राजा राज्य करीत होता त्याच्या राज्याची खरी सूत्रे धोलक्याचा बघेलवशी राणा लवणप्रसाद व त्याचा युवराज वीरधवल या दोघा पराक्रमी व महत्त्वाकांक्षी पितापुत्राच्या ताब्यात होती युवराज वीरधवल याजजवळ वस्तुपाल व तेजपाल नावाचे दोघे चाणक्यासारखे

नीतिनिपुण बधु मत्रिपदावर आरूढ होते वस्तुत पाहता वीरधवल, वस्तुपाल व तेजपाल ह्या तिघाच्या प्रशसेकरिता एकदर नाटकाची रचना करण्यात आली आहे दक्षिणेतून देवगिरीचा राजा सिंघण यादव आणि उत्तरेतून दिल्लीचा सुलतान मीलच्छ्रीकार या उभयताची स्वारी गुजराथेवर होणार असल्याची बातमी या मत्रिद्वयाला लागते तेव्हा त्यानी सोमसिंह, उदयसिह व धारावर्ष नावाच्या मारवाडच्या राजाशी तह करून त्याना आपले मित्र बनविले त्याचप्रमाणे इतर अनेक सामत व राजे याच्या बरोबरच मेवाडचा राणा जैत्रसिह यासही त्यानी मैत्रीसाठी पाचारण केले परतु आपल्या पराक्रमाचा गर्व असलेल्या जैत्रसिहाने त्यानी मैत्रीसाठी पुढे केलेला हात झिडकारला वीरधवलाच्या नीतिनिपुण मत्र्यानी कूटनीतीचा प्रयोग करून सिघणाच्या सेनेत फूट पाडली व त्याच्या आक्रमणाचा वेग थाबविला इकडे सुलतानाची स्वारी होत असता वाटेत जैत्रसिहाचा व त्याचा सामना झाला परतु सुलतानाच्या फौजेने राजपूत सेनेचा धुव्वा उडविला इतक्यात वीरधवल तेथे जाऊन पोचल्याने त्याचे नुसते नाव ऐकताच मुसलमान पळून गेले व अशा तऱ्हेने दिल्लीच्या 'हमीरा'चे मदमर्दन झाले असे थोडक्यात हे सविधानक आहे वास्तविक पाहता जैत्रसिहानेच सुलतानाचा पराजय केला असताही नाटककाराने वीरधवल व त्याचे मत्री याना प्रसन्न करण्यासाठी मुद्दाम जैत्रसिहाचा पराजय दाखवून वीरधवलाच्या केवळ नामश्रवणाने मुसलमान पळाले अशी बढाई मारली आहे आणि चाणक्याप्रमाणेच वीरधवलाचे मत्री कूटनीतीत निपुण होते असे दाखविले आहे

हमीरमदमर्दनाप्रमाणेच, साभरचा चौहानराजा वीसलदेव उर्फ विग्रहराज चतुर्थ याने स्वत लिहिलेले 'हरकेली नाटक' आणि त्याचाच राजकवि सोमेश्वर याने लिहिलेले 'ललित विग्रहराज नाटक' इत्यादि नाटके उपलब्ध झाली आहेत व ती राजस्थानच्या विद्वानामध्ये नाटचशास्त्राचे अभ्यासू व अधिकारी लोक विद्यमाम होते एवढी गोष्ट सिद्ध करण्यास पुरेशी आहेत

**२१. 'धनसनय' धर्मसाहित्य.** काव्येतिहास आणि नाटच यानतर धार्मिक साहित्याकडे वळणे जरूर आहे वास्तविक कोणत्याही

गभीर ज्ञानाचा उद्गम होण्यासाठी देशात चिरशाति निवास करीत असली पाहिजे धामधुमीच्या अथवा युद्धादिकाच्या काळात गभीर स्वरूपाचे साहित्य निर्माण होणे अशक्य असते साहित्याची अथवा धर्माची पवित्र भावाने व शात प्रकृतीने सेवा करण्यास अवसर मिळावा म्हणून आर्यावर्तातील राजे ब्राह्मणवर्गाच्या उपजीविकेची व्यवस्था करीत व त्याच्या सरक्षणाचाही भार स्वस्कधावर धारण करीत प्राचीन काळचे असले तत्त्ववेत्ते ऋषीही राजाना शुभाशीर्वाद देण्यापलीकडे स्वत स राजकीय बाबीशी फारसे सलग्न ठेवीत नसत अरण्यातल्या एखाद्या निसर्गरमणीय शाततेचा उपभोग घेत म्हणजेच उपनिषदाच्या भाषेत म्हणावयाचे झाल्यास ‘अरण्यायन’ करीत स्थिर व मूलग्राही चित्ताने सृष्टीच्या मोठमोठ्या तत्त्वाचा ते शोध करीत ॐकाराच्या वीणेवर ब्रह्मानुभवाच्या तारा छेडून पुराण ऋषीनी उपनिषदातील शातीची गीते गायिली आहेत व त्यायोगे भरतवर्षाचे धर्मसाहित्य समृद्ध करून ठेवले आहे नव्हे—“तद्य इमे वीणाया गायन्ति एत ते गायन्ति तस्मात्ते धनसनय ।”—या छादोग्यातील आर्षवचनाप्रमाणे त्याची गीते हीच त्याची सपत्ति या गीतानीच त्यानी या राष्ट्राला धनसनय म्हणजे श्रीमत–समृद्ध–साहित्यसम्राट् करून ठेवले आहे यात शका नाही स्थिर व एकाग्र चित्ताने ज्ञानाचा आविष्कार करण्याची हीच सधि जर या देशातील ब्राह्मण वर्णास मिळाली असती व ब्राह्मणातही पोटापुरते घेऊन राष्ट्रकार्यार्थ साहित्यसेवेच्या द्वारे देह झिजविण्याची बुद्धि कायम राहिली असती तर शास्त्रीय सशोधनाचे कार्य किती तरी प्रगल्भ दशेस जाऊन पोचले असते अस्तु प्रतिपादनाचा मथितार्थ इतकाच की, कोणत्याही स्वरूपाचे गभीर साहित्य निर्माण करण्यास चिरतन शातीची परम आवश्यकता असते ज्या देशातील साहित्यसेवकाना ही शाति मिळाली तेथे त्याचा उत्तम विकास झाला आहे इग्लड इत्यादि देशात गेल्या तीन चार शतकात झालेल्या साहित्यसमृद्धीचे तरी मुख्य कारण हेच होय वास्तविक पाहता ज्ञानाची गगा ही चिरप्रवाही आहे तिच्यातील उदक कधीही आटू शकत नाही क्वचित स्थळी ती एखाद्या लहानशा झऱ्याप्रमाणे अगदी बारीक धारेतून झुळू झुळू वाहत असेल, तर दुसऱ्या एखाद्या स्थळी सहस्र मुखानी सागरास जाऊन मिळणाऱ्या

प्रचड गगौघाप्रमाणे तिचा प्रवाह दृष्टि स्तिमित करून टाकणारा असेल एखाद्या बुद्धिहीन अथवा हतभागी देशाच्या रखरखीत वालुकामय प्रदेशात तिचा प्रवाह लुप्त झाल्यासारखा भासला तरी तो कायमचा लुप्त होऊ शकत नाही काही कालापुरता गुप्त होतो व त्यानतर पुन अन्यत्र प्रकट होतो त्यामुळे आज तो या देशात वाहताना दिसत असेल तर उद्या त्या देशात दिसतो इतकेच।

धर्माचीही गोष्ट तशीच आहे विशेषत वैदिक धर्म हा सृष्टीच्या मुळाशी असलेल्या गभीर तत्त्वाचा विचार करणारा धर्म आहे सृष्टीचा व मनुष्याचा सबध, सृष्टीच्या सचालनार्थ परमेश्वराने मनुष्यास नेमून दिलेले कर्तव्य, समाज व त्याची धारणा, तदर्थ उत्पन्न होणाऱ्या धार्मिक, सामाजिक व राजकीय सस्था, इत्यादि सर्व गोष्टीचा अतर्भाव आर्यांच्या धर्मग्रथात होतो म्हणून स्मृति हेच प्रधान धर्मग्रथ मानले जातात 'श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्र तु वै स्मृति।' अशा प्रकारची व्यवस्था शास्त्रानेच घालून दिली आहे म्हणून स्मृतिग्रथातच राजा व समाज याच्या कर्तव्याकर्तव्याचा सपूर्ण विचार केलेला असतो समाजाच्या परिस्थितीचे व मनुष्यजातीच्या स्वभावाचे मार्मिक ज्ञान करून घेऊन समाजाच्या स्थिरीकरणाचे त्रिकालाबाधित नियम शोधून काढण्याचे कार्य अत्यन्त बिकट आहे ते करण्यास अन्य दूषित वातावरणापासून शुद्ध व मुक्त बुद्धीची परम आवश्यकता असते त्यामुळे धार्मिक वाङमयाची निर्मिति अशा प्रकारच्या शुद्ध, बुद्ध व मुक्त स्वरूपाच्या ऋषीकडून नितात शात वातावरणाच्या भूमिकेवर झालेली असते हे लक्षात ठेवले पाहिजे

**२२. साहित्यसौहित्यवान् ब्राह्मण.** राजपूताच्या हजार बाराशे वर्षांच्या इतिहासात वर वर्णन केलेल्या अखड शातीचे दिवस फार झाले तर दीडदोनशे वर्षे लाभले असतील राणा हमीरच्या कारकीर्दीचा अखेरचा काल, राणा कुभाची कारकीर्द, राणा सगाची कारकीर्द, राणा अमरसिहाने यवनसम्राट जहागिरशी सधि केल्यानतर पुनश्च राजसिहाने औरगजेबाशी युद्ध पुकारीपर्यंतचा काळ, असलेच काही कालखड स्मरणीय शाततेचे गेले असतील एरव्ही महमदी आक्रमणाच्या धडका राजस्थानच्या अखिल जनतेस प्राय प्रत्येक शताब्दीत सहन कराव्या लागल्या आहेत,

आणि मागे सांगितल्याप्रमाणे राजस्थानातील ब्राह्मण जातीलाही अनेक वेळा कमरेस शस्त्र बांधून देशाच्या व धर्माच्या संरक्षणाकरिता आपले वनौकस जीवन बाजूस सारून समरांगणावर उभे राहावे लागले आहे तथापि अशा धामधुमीच्या परिस्थितीतही वैदिकधर्मांत पारंगत असे अनेक धर्मज्ञ ब्राह्मण निर्माण झाले आहेत राजपूत राजे स्वतःच मोठे धर्मज्ञ असल्याने त्यांनी चांगल्या चांगल्या धर्माचार्यांना आश्रय दिला होता उदाहरणादाखल सांगावयाचे झाल्यास चितोडचा प्रसिद्ध कीर्तिस्तम्भ राणाकुंभाने उभारला असता त्यावरील प्रशस्ति अत्रिनामक विद्वद्वराने लिहून दिली परंतु हे प्रशस्तिलेखनाचे कार्य परिसमाप्त होण्याच्या पूर्वीच अत्रीस इहलोकची यात्रा संपवावी लागली तेव्हा प्रसिद्ध कादंबरीचा कर्ता जो बाणभट्ट त्याच्या पुत्राप्रमाणेच अत्रीचेही उर्वरित कार्य त्याचा पुत्र महेश याने परिपूर्ण केले सदर प्रशस्तीत या दोन्ही पितापुत्राचा पुढील-प्रमाणे उल्लेख आहे

अत्रिस्तत्तनयो नयैकनिलयो वेदान्तवेदस्थिति
मीमांसारसमांसुलातुलमति साहित्यसौहित्यवान् ।
रम्यां सूक्तिसुधासमुद्रलहरी सामि प्रशस्ति व्यधात्
श्रीमत्कुंभमहीमहेन्द्रचरिताविष्कारिवाक्योत्तराम् ॥

वरील श्लोकात सदर प्रशस्तीचे कर्ते उभय पितापुत्र मोठे नैयायिक, वेदान्तवेत्ते, मीमांसाकार व साहित्यसौहित्यवान् म्हणजे विपुलसाहित्याचे ज्ञाते असून त्यांनी ही रम्य अशी सूक्तिसुधासमुद्रलहरी निर्माण केली असे म्हटले आहे त्याचप्रमाणे अमरनृपकाव्यरत्नाचा कर्ता पंडित हरिदेव-सूरीचा पुत्र पंडित मंगल याने सदर काव्याच्या शेवटी आपला परिचय करून देताना—

विप्राणां द्युमणिर्गुणाम्बुनिकरो धर्मैककर्ता विभुः
साहित्याम्बुनिधिस्तथाश्रित ( *) कृपासंयुत ।
वेदान्तागमपारगो निपुणधीस्तर्केषु सर्वेष्वसौ
सूरिश्रीहरिदेवजो विजयते मंत्रांशुमान् मंगल ॥

विप्राचा द्युमणि म्हणजे सूर्य, गुणाचे सारस, धर्माचा एकच कर्ता, साहित्य-

* कंसातील शब्द लागत नाहीत

सागर, वेदवेदागामध्ये पारगत, तर्कात निपुणधी आणि विशेषत मत्रविद्येत निष्णात अशी विशेषणे उपयोजिली आहेत पडित आशाधरविरचित 'धर्मामृतशास्त्र' नामक ग्रथही आता उपलब्ध झाला आहे त्याशिवाय 'एकलिगमाहात्म्य' 'एकलिगपुराण' यासारखे ग्रथ व निरनिराळ्या मदिराच्या प्रशस्त्या याचाही धर्मग्रथातच समावेश करावा लागेल काव्य व नाटके याच्या द्वाराही धर्मशिक्षण देण्याचा प्रघात आर्यांप्रमाणेच राजपुतातही असल्याने त्याच्या काव्यनाटकाकडेही त्या दृष्टीने पाहणे अवश्य आहे याशिवाय, निरनिराळे धर्माचार्य, मठपति व पुरोहित याच्याकडेस आलेले धर्मनिर्णयाचे अभियोग व त्याचे त्यानी दिलेले निकाल याचे ठिकठिकाणी मोठमोठे सग्रह उपलब्ध असले पाहिजेत वस्तुत खरे धार्मिक व सामाजिक साहित्य व तत्कालीन परिस्थितीचे उत्तम चित्रपट अशा तऱ्हेने धार्मिक अथवा राजकीय न्यायपतीच्या समोर आलेले अभियोग व त्याचे निर्णय यातच पहावयास सापडू शकतात, परतु ह्या दृष्टीने अद्याप फारसे सशोधनकार्य झालेले नाही, असे कबूल करणे भाग आहे, किंवा ते मुळीच झाले नाही म्हटले तरी चालेल पेशव्याच्या काळची सुद्धा असली धर्मनिर्णयाची बाडे अद्याप व्हावी तशी सशोधित झाली नाहीत.

२३. **जैनांचीं विशाल ग्रंथालयें.** ह्या धर्मवाङमयाच्या निर्मितीस आवश्यक ते स्वास्थ्य हिदु पडिताना मिळाले नसले तरी जैन पडिताना मिळाले होते मदिरे व मठ हीच हिदुधर्माचार्यांची निवासस्थाने होत ज्या ज्या वेळी मुसलमानानी राजस्थानवर आक्रमण केले त्या त्या प्रत्येक वेळी त्यानी आपला मोर्चा प्रथम हिदूच्या धर्मसस्थावर—मठा-मदिरावर—वळविला व शेकडो मदिरे उध्वस्त करून त्यातील शातपणे धर्माराधन करू इच्छिणाऱ्या धर्मपुरुषाना पळवून लावले मदिराच्या विध्वसाबरोबरच त्यात असलेले मोठमोठे ग्रथसग्रहही भस्मसात् करून टाकले व त्यायोगे हिदूचे अपरिमित नुकसान झाले अशा तऱ्हेने हिदु धर्माचार्यांना शातीचा म्हणून लाभ विधर्मी यवन आक्रमकानी होऊ दिलाच नाही म्हणून धर्मसाहित्याची ही इष्ट अभिवृद्धि करण्यास त्यास अवसर सापडला नाही परतु जैनाची गोष्ट तशी नव्हती काशीपासून रामेश्वरापर्यंत सापडतील तितकी हिंदूची मदिरे मुसलमानानी पाडली परतु बौद्ध अथवा

जैन मदिराना त्यानी सहसा हात लावला नाही ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे जैन मदिरे व मठ याचा राजकारणाशी प्रत्यक्ष सबध नाही, अहिसा हे त्याचे परम पारमार्थिक व्रत असल्याने आपल्याला त्याचा प्रत्यक्ष असा कोणताही विरोध होणार नाही—नव्हे अप्रत्यक्ष उपसर्ग देखील पोचण्याची सभवनीयता नाही,–व धार्मिक सिद्धाताच्या दृष्टीने तेही आपल्या इतकेच हिदूचे विरोधी आहेत अशा कल्पनेनेच बहुधा मुसलमानानी जैन मठा-मदिराना हात लावला नसावा उलट शात वृत्तीच्या जैन यतीपुरोहिताविषयी व मठा-मदिराविषयी त्याच्या मनात आदरही वास करीत असावा म्हणून मुसलमानाची अनेक आक्रमणे आली व गेली अथवा त्याचे अधिराज्यही कायम झाले परतु त्यायोगे जैनाचार्यांच्या शाततेचा भग होऊ शकला नाही, व हेच त्याच्या हातून अपरिमित ग्रथसपत्ति निर्माण होण्याचे प्रधान कारण होय

"आजपर्यंत युरोपीय सशोधकाची पोच जेथपर्यंत जाऊ शकली नाही अशा ज्ञानाच्या खाणी या जैनधर्मामध्ये सापडतील जेसलमीरची, अनहिलवाड्याची व खबायतची आणि अल्पप्रसिद्ध स्थळी असलेली ग्रथालये एवढी विशाल आहेत की त्यात हजारो ग्रथ असतील जैन लोकाच्या धर्मग्रथाचे हे सग्रह एकट्या पुरोहित वर्गाजवळच आहेत असेही नव्हे, तर गृहस्थवर्गातील श्रीमत व आदरणीय सद्गृहस्थाजवळही ते सापडतात हे सर्व ग्रथ त्यानी निरनिराळ्या मदिरातून साभाळून ठेवलेले आहेत, म्हणूनच ते आजतागायतही सुरक्षित राहिले आहेत" असे जैनानी केलेल्या धार्मिक साहित्याच्या अभिवृद्धीविषयी कर्नल टॉडने उद्गार काढले आहेत या अफाट ग्रथसग्रहालयातील 'ओघनिर्युक्ति,' 'पाक्षिकवृत्ति', 'तीर्थकल्प', 'श्रावकप्रतिक्रमणसूत्रचूर्णि', 'विधिपक्ष गच्छीयप्रतिक्रमणसूत्र' इ० ग्रथ आता प्रसिद्धीस आलेले आहेत 'ओघनिर्युक्ति' हा ग्रथ तेराव्या शतकातला असून तो 'हेमचद्रेण दशवैकालिकपाक्षिकसूत्रओघनिर्युक्तिसूत्रपुस्तिका लिखिता।' या वाक्यात म्हटल्याप्रमाणे हेमचद्र नामक जैन पडिताने लिहिला असे दिसते 'पाक्षिक वृत्ति' देखील तेराव्या शतकातलाच ग्रथ असून 'वयजलेन पाक्षिक-

वृत्तिर्लिखितेति ' या वाक्यात म्हटल्याप्रमाणे तो वयजल नामक पडिताने लिहिला होता असे स्पष्ट दिसते एवच प्रारभापासून तो अखेरपर्यंत जैनाना व त्याच्या आचार्यांना एकसारखी शाति मिळत गेल्यामुळे, मुसलमान आक्रमकानीही त्याच्या शातीचा भग न केल्यामुळे, त्यानी मिळालेल्या शातीचा भरपूर उपयोग करून घेनला व हजारो धर्मग्रथ निर्माण केले राजस्थानातील राज्याचा राष्ट्र या दृष्टीने विचार करणाऱ्या मनुष्यास त्यात निवास करणाऱ्या जैन जातीचे महत्त्व व जैनाचार्यांनी निर्माण केलेले धर्मवाङमय याचा केव्हाही विसर पडू देऊन चालणार नाही

**२४. आयुर्वेदविशारद बालाचाय व त्याचा पुत्र धन्वंतरि.** शास्त्रीय विषयापैकी सगीत व शिल्प या विषयावर निर्माण झालेल्या ग्रथासबधी मागे राणाकुभाच्या साहित्यिक योग्यतेचा विचार केला त्या वेळी वर्णन आलेच आहे आता आयुर्वेदाविषयी थोडे सागावयाचे आहे आयुर्वेदाची सुद्धा राजस्थानात चागली जोपासना केली जात होती असे म्हणता येण्यासारखे आहे या बाबतीत राणा अमरसिहाच्या पदरी असलेला वैद्य बालाचार्य व त्याचा पुत्र धन्वतरि याच्या सबधी पुढील उल्लेख सापडतो व त्यावरून त्याच्या आयुर्वेदशास्त्रातील निपुणतेसबधी चागली कल्पना येते

बालाचार्य इति द्विज क्षितिभृता वृदैरुपास्य क्षितौ
विख्यात परकार्यसाधनपर सख्यावतामग्रणी ।
आयुर्वेदविशारद समभवच्छ्रीचित्रकूटाधिप–
प्राणानामधिदैवत सदसि य प्रत्यक्षवाचस्पति ॥

'सदरहू बालाचार्य मोठा विख्यात ब्राह्मण असून परोपकाररत, राजमडळाकडून सन्मान पावणारा, विद्वान लोकाचा पुढारी, आयुर्वेदशास्त्राचा विशारद, सभेत प्रत्यक्ष बृहस्पतीप्रमाणे भाषण करणारा व चितोडच्या राजाचा तर प्रत्यक्ष प्राणाचार्य होता', असे या श्लोकात स्पष्ट म्हटलेले आहे ह्या बालाचार्याचाच पुत्र धन्वतरि आपल्या नावाप्रमाणे खरोखरच मोठा धन्वनरि होता धर्मधुरीणाचा तोही मोठा पुढारी होता व त्याने राणा अमरसिहाच्या आज्ञेवरून 'अमरविनोद' नामक ग्रंथही लिहिला 'अमरविनोद' या नावावरून तो एक 'सुभाषित व विनोद' यासारखा

ग्रथ असावा अशी कल्पना केल्यास ती साफ चुकीची ठरेल कारण तो हस्तिआयुर्वेदावरील ग्रथ असून राणा अमरसिंहाच्या विनोदनाकरिता लिहिला म्हणून त्यास 'अमरविनोद' असे नाव देण्यात आले हा सबंध ग्रथ स्वदेशभाषेत लिहिला असून त्याच्या कर्त्याचा परिचय करून देणारा श्लोक मात्र सस्कृतात लिहिला आहे तो असा—

तस्यात्मज सर्वगुणैकधामा धन्वतरिर्धर्मधुरीणधुर्य ।
आज्ञामवाप्यामरभूमिपस्य स्वदेशभाषाभिरिद तनोति ।।

ह्या श्लोकात प्रकट होणारा स्वदेशभाषेचा अभिमान हा विशेष लक्षात ठेवण्यासारखा आहे हत्ती, घोडे, बैल, उट, इत्यादि लढाईस व नित्य व्यवहारास आवश्यक अशा प्राण्याच्या जीवितशास्त्रामध्येही विशारद असलेल्या व ज्यानी तद्विषयक ग्रथ निर्माण केले अशा लोकात मानवी जीवितशास्त्राचा अभ्यास करून त्यावरही ग्रथरचना करणारे लोक असलेच पाहिजेत, हे अनुमान बुद्धीला फारसे प्रयास न देताही काढता येणासारखे आहे सशोधनाचे कार्य जसजसे वाढत जाईल तसातशा ह्या अनुमित गोष्टी सत्यस्वरूपाने प्रकाशात येतील यात शका नाही

**२५. ज्योतिर्विषयक कामगिरी.** आता ज्योतिषशास्त्रासबधी लिहून हे बरेच लाबलेले प्रकरण आटोपते घ्यावयाचे आहे ज्योतिषशास्त्राचा ग्रहज्योतिष व फलज्योतिष या दृष्टीने सर्वपरिचित उपयोग आहे हे तर खरेच पण राजपूत ज्योतिर्विदाची बाडे इतिहासज्ञानाचे साधन म्हणूनही उपयोगात आली आहेत, हा त्याचा विशेष होय प्रत्येक राजाजवळ कवि, गवय्ये, चारण, पुरोहित, स्थपति इत्यादिकाच्या बरोबरच ज्योतिषीही बाळगलेले असत ह्या ज्योतिषी लोकाच्या जवळ वशपरपरेने अनेक राजे, राण्या, राजकुमार व कुमारिका, सरदार, राज्यातील अनेक महत्वाचे पुरुष इत्यादि लोकाच्या जन्मपत्रिकाचे मोठमोठे सग्रह बाळगलेले असतात. व त्यामध्ये त्या त्या व्यक्तीचे जन्मसवत्, मास, पक्ष, तिथि, वार, नक्षत्र इत्यादि लिहून ठेवलेली असतात त्यावरून निरनिराळे राजे व अन्य कर्तबगार माणसे याचे काल निश्चित करण्यास फार मदत होते ह्या ज्योतिष्याच्या जवळील बाडात सापडलेल्या कालाइतके निश्चित असे दुसरे कोणतेच कालप्रमाण असू शकणार नाही. अशा प्रकारचे कित्येक सग्रह

आतापर्यंत उपलब्ध झाले असून त्यातील दोन बरेच मोठे आहेत त्यापैकी एक प्रसिद्ध इतिहासज्ञ मुनशी देवीप्रसाद याना उपलब्ध झाला असून त्यात १५ ते १९ व्या शतकापर्यंतच्या एकदर २१४ पुरुषाच्या जन्मपत्रिका लिहिलेल्या आहेत मेवाडचे राणे, डोगरपूरचे रावळ, जोधपूर–बिकानेर–किशनगड-ईडर-रतलाम-नागोर-मेडता इत्यादि ठिकाणचे राठोड राजे, कोटा व बुदीचे हाडावत सरदार, सिरोहीचे देवडा, जयपूरचे कच्छवाहा, ग्वाल्हेरचे तुवर, जेसलमीरचे भाटिया इत्यादि राजपूत राजे, तसेच दिल्लीचे बादशाह व शाहजादे इत्यादिकाच्या जन्मपत्रिका या बाडात सापडतात छत्रपति श्रीशिवाजी महाराजाचीही जन्मपत्रिका ह्या बाडात अगत्यपूर्वक सगृहीत करण्यात आली आहे

२६. **चडू नामक ज्योतिषी घराणे.** परतु याहीपेक्षा आणखी एक बृहत्सग्रह उपलब्ध झाला आहे जोधपूरच्या प्रसिद्ध ज्योतिष्याचे जे चडू नामक घराणे त्याच्या बाडात हा सग्रह मिळाला आहे चडू घराण्यात किती नामाकित ज्योतिषी निर्माण झाले आहेत याची कल्पना आज बहुतेक राजस्थानात या घराण्यातील पुरुषानी निर्माण केलेले चडू पचागच प्रचलित आहे या एका गोष्टीवरूनही येऊ शकेल ह्या चडू सग्रहात शिवराम चडू नामक एका पुरोहिताने मोठचा परिश्रमपूर्वक एकदर ५०० जन्मपत्रिकाचा कालानुक्रम लावून सग्रह केला आहे शिवाजी महाराजाची पत्रिका या बाडातही सापडतेच त्याशिवाय दिल्लीचे बादशहा, शाहजादे व अमीर, शिसोदिया, राठोड, कच्छवाहा, देवडा, भाटिया, चौहान, बुदेले इत्यादि राजपूत राजवश व त्याच्या शाखोपशाखा आणि त्याच्या दरबारचे प्रसिद्ध सरदार व पराक्रमी पुरुष या सर्वांच्या कुडल्या प्रस्तुत बाडात आहेत एवढा मोठा सग्रह अद्याप दुसरीकडे कोठेही आढळला नाही वरील दोन्ही सग्रहावरून राजपूत लोकात एकदर ज्योतिषाची किती आवड होती व केवढचा तत्परतेने ते मोठमोठ्या पुरुषाच्या पत्रिकादिकाचा सग्रह करीत याची कल्पना येते

२७. **सवाई जयसिंहाचे प्रयत्न.** परतु याहीपेक्षा ज्योतिषशास्त्राच्या अध्ययनाचा पद्धतशीर प्रयत्न अबरचा राजा सवाई जयसिह याने केलेला आहे सवाई जयसिह हा पहिल्या बाजीराव पेशव्याचा

समकालीन होय त्याने 'राजावली' व 'राजतरगिणी' नामक ग्रथ विद्याधरपडित व रघुनाथपडित या विद्वानाच्या हस्ते तयार करून घेतले होते त्यात युधिष्ठिरापासून तो विक्रमादित्यापर्यंतच्या राजाची सुसगत वशावळी देण्याचा प्रयत्न केला आहे जयपूर, बनारस, उज्जयिनी व दिल्ली येथे त्याने मोठमोठ्या वेधशाळा बाधविल्या आणि तीन तीन फूट व्यासाचे पृथ्वीचे गोल पौर्वात्य व पाश्चिमात्य पद्धतीप्रमाणे तयार करून घेतले पोर्च्युगालचा राजा तिसरा इमॅन्युअल याच्याकडून डी सिल्व्हा नामक प्रसिद्ध ज्योतिष्यास त्याने मुद्दाम हिदुस्थानात बोलाविले, त्याच्याकडून युरोप व आशियाचे आणि ग्रह तारे राशि इत्यादि खगोलाचे नकाशे तयार करविले आणि हिदुस्थानातल्या प्रमुख शहरात त्या शास्त्राच्या प्रचारार्थ ते वाटले सवाई जयसिह हा स्वत ग्रहज्योतिषात अत्यन्त निष्णात असून युद्धे व गुतागुतीचे असे अत्यत बिकट राजकारण यातूनही वेळ काढून तो ज्योतिषशास्त्राच्या अध्ययनास व प्रचारास उत्तेजन देई त्याने अवति उर्फ उज्जयिनीस स्थापन केलेले ज्योतिषशास्त्राच्या अध्ययनाचे केंद्र व वेधशाला आजही सर्व हिदुस्थानात सर्वांत मोठी समजण्यात येते राजपुताच्या ठिकाणी असलेल्या ज्योतिर्विषयक ज्ञानाची व तत्प्रसाराच्या कामी त्यानी केलेल्या प्रयत्नाची कल्पना येण्यास इतके विवरण पुरे आहे असे वाटते

आतापर्यंत स्थूल मानाने साहित्य व त्याच्या विविधशाखा, त्याची साधने व त्याचा उपयोग यासबधी जी काय थोडीबहुत माहिती उपलब्ध आहे तिच्या आधारे विवरण केले आता थोडे कलेसबधी लिहून हे प्रकरण सपविले पाहिजे

२८. **कलेचीं स्मारकें.** कलेच्या दृष्टीने पाहिल्यास राजपूत राजापैकी बहुधा प्रत्येकाने काहीना काही कलापूर्ण स्मारक पाठीमागे ठेवले आहे असे कबूल करावे लागेल शेकडो शिलालेख, मठ व मदिरे, उपमदिरे, लहानमोठे तलाव, विहिरी, मोठमोठे राजमहाल व अन्य इमारती, अनेक पहाडी व भुईकोट किल्ले व दुर्ग इत्यादि शतश भव्यातिभव्य स्मारके, शिल्पकलेची व सौदर्याची राजपुतानी किती जोपासना केली होती साक्ष देण्यास आजही राजस्थानात उभी आहेत त्या प्रत्ये-

काचे मक्षेपत थोडथोडे विवरण करावयाचे झाल्यास तो देखील एक स्वतत्र ग्रथच होईल म्हणून त्यापैकी निवडक अशा एकदोन गोष्टीचेच वर्णन येथे करण्याचे योजिले आहे त्यावरून देखील राजपुताच्या कला-प्रियतेची व सौदर्याभिज्ञतेची वाचकाना कल्पना येऊ शकेल व ह्या असल्या सुन्दर व भव्य कलाकृति निर्माण करणारी जाति किती सुसस्कृत असली पाहिजे व तिच्या बुद्धीचाही केवढा विकास झाला असला पाहिजे, याची कल्पना येईल

**२९. चितोडचा कीर्तिस्तम्भ.** कलेच्या दृष्टीने विचार कर-ताना देखील आपणास प्रथम राणा कुभाच्या कालाकडेच नजर फेकली पाहिजे राणा कुभाने गुजराथ व माळव्याच्या सुलतानानी आपल्या फौजा सयुक्त करून मेवाडवर हल्ला केला असता त्याचा पराभव केला आणि माळव्याच्या सुलतानास कैद करून चितोडास आणले या प्रचड विजया-च्या स्मृतिप्रीत्यर्थ कुभाने एक विजयस्तभ उभारण्याचे ठरविले हाच तो चितोडचा प्रसिद्ध कीर्तिस्तम्भ होय वरील विजयानतर अकरा वर्षांनी ह्या विजयस्तभाचा पाया घातला गेला आणि एकदर दहा वर्षांत हे भव्य स्मारक पूर्ण करण्यात आले मेवाडच्या आजच्या उत्पन्नाच्या मानाने पाहिले असता त्या राज्याचे दहा वर्षांचे सपूर्ण उत्पन्न खर्च केले तरी हे कार्य सपादन करता येईल किंवा नाही याची शका वाटते, तसेच वर्तमान काळात भौतिक साधनसपत्तीने समृद्ध असलेल्या शिल्पज्ञाना देखील दहा वर्षांच्या अवधीत एवढे प्रचड कार्य कसे पूर्ण करता आले याचे आश्चर्य वाटते ह्या विजयस्तम्भावर पुढील स्फूर्तिदायक वाक्ये ठळकपणे कोरली आहेत–

"गुर्जरकुड व माळव्याच्या राजानी महासागरासारखें अफाट सैन्य घेऊन पृथ्वीस कपायमान करीत मेदपाटावर स्वारी केली तेव्हा—!

"मेरु पर्वताकडे तुच्छतापूर्वक स्मित करून अवलोकन करणारा चितोडच्या भ्रुकुटीचा एक कटाक्ष—!!"

वरील वाक्यावरून हा कीर्तिस्तम्भ आपल्या भव्यतेने व गगनस्पर्शित्वाने मेरु पर्वतास देखील तुच्छ समजत आहे हे दिसते व त्यामुळे त्याच्या कर्त्याविषयी वाचकाच्या देखील अत करणात परम आदर उत्पन्न होतो मग

स्वत च्या डोळ्यानी जाऊन पाहणाराची काय मन स्थिति होत असेल याची कल्पनाच करणे बरे । ह्या कीर्तिस्तम्भावर ‘कीर्तिस्तम्भप्रशस्ति’ नामक महाकाव्य खोदण्यात आले असून त्यात राणा कुभाच्या कारकीर्दीचे वर्णन लिहून ठेवले आहे आणि त्याबरोबरच असले विजयस्तम्भ कसे बाधावेत याविषयी एक स्वतत्र ग्रथ तयार करून तोही ह्या कीर्तिस्तम्भावरच कोरून ठेवण्यात आला आहे ओझाजी म्हणतात त्याप्रमाणे “ हा कीर्तिस्तम्भ सबध भरतवर्षांत हिन्दु जातीच्या कीर्तीचा एक अलौकिक आधारस्तम्भ होय ” यात शका नाही

३०. **राजसमुद्र व राजप्रशस्ति.** यानतरचे आणखी महत्त्वाचे उदाहरण म्हणजे राणा राजसिंहाने बाधलेल्या ‘राजसमुद्र’ नामक सरोवराचें होय राजप्रशस्ति महाकाव्यात म्हटले आहे की—

अखर्वयो पर्वतयोरन्तरे गोमती नदी ।
रोद्धु बद्धु महासेतु राणेन्द्रो यत्नमादधे ॥

‘दोन उच पर्वताच्या मध्ये गोमती नदीचे पात्र अडवून हा विस्तीर्ण तलाव बाधला’ उदयपूरच्या २५ मैल उत्तरेस अरवलीच्या पायथ्याशी दोन मैलावरील जागा त्याकरिता पसत करण्यात आली राजसमुद्राच्या निरनिराळ्या बाधाची कामे निरनिराळ्या ठिकाणी एकदम सुरू करण्यात आली त्याचे कित्येक विभाग पाडून ते निरनिराळ्या सरदाराच्या देखरेखीखाली देण्यात आले

गरीबदासस्य पुरोहितस्य ज्येष्ठ कुमारो रणछोडराय ।
महाशिला पचसुरत्नपूर्णामादौ दधे तत्र पदस्य पूर्त्यै ॥

मेवाडचा राजपुरोहित गरीबदास याचा ज्येष्ठ पुत्र रणछोडराय याच्या हस्ते या राजसमुद्राच्या बाधाचा ‘महाशिलान्याससमारभ’ करण्यात आला ही शिला मोठमोठ्या पचरत्नानी युक्त करण्यात आली होती असे राजप्रशस्ति महाकाव्यात वर्णन केले आहे इ० स० १६६२ पासून इ० स० १६७६ पर्यंत एकूण १४ वर्षे पर्यंत ह्या प्रचड तलावाचे बाधकाम सारखे सुरू होते त्याचा एकूण परिघ बारा कोसाहून कमी नाही ह्या एवढ्या प्रचड तलावाचा सबध बाध निव्वळ सगमरवरी दगडाचा बाधलेला

आहे व त्यावरील सर्व पायऱ्या देखील याच पाढऱ्या शुभ्र स्फटिकासारख्या पाषाणाने बाधलेल्या आहेत त्याच्या सभोवार सुदर वृक्षराजि लावलेली आहे त्याच्या दक्षिणेच्या बाजूस राजसिहाने राजनगर नावाचे शहर व किल्ला बाधविला व श्रीकृष्णाचे एक सुदर मदिरही बाधविले ह्या तलावाच्या बाधणीकरिता राजसिहास एक कोटि रुपयाहून अधिक खर्च आलेला आहे राजप्रशस्तीमध्ये त्याची नक्की सख्या १०५०७६०८ रुपये* दिली आहे तलावाचे काम पूर्ण झाल्यावर गुजराथी व पजाबी कारागिरानी मिळून बाधलेली एक विशाल नौका त्यात सोडण्यात आली व त्याबरोबरच त्याच्या प्रतिष्ठापनेचा समारभ उरकण्यात आला हा समारभ पाहण्यास एकदर ४६ हजार ब्राह्मण वगैरे लोक आले होते ह्या समारभात राणा राजसिहाने जगाच्या इतिहासात अपूर्व अशी स्वत ची रत्नतुला करवून ती दान केली त्याच्या स्त्रियानी, अन्य परिवारस्थ जनानीही आपापल्या सुवर्ण अथवा रौप्य तुला करविल्या व इतरही अनेक प्रकारची दाने दिली हजारो लाखो लोकाना अन्नवस्त्र इत्यादि देऊन सतुष्ट करण्यात आले कारागिराचा बहुमान करण्यात आला ह्या राजसमुद्राच्या नौचौकी नामक बाधावरील पचवीस बृहत्पट्टिका म्हणजे महाशिलावर आतापर्यंत उल्लेखिलेले राजप्रशस्ति नामक महाकाव्य खोदण्यात आले असून त्यात राजसिहाच्या कारकीर्दीचे वर्णन करण्यात आले आहे शिलावर खोदण्यात आलेल्या ग्रथात हाच सर्वांत मोठा ग्रथ होय असे म्हणतात ह्या काव्याचा लेखक तैलग जातीचा असून कठोडी कुलातील गोसावी मधुसूदनाचा पुत्र रणछोडभट्ट असे त्याचे नाव आहे ह्या काव्याच्या अती तलावाचे काम सुरू असताना त्यावर निरीक्षण करणाराची आणि त्यात कामे करणाऱ्या मुख्य मुख्य कारागिराची नावेही हिदी भाषेत दिली आहेत राजसमुद्र हा राजसिहाच्या हातचा कला या दृष्टीने निर्माण झालेला अपूर्व नमुना होय व तो राजपुताच्या गौरवाचा अखड प्रकाशमान असणारा ध्रुवतारा होय असेच कोणासही कबूल करावे लागेल

---

* एका कोटिः पचलक्षाणि रूप्यमुद्राणा वा सत्सहस्राणि सप्त ।
रम्यान्यस्मिन् षट्शतान्यष्टक वै कार्ये प्रोक्तं पक्ष एव द्वितीये ॥

**३१. खरें सौन्दर्य व कला प्रजाहिततत्परतेंत आहे.** कला या दृष्टीने तर राजसमुद्राचे महत्त्व आहेच पण दुष्काळपीडित प्रजेचे कष्ट निवारण करण्यासाठी हे अपूर्व काम अगीकारण्यात आले ही गोष्ट त्याहूनही अधिक महत्त्वाची आहे सन १६६१ साली राजस्थानात एक भयकर दुष्काळ पडला चारणाने त्या प्रसगाचे अत्यत करुणाजनक पण फारच बहारीचे वर्णन केले आहे तो म्हणतो—

"आकाशातून पाण्याचा एक थेब सुद्धा पडला नाही बरसातीचे सर्व महिने निघून गेले पाण्यासाठी जग नैराश्यात बुडून गेले लोक भुकेने वेडे होऊ लागले अन्न म्हणून कधीही उपयोगात न येण्याऱ्या वस्तूही लोक खाऊ लागले नवरा बायकोस व बायको नवऱ्यास सोडून गेली मायला लेकरू भारी झाले आईबापानी पोटची मुले विकली जसजसा काळ गेला तसतसा दुष्काळ अधिक जाणवू लागला तो सर्वत्र पसरला किडयाना सुद्धा भक्षण करण्यास काही न मिळाल्याने तेही नाश पावले सहस्रावधि आबालवृद्ध स्त्रीपुरुष अन्न अन्न करून प्राण सोडू लागले. पश्चिमेकडून येणाऱ्या वायूनी आपल्या बरोबर साथीचा रोग आणला

"आकाशात ढग दिसेना मग मेघाचे गडगडणे अथवा विजाचा चमचमाट तर लाबच ! रोग आपले पाश सर्वांवर पसरू लागला सबध मनुष्यजातीवर मृत्यूची छाया पसरली नद्या, ओढे व सरोवरे वाळून शुष्क झाली. धर्मगुरु आपली कर्तव्ये विसरले वर्णभेद व जातिभेद पार नष्ट होऊन वर्णसकर झाला ब्राह्मण कोण व शूद्र कोण हें ओळखता येईनासे झाले शक्ति, शहाणपण, जात, गोत इत्यादि सर्व नष्ट झाली फक्त 'अन्न' एवढा एकच ध्वनि ज्याच्या त्याच्या तोडून निघत होता फळे, फुले, पाने, प्रत्येक बनस्पति, नव्हे झाडाच्या फाद्यासुद्धा तोडून क्षुधाशमनार्थ लोक भक्षण करू लागले छे ! मनुष्य मनुष्यास खाऊ लागला शहरे ओस पडली वशाच्या वश नष्ट झाले मासे दिसेनासे झाले व त्याबरोबरच जीवनासबधी प्राणिमात्राच्या आशाही पार नष्ट झाल्या"

अशा भयकर दुष्काळाच्या व प्राणसहारक साथीच्या रोगाच्या तडाख्याखाली उभा राजस्थान सापडला त्या वेळी प्रजेचे पोषण करण्याकरिता व भविष्यकाळात कधी असला दुष्काळ पडला तर तेव्हाही प्रजेचे

सरक्षण व्हावे म्हणून राणा राजसिहाने वर सागितलेल्या राजसमुद्राच्या बाधणीस प्रारभ केला राजसमुद्र विशाल आहे, त्याला बाधण्यास फार मोठा खर्च आलेला आहे, तो फार सुदर आहे, ह्या सगळ्या गोष्टी खऱ्या ! परतु खरे सौदर्य व खरी कला ह्यापैकी कोणत्याही गोष्टीत नसून ज्या प्रजाहिततत्परतेच्या भावनेने व ज्या काळात तो बाधला गेला त्यात आहे. अन्नान्न करून तडफडून मरत असलेल्या लक्षावधि लोकाच्या पोटात घास घालण्याकरिता ह्या भव्य कार्याचा उपक्रम झाला असून त्यायोगें अनत भविष्यकाळपर्यंत राष्ट्राचे कल्याण करीत राहण्याचा जो गुण राजसमुद्रात आहे त्यात खरे सौदर्य व कला ही भरलेली आहेत इतकी व्यापक राष्ट्रोपयोगी कामगिरी, मानव्यतेवर एवढा थोर उपकार, महान परमेश्वराच्या अशाचे इतके उच्च आविष्करण ज्या बुद्धीने करून दाखविले तिची गावी तेवढी स्तुतिस्तोत्रे थोडीच नव्हेत काय ?

**३२. जयसमुद्र व इतर.** राजसिहाचा पुत्र जयसिह याने जयसमुद्र नावाचा राजसमुद्राहूनही मोठा तलाव बाधला राजसमुद्रात फक्त एका गोमतीचाच प्रवाह अडविण्यात आला परतु जयसमुद्राकरिता गोमती, झामरी, रूपारेल व बगार या चार नद्याचे प्रवाह अडविण्यात आले त्याचा परिघ पधरा कोसाहून अधिक आहे व सबध हिदुस्थानात त्याच्या इतका विस्तीर्ण दुसरा तलाव नाही असे म्हणतात

चितोडचा भव्य कीर्तिस्तभ, राजसमुद्र व जयसमुद्र इतकीच कामे राजस्थानात आज शिल्लक असती तरी देखील राजपुताच्या कलाप्रियतेस जगात श्रेष्ठ दर्जाचे स्थान प्राप्त झाले असते. परतु त्याशिवाय आणखीही अनेकविध गोष्टी वरील विधान प्रेक्षकाच्या मनावर ठसविण्यास आपापल्या जागी उभ्या आहेत त्यातल्या त्यात पिशोल्याचे रमणीय सरोवर, त्याच्या आतील व काठावरील सुदर राजमदिरे, जयपूर, जोधपूर इत्यादि ठिकाणची प्रेक्षणीय बाधकामे, इत्यादिकाच्या ठिकाणी राजपूत जातीने दाखविलेले अलौकिक कल्पनाचातुर्य व रचनाकौशल्य याच्यायोगे कोणीही सहृदय मनुष्य मुग्ध होऊन जाईल राजपुतानी चित्रकलेचा देखील तितकाच विकास केला होता असे आता सिद्ध झाले आहे काग्रा व नाथद्वारा येथील चित्रकलेच्या परपरेचे आज देखील अनुकरण करण्यांत येते व तेथल्या

इतकी भावपूर्ण चित्रे काढण्याचा प्रयत्न जर यशस्वी झाला तर आजचे चित्रकार देखील आपणास धन्य मानतात, इतकी चित्रकलेची उन्नति राजपुतानी केलेली होती निरनिराळ्या ठिकाणची रगीत चित्रें, मूर्ति, बागबगीचे, कारंजीं, इत्यादि शेकडो गोष्टी अशा दाखविता येतील की, त्यावरूनही पुन राजपुताची कलाप्रियताच वारवार सिद्ध होऊ शकेल

**३३. उपसंहार.** साराश, उच्च प्रकारच्या सस्कृतीची जेवढी म्हणून लक्षणे आहेत त्यात साहित्य व कला हे प्रधान लक्षण असून त्याचा राजपुतानी व त्याच्या राजानी अत्युत्कट विकास करून दाखविला आहे व आपली श्रेष्ठता सिद्ध केली आहे ज्ञान परमेश्वराचे स्वरूप होय तर कला त्याच स्वरूपाचा विलास होय ज्ञानाचा व कलेचा सबध इतका निकटवर्ती आहे साहित्य हे ज्ञानाचे वाङमयस्वरूप असल्याने त्याशी कलेचा अविच्छिन्न असा सबध जोडण्यात येतो सामान्य समजूत अशी आहे की साहित्य व कला याच्या विकासास दीर्घकालीन शातता आणि आत्यतिक आर्थिक समृद्धि या दोन गोष्टीची जोड मिळावी लागते परतु राजपूत जातीच्या करामतीने ही समजूत खोटी करून दाखविली आहे राजस्थानचा गत-सहस्रकाचा इतिहास हेच दाखवितो की, या अभागी देशास चिरशातीचे दिवस असे फारसे लाभलेच नाहीत प्रत्येक राजाची कारकीर्द परकीयाशी लढून आपले अस्तित्व कायम टिकविण्यातच कारणी पडली असे असताही राजपूत जातीने साहित्य व कलेचा जो सर्वांगीण विकास करून दाखविला तो खरोखर तीस भूषणावह होय सबध हिंदु जातीस व भारतीय राष्ट्रास त्याबद्दल अभिमान वाटला पाहिजे "आपण राजस्थानात कोठेही पचवीस कोसाचा प्रवास केला तरी, प्राचीनकाळची सपत्ति, बुद्धिमत्ता व प्रज्ञाशीलता याचे अवशेष, गभीर विचाराची शास्त्रें, अथवा जीवनास आनद देणाऱ्या कला आपणास आढळून आल्याशिवाय राहणार नाहीत" अशा अर्थाचे कर्नल टॉडने जे उद्‌गार काढले ते वरील वर्णन वाचून यथार्थ नाहीत असे कोण म्हणेल ? आणि टॉडसारख्या परकी पडितालाही जर राजपुताचे साहित्यज्ञान व कला, बुद्धिमत्ता व वैभव, पराक्रम व शील इत्यादि गुण इतके मुग्ध करून टाकतात तर त्याबद्दल आम्हा भारतीयाना किती आदर व किती भूषण वाटले पाहिजे ?

---

## प्रकरण तिसरें

# राजपूत स्त्रिया व त्यांचें समाजांतील स्थान

१. **स्त्रीदाक्षिण्य उच्चसंस्कृतीचें लक्षण.** "इतर अनेक वस्तूप्रमाणेच सस्कृति ही जर व्यापार करण्याची एक वस्तु ठरेल आणि स्त्रियाविषयीचा आदर व दाक्षिण्य हीच जर उच्च सस्कृतीची लक्षणे असतील तर भारतीय सस्कृतीस इग्लडमध्ये आणूनच इग्रज जातीचा अतोनात लाभ होणार आहे" पार्लमेंटरी कमिटीपुढे साक्ष देताना १९व्या शतकाच्या प्रारभी सर टॉमस मन्रो यानी काढलेले हे उद्गार आहेत सास्कृतिक दृष्टीने एखाद्या समाजाच्या इतिहासाकडे पाहताना त्या समाजाच्या स्त्रीजाती (Womanhood) कडे लक्ष पुरविणे अवश्य असते आणि सरक्षण, स्वातत्र्य, शिक्षण, मातृपद इत्यादि दृष्टीनी त्या समाजात स्त्रीजातीचे स्थान कोणते होते अथवा आहे हे निश्चित करावे लागते पार्लमेंटरी साक्षीत वरील इग्रज गृहस्थाने भारतीय स्त्रियाविषयी दिलेला अभिप्राय राजपूत स्त्रियानाही उत्तम रीतीने लागू पडतो असे राजपुताच्या एकदर इतिहासाचे मार्मिक अवलोकन केल्यास दृष्टोत्पत्तीस येते

२. **पडदा-संरक्षणाचें साधन** प्रारभी सरक्षणाचाच मुद्दा घेऊ प्रत्येक सुधारलेला समाज स्त्रियाना शक्य तितके सरक्षण देण्याचा प्रयत्न करीत असतो मुसलमानी वा तत्सम अन्य समाजात पडद्याच्या अथवा गोषाच्या ज्या चाली प्रचारात आल्या त्यामुळे त्या समाजातील स्त्रियाचे स्वातत्र्य मर्यादित झाले असले तरी त्याच्या मुळाशी स्त्रियाच्या सरक्षणाचीच कल्पना असली पाहिजे हे उघड आहे राजपूत समाजातही पडद्याची चाल आहे विषेशत राजघराण्यातल्या अथवा उच्चकुलोत्पन्न स्त्रिया पडदा राखतात महाराष्ट्रातही देशमुख, पाटील इत्यादि पूर्वीच्या मोठ्या घराण्यातील स्त्रिया गोषा पाळतात परतु राजपूत स्त्रियाचा पडदा मुसलमानाच्या बुरख्याइतका कडक कधीच नव्हता केवळ स्त्री आणि

पुरुष याच्या मधली नैसर्गिक मर्यादा पालन करण्याचे आणि स्त्रियासबधीचे पावित्र्य कायम राखण्याचे कार्य सफल होईल इतक्याच बेताचा पडदा राजपुतात असल्याने तो स्त्रियाच्या उन्नतीच्या कार्यांत केव्हाच आड पडला नाही पड्यात राहूनही राजपूत स्त्रियानी स्वत च्या कर्तबगारीने समाजात अत्यत आदराचे स्थान सपादन केले होते हे पुढील वर्णनावरून दिसून येईलच येथे पड्याचा उल्लेख करताना तो स्त्रीसरक्षणाचे साधन म्हणूनच उपयोजिला जात असे एवढेच सागावयाचे आहे

कित्येक लोक पड्याचा फार विपरीत अर्थ करीत असतात स्त्रियाना स्वतत्र अत पुरे असणे अथवा त्यानी पड्यात राहणे म्हणजे गोठ्यात कोडून राहणाऱ्या जनावराप्रमाणे होय असाही आशय प्रतिपादण्यात येत असतो येथे पडदा चागला अथवा वाईट याचे विवेचन करावयाचे नाही पण ज्या समाजाच्या सस्कृतिवैशिष्ट्याकडे आपण लक्ष पुरवीत आहो त्या समाजाची या बाबतीतली मनोभूमिका लक्षात आणल्याशिवाय त्याच्या चालीवर असा आघात करणे योग्य होणार नाही राजपुतानी स्त्रियाना 'देवी' ही पदवी दिलेली आहे ही देवी शक्तिरूपाने प्रत्येक प्राणिमात्राच्या ठिकाणी सस्थित झालेली आहे–'या देवी शक्तिरूपेण सर्वभूतेषु सस्थिता', हीच मनुष्याच्या ठिकाणी स्फूर्ति उत्पन्न करणारी देवता आहे, अशी त्याची कल्पना आहे स्त्रियाविषयीचा आपला आदर राजपुतानी प्रत्येक स्त्रीपुढे लावण्यात येणाऱ्या देवी या उपपदाने व्यक्त केला आहे मराठीतही प्रत्येक स्त्रीच्या नावापुढे लावण्यात येणाऱ्या बाई अथवा ताई या उपपदाने स्त्रीसबधी भगिनीभावच निर्माण करण्यात आलेला आहे अशाप्रकारे ज्या समाजाने प्रत्येक स्त्रीकडे देवताभावाने पाहण्याची बुद्धि पुरुषाच्या ठिकाणी उत्पन्न होईल अशी भाषेतच योजना केली आहे त्याने स्त्रियाना पड्यात ठेवतानाही त्याच्या सरक्षणाचाच विचार अधिक केला असला पाहिजे हे उघड आहे

स्त्री म्हणजे पुण्यपावन लोकाच्या घरातील प्रत्यक्ष श्रीसमृद्धि होय 'या श्री स्वय सुकृतिना भवनेषु ।' अशी सर्वसाधारण आर्यांबरोबरच राजपुताचीही धारणा असल्याने ह्या 'श्री'चे–ह्या गृहलक्ष्मीचे–सरक्षण करण्यासाठी राजपूत वीर विशेष दक्ष असत

पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
रक्षन्ति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ।।

ह्या सुप्रसिद्ध श्लोकात स्त्रियाना स्वातत्र्य देऊ नये असा ध्वनि नसून त्याचे सदैव सरक्षण करावे, त्याना असरक्षित अशा केव्हाच ठेऊ नये असा स्पष्ट आदेश दिला आहे, असा मागील तीन चरणाच्या सदर्भाने चौथा चरण वाचला असता त्याचा सरळ अर्थ करावा लागतो आणि हे सरक्षण तरी स्त्रियाना काय म्हणून ? त्या अबला आहेत म्हणून ? स्वसरक्षणार्थ असमर्थ आहेत म्हणून ? त्या पगु, भित्र्या आहेत म्हणून ? खात्रीने नव्हे ! कारण सामान्यत राजपूत स्त्रिया मोठ्या बलवान, स्वसरक्षणक्षम, शस्त्र-कलाभिज्ञ व शूर होत्या, त्यानी कित्येक ठिकाणी समरागणात तरवार गाजवून पुरुषानाही लाजविणारा पराक्रम व्यक्त करून धारातीर्थी देह ठेविला आहे सारांश, घोड्यावर बसणे, धनुष्यबाण चालविणे, तरवार भाला फिरविणे, दाडपट्टा खेळणे इत्यादि सरक्षणाच्या कला त्याना पूर्णपणे अवगत असल्याने आज आपण समजतो त्या अर्थाने त्याना वास्तविक सरक्षणाची आवश्यकताच नव्हती कारण कोणत्याही वैयक्तिक आक्रमणा-पासून स्वत चे रक्षण करण्याची शक्ति त्याच्यात पूर्णपणे वास करीत होती. मग समाजाने त्याना सरक्षण दिले म्हणजे काय केले ? त्याना पडद्याच्या आड का ठेवले ? याचे उत्तर, समाज त्याना सर्वाहून पूज्य व सन्माननीय मानीत होता म्हणून, असेच दिले पाहिजे आपणास प्रिय अशी वस्तु आपण जशी अधिक काळजीपूर्वक साभाळतो, आपणास पूजनीय अशा साधुसतास जसे आपण शक्य तितके सन्मानाने वागविण्याचा प्रयत्न करतो, आपल्या वदनीय देवतेची प्रतिष्ठापना जशी आपण देवळाच्या अगदी आतील गाभा-ऱ्यात करतो, त्याचप्रमाणे राजपुताना स्त्रीजाति ही सर्वांत पूजनीय वाटत असल्याने तिला त्यानी आपल्या कल्पनेप्रमाणे अधिक सुरक्षित ठिकाणी, देवतेच्या प्रतिमेप्रमाणे देवळाच्या अगदी गाभाऱ्यात–अत पुरात–ठेवण्याचा प्रयत्न केला व कोणीही सद्भावनाचा मनुष्य त्याच्या हेतूबद्दल त्याना दोष देईल असे वाटत नाही

**३. रक्षाबंधनाचें अपूर्व महत्त्व.** अशा तऱ्हेने एका परीने स्त्रियाना प्रतिदेवता मानून आपल्याकडून त्याचा शक्य तितका सन्मानपूर्वक

साभाळ करण्याचा तर राजपूत समाजाने प्रयत्न केलाच पण त्याहीपेक्षा अधिक म्हणजे त्यानी समाजात अशा एका विशिष्ट रूढीचा प्रचार केला की ज्यायोगें समाजातल्या कोणत्याही स्त्रीस आपण एकाकी अथवा असहाय आहोत, आता या जगात आपले कोणीच नाही, असे कधीही वाटू नये, भर्तृकुल व भ्रातृकुल या उभयतातून काही दैवी अथवा मानुष आपत्तीमुळे निराश्रय व एकाकी झालेल्या स्त्रीलाही आश्रय मिळावा व तोही अत्यत जिव्हाळयाचा ! ही रूढि म्हणजे रक्षाबधनाची होय स्वत ला स्त्रीदाक्षिण्याचे परम उपासक म्हणविणाऱ्या पाश्चिमात्य समाजाला सुद्धा मुग्ध करून टाकील इतक्या श्रेष्ठ दर्जाचे स्त्रीदाक्षिण्य या रक्षाबधनाच्या रूढीने राजपुतानी व्यक्त केले आहे 'रक्षाबधन' या नावाचा श्रावण शुद्ध पौर्णिमेस त्यानी एक सणच करून टाकला आहे स्त्री व पुरुष याचे सबध निर्मळ व पवित्र ठेवण्यास व कोणत्याही सकटग्रस्त स्त्रीस आपल्या सकटाचा परिहार व्हावा एतदर्थ सुरक्षित आश्रयार्थ जाण्यास या प्रघाताने सुविधा करून ठेवली आहे रक्षाबधनाच्या उपर्युक्त दिवशी प्रत्येक बहीण आपल्या भावाच्या मनगटास आपापल्या ऐपतीप्रमाणे रेशमाची, चादीची, सोन्याची अथवा जडावाची राखी बाधते व भाऊही तिच्या या प्रेमाच्या मोबदल्यात कोणत्याही सकटात तीस मदत करण्याची प्रतिज्ञा करतो ज्या स्त्रियाना सख्खे भाऊ नसतील त्या देखील ह्या सणाच्या दिवशी आपल्या माहितीतील एखाद्या गुणवान् व पराक्रमशाली राजपुतास राखी बाधतात व अशा तऱ्हेने त्याशी भ्रातृभावाचे नाते जोडतात राखीचे महत्त्व राजपूत तरुण प्राणापेक्षाही अधिक समजतात राखीकरिता समाजाने जरी एक विशिष्ट दिवस योजून ठेविलेला असला तरी राखी याच विशिष्ट दिवशी बाधली पाहिजे, अन्य दिवशी बाधता येतच नाही असेही नाही आपद्ग्रस्त स्त्री कोणत्याही वेळी कोणाही राजपुतास राखी बाधू शकते, अथवा तो परगावी असल्यास त्यास राखी पाठवू शकते कोणाही स्त्रीकडून एकदा राखी आली की, तो तिचे प्राणपणाने सरक्षण करील सख्या बधूपेक्षाही 'राखीबद भाई'चा मान अधिक व त्यासही आपल्या राखी पाठविणाऱ्या बहिणीच्या सरक्षणाची काळजी अधिक ! मग राखीने नाते जोडणाऱ्या ह्या बहीणभावाची उभ्या जन्मात प्रत्यक्ष ओळख नसली तरी चालेल अत्यत सकटाच्या प्रसगी

राजपूत रमणीकडून अशा प्रकारे राखी आली की, स्वत ची हजार वैयक्तिक कामे बाजूस ठेऊनही त्या पुरुषाने त्यास राखी पाठविणाऱ्या त्या अदृष्ट-आकृति व अज्ञातप्रकृति भगिनीचे सरक्षण केलेच पाहिजे अशी अनुल्लघनीय प्रथाच राजपुतानी घालून ठेवली आहे

**४. मोगल बादशहांच्या राजपूत भगिनी.** राजपूत समाजातील या प्रथेचे राजपूत लोक अत्यत आदराने पालन करीत असले तर त्यात काहीच आश्चर्य नाही पण तिच्या भव्यतेने व उदारतेने मुसलमानातील थोर पुरुषाना व मोगल बादशहाना सुद्धा मोहून टाकले होते हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे गुजराथचा सुलतान बहादूरशाह याने चितोडवर स्वारी करून मेवाडसारख्या राष्ट्रावर घोर सकट आणले असता अशा आणीबाणीच्या प्रसगी राणा सगाची विधवा राणी कर्मवती हिने मोगल बादशाह हुमायून यास राखी पाठविली ह्या राखीबरोबरच तिने जे पत्र लिहिले त्यात "प्रिय बधु, धाकटया उदयसिहाचा मामा व सरक्षणकर्ता" या सज्ञानी तिने हुमायूनला सबोधिले होते राखीचा सर्व अर्थ राजपूत रीतिरिवाजाशी बाल्यापासून अभिज्ञ असलेल्या हुमायूनच्या ताबडतोब ध्यानात आला व दुसऱ्या कोणाही राजपूत वीराप्रमाणे त्यानेही कर्मवतीला सरक्षण देण्याच्या कामी आपली सर्व शक्ति उपयोगात आणली हुमायूननतर झालेले बहुतेक मोगल बादशाहा मेवाडच्या राजपत्न्याचे राखीबद भाई होणे म्हणजे आपला मोठाच सन्मान झाला असे ससजत असत इतकेच काय, पण हिंदू जातीचा व विशेषत राजपुताचा कट्टा व दीर्घ द्वेष करणारा औरगजेब सुद्धा उदयपूरच्या राणीचा राखीबदभाई होता व त्याबद्दल तो स्वत स मोठा भाग्यशाली समजत असे त्याने तिला अनेक पत्रें लिहिली असून त्या प्रत्येकात "प्रिय व गुणशाली भगिनी" असे मोठया गौरवाने आळविले असून मोठया पवित्र व आदराच्या शब्दानी आपला जिव्हाळा व्यक्त करून तिच्या स्वास्थ्याची व कल्याणाची चौकशी केली आहे साराश, दुसऱ्या कोणत्याही समाजात नसेल इतकी स्त्रियाच्या सरक्षणाची उत्कृष्ट व्यवस्था राजपूत समाजाने करून ठेवली आहे तिच्या मूळच्या स्फूर्तिप्रद ज्योतीसह आजच्या विसाव्या शतकातील कोणत्याहि सुधारलेल्या समाजाने स्वहिताकरिता तिचे अनुकरण करावे इतकी ती उज्ज्वल आहे !

**५. स्त्रीस्वातंत्र्याचा पुरस्कार.** वर वर्णन केल्याप्रमाणे राजपुतानी आपल्या समाजातील स्त्रियाच्या सरक्षणाची उत्तम व्यवस्था केली होती पण त्यामुळे त्याच्या स्वातत्र्याची यत्किचित् देखील हानि झाली नव्हती वास्तविक खऱ्या स्त्रीस्वातत्र्याची परीक्षा वधूने वरास पसत करण्याची मोकळीक असण्यात दिसून येते ज्या समाजातील स्त्रियाना इतर सर्व प्रकारचे स्वातत्र्य आहे पण वधूस वर निवडण्याचा अधिकार नाही त्यात खरे स्त्रीस्वातत्र्य नाही असेच म्हणावे लागेल आणि या दृष्टीने पाहिले असता राजपूत समाजात स्त्रीस्वातत्र्य चागल्या प्रमाणात विद्यमान होते असेच कबूल करावे लागेल राजपूत तरुणी जरी पडद्या आड राहत असल्या तरी त्याना ठिकठिकाणच्या तरुणाच्या शौर्याची, उदारतेची, भव्यतेची, पुरुषकाराची इत्यादि अनेक गुणाची चारणादिकाच्या द्वारे उत्तम माहिती असे व त्याप्रमाणे ह्या श्रुतकीर्ति तरुणामधून आपणास पसत येईल तो वर त्या निवडीत कित्येक प्रसगी आपण ज्यास वरणार त्याच्या बहादुरीच्या गुणाचीही त्या पूर्ण परीक्षा करून घेत व नतरच त्याच्या गळयात वरमाला समर्पण करीत अभिजात अभिरुचीची स्त्री स्त्रीसदृश नाजूकपणा, नटवेपणा इत्यादि गुणावर मुग्ध नसून पौरुषयुक्त पराक्रमावर, उदार चारित्र्यावर अथवा भव्य कृत्यावर लुब्ध होत असते 'उत्कट भव्य' कोणते हे ओळखण्याची बुद्धि स्त्रियाच्या ठिकाणी निसर्गत च उत्पन्न झालेली असते किबहुना शर्विलकाने मृच्छकटिकात म्हटल्याप्रमाणे—

स्त्रियो हि नाम खल्वेता निसर्गादेव पडिता ।
पुरुषाणा तु पाडित्य शास्त्रादेव हि जायते ॥

स्त्रिया निसर्गपडित असून पुरुषाना मात्र आपले पाडित्य अभ्यासाने मिळवावे लागते राजपूत स्त्रियाच्या ठिकाणी हे निसर्गपाडित्य भरपूर असे व समाजानेही त्याच्या या गुणाची वाढ होण्यास भरपूर अवकाश ठेवला होता त्यामुळे सामान्यत राजपूत तरुणी वीर, पराक्रमी, स्वार्थत्यागी अथवा भव्य कृत्ये करणाऱ्या तरुणाच्या कठातच आपल्या अनुरागाची माला अर्पण करीत, असे सुप्रसिद्ध पृथ्वीराज व सयोगितेच्या उदाहरणावरून वाचकाच्या लक्षात येईल परतु अशा प्रकारची आणखी एकदोन ठळक उदाहरणे वाच-

काच्या माहितीसाठी येथे देत आहे त्यावरून राजपूत स्त्रियाच्या स्वातंत्र्याची कल्पना येऊ शकेल

६. **वीरकन्या तारा.** ठोडचाचा सरदार सूरतन याची जहागीर पठाणानी लुटून उध्वस्त करून टाकली व त्यास असहाय दशेस पोचविले सूरतनास एक तारानामक रूपवती व गुणवती कन्या होती तिने, जो कोणी पठाणावर सूड उगवून आपल्या बापाच्या जहागिरीची सुटका करून देईल त्यास आपण वरू, असा आपला पण बापाच्या संमतीने जाहीर केला राणा संगाचा मधला भाऊ पृथ्वीराज (हा पृथ्वीराज चौहान नव्हे) ह्याने तारेचा पण पूर्ण करून तिच्याशी विवाह लावला पुढे ही तेजस्वी सुंदरी खांद्यावर धनुष्य व बाणानी भरलेला भाता लटकावून पृथ्वीराजा-बरोबर त्याच्या प्रत्येक धाडसाच्या कार्यांत त्याची सहचारिणी राहून असे

७ **सादो व कूर्मदेवी.** पूगलचा सरदार सादो हा अत्यंत शूर तरुण होता जेसलमीरच्या वालुकामय प्रदेशात शिरून देखील त्याने आपला पराक्रम गाजविला होता एके दिवशी असाच तो मुलुखगिरी करीत चालला असता मोहिलचा सरदार माणिकराव याने त्यास आतिथ्यास बोलाविले ह्या पाहुणचारात सादोचे चित्त वृद्ध माणिकरावच्या सौंदर्यशाली कन्येने—कूर्मदेवीने—वेधून घेतले उलट सादोच्या पराक्रमाच्या गोष्टी ऐकून तिचेही मन सादोवर मोहित झाले कूर्मदेवीला मंडोरच्या राठोड महा-राजाने आपल्या युवराजाकरिता अगोदरच मागणी घातली होती परंतु राठोडच्या राजसिंहासनाचा लोभ धरण्यापेक्षा व अलोट संपत्तीत लोळ-ण्यापेक्षा सादोसारख्या शूर तरुणाबरोबर त्याच्या साहसात व संकटात राहून त्याच्या धैर्याचा व शौर्याचा आस्वाद घेणे यातच तिला अधिक आनंद वाटला म्हणून तिने राठोडाच्या राजसिंहासनास झिटकारूनही सादोशीच विवाहबद्ध होण्याचे ठरविले रीतीप्रमाणे सादोच्या बापाकडे नारळ पाठवून संबंध जोडण्यात आला व आपल्या नववधूस घेऊन सादो पूगलकडे जाण्यास निघाला

राठोड युवराज अरण्यकमल यास ही वार्ता कळताच त्याने सुमारे चार हजार राठोड वीर बरोबर घेऊन सादोच्या वरातीवर स्वारी केली सादोबरोबर त्याच्या भट्टीवंशाचे फक्त ७००च वीर होते. धर्मयुद्धाची

कल्पना दोघाच्याही ठिकाणी जागृत होती शिवाय एका तरुणीप्रीत्यर्थ होणारे हे युद्ध विशेष पवित्र समजले जाऊन धर्मयुद्धाचे सर्व नियम पाळण्याचे उभयतानी ठरविले अरण्यकमलने आपल्या पक्षातील ७००च राठोड वीराना सादोच्या भट्टीवीराबरोबर लढण्याकरिता बाहेर काढले लढाई सुरू होऊन दोन्ही पक्षाचे पाचपाचशे वीर पडले तेव्हा इतका मनुष्यनाश करण्यापेक्षा आपण द्वद्वयुद्ध खेळूनच युद्धाचा निकाल लावू असा विचार करून त्यानी द्वद्वास प्रारभ केला द्वद्वास प्रारभ करताना सादोने आपल्या नूतन वधूचा निरोप घेतला सादोस युद्धासाठी उत्तेजित करीत ती म्हणाली, ''सादो, तुमचा पराक्रम पाहत मी येथे उभी आहे तुम्ही जर युद्धात पडलात तर मीही तुमच्या मृत्यूची भागीदारीण होईन'' सादो व अरण्यकमल याचे घोर द्वद्वयुद्ध झाले व दोघेही एकमेकाच्या प्रहारानी जखमी होऊन रणागणात मरण पावले कुमारी, सरदारपत्नी व विधवा स्त्रीचे सर्व सोहाळे कूर्मदेवीस इतक्या अल्पावधीतच भोगावयास मिळाले दोन्ही पक्षाचे सेनापति अशा तऱ्हेने पडल्यावर साहजिक युद्ध एकदम बद झाले कूर्मदेवीने दोन्ही पक्षातील सैनिक पाहत असताना एक तरवार मागविली व ती एका हातात ग्रहण करून तिने स्वत चा दुसरा हात खाद्यापासून तोडून टाकला व म्हणाली, ''माझ्या नाथाच्या पिताजीकडे हा हात घेऊन जा'' नतर तिने अन्य सैनिकाकडून आपला दुसरा हात तोडविला व सागितले, ''हा हात माझ्या वृद्ध पित्यास नेऊन द्या,'' आणि अनुक्रमे आपला श्वशुर व पिता याच्याकरिता ''तुमची स्नुषा व कन्या अशी होती'' असा निरोप पाठवून तिने सर्वासमक्ष आपल्या पतीच्या शवाबरोबर चितेवर आरोहण केले. सादोच्या वृद्ध पित्यानें आपल्या ह्या दिव्य स्नुषेच्या बाहूचे दहन करवून त्या ठिकाणी 'कूर्मदेवीचा तलाव' नावाचा तलाव बाधला

राजपूत स्त्रियाचे आपला पति आपणच निवडण्याचे स्वातत्र्य हे असे होते तरुणीचा तरुणाकडून किती आदर होई व त्याच्या प्राप्त्यर्थ होणाऱ्या युद्धातही कसे पावित्र्य उत्पन्न होत असे याची वरील गोष्टीवरून उत्तम कल्पना येईल कूर्मदेवीसारखी दैवी रमणी सादोबरोबर विवाह करावयास केवळ शारीरिक प्रेमामुळे तयार झाली होती असे कोण म्हणेल ? पार्थिव प्रेमाच्याही पलीकडे असलेल्या सादोच्या गुणावरच ती

खरोखर लुब्ध होती म्हणून सादोस मृत्यूचे निमत्रण आले तरी तीस बिलकूल वाईट वाटले नाही इतकेच नव्हे तर पतीच्या अशा वीरमरणातच तीस परम आनद वाटला व पतीइतक्याच धैर्याने व शौर्याने आपले दोन्ही हात कापून तिने आपल्या व पतीच्या पित्याकडे पाठविले आणि स्वत पतीच्या शवाबरोबर सहगमन केले. ह्या सर्व प्रकारात शौर्यादि पौरुष-गुणावर अनुरक्त असलेले तिचे दिव्यतर प्रेमच दिसून येते यात शका नाही

८. **मातृकुलाचा अभिमान.** हे झाले वर पसत करण्याचे स्वातत्र्य पण एकदा पतीच्या घरी गेल्यानतरही स्त्रियाना तितकेच स्वातत्र्य असे व त्याच्या मानापमानाच्या भावनाचा सर्व पुरुष मोठ्या आस्थेने आदर करीत अबरचा राजा जयसिह याने हाडावतीच्या राजकन्ये-बरोबर विवाह केला होता मोगल बादशहाच्या सपर्कात येऊन अबरच्या दरबारात बादशाही अतएव सुधारलेले म्हणविले जाणाऱ्या दरबारी रीति-रिवाजाचे व पोशाखादि झगमगाटाचे फारच प्रस्थ माजले होते बिचारी हाडावतीची साधी, सुशील व कुलीन राजकन्या या सर्व मोगली राजो-पचारास अनभिज्ञ होती त्यामुळे तिच्या पोषाखात वगैरे अबरच्या स्त्रिया-इतका भपकेदारपणा व डामडौल आला नव्हता एके दिवशीं जयसिह पत्नीबरोबर एकटाच एकातात असताना अबरच्या सुधारलेल्या स्त्रिया-बरोबर हाडावतीच्या मागासलेल्या स्त्रियाची सहज थट्टेथट्टेने तो तुलना करू लागला. परतु आपल्या माहेरच्या स्त्रियाची ही अल्पशी थट्टा देखील सहन न होऊन तिने खुटीवरची तरवार उचलून म्यानातून बाहेर काढली व दरडावून अभिमानाच्या स्वरात ती जयसिहास म्हणाली, "ज्या वशा-तून मी आले आहे त्याची असली थट्टा मी सहन करणार नाही परस्पराचा आदर करण्यानेच आपण सुखी होऊ शकू अबरचे राजे जर पुन्हा असली अभद्र थट्टा करतील तर ही तलवार त्याची तोडें बद पाडण्यास पूर्ण समर्थ आहे हे लक्षात ठेवा" ह्यानतर पुन केव्हाही तिच्या मनास वाईट वाटेल असा उणा अधिक शब्द जयसिहाने काढला नाही पडद्याच्या आत अत पुरात देखील राजपूत स्त्रिया इतक्या स्वतत्र असत व आपल्या मातृ-पितृकुलाच्याही मानाचे रक्षण करण्यास त्या इतक्या सज्ज असत !

९. **स्त्रियांचें शिक्षण.** राजपूत समाजाने स्त्रियाना दिलेले हे सरक्षण व स्वातत्र्य त्याच्या वैयक्तिक सद्‌गुणामुळे अधिकच खुलून दिसते.

कोणत्याही गोष्टीपेक्षा वीरत्वाचे त्याना सर्वांत अधिक आकर्षण वाटत असे पराक्रम अथवा शौर्य यापुढे त्याना सपत्ति अथवा सन्मान याची यत्किंचित पर्वा वाटत नसे त्याना लिहिण्यावाचण्याचे शिक्षण मिळत असे यात तर शकाच नको कारण राजपूत कुलात कित्येक मोठया विदुषी, कवयित्री व विद्यानुरागी स्त्रिया निघाल्या आहेत मीराबाईच्या विद्याभिरुचीचे व काव्यगुणाचे वर्णन मागे आलेच आहे राणा कुभाने आपल्या गीतगोविदावरील रसिकप्रिया नामक टीकेत कुभल्लदेवी व अपूर्वदेवी नामक स्वत च्या दोन स्त्रियाचे उल्लेख केले असल्याचेही मागेच सागितले आहे व त्यावरून त्याची योग्यता लक्षात येण्यासारखो आहे राजपूत राजे व सरदार याचा, मोगल बादशहाचा व उत्तरकालात छत्रपति शिवाजी महाराज व त्याचे मराठे सरदार याच्या पराक्रमाचा व कर्तबगारीचा सर्व इतिहास राजपूत रमणीना चारणाच्या तोडून ऐकून पूर्ण अवगत असे व त्यायोगे त्या मोठया बहुश्रुत बनलेल्या असत चिकाच्या पडद्याआड बसून राजदरबारात चाललेल्या सर्व घटना त्या अवलोकन करीत व सर्व भाषणे श्रवण करीत त्यामुळे प्रचलित राजकारणाशीही त्याचा पूर्ण परिचय असे राणा प्रतापसिहाची बहीण किरणमयी बिकानेरचा राठोड सरदार पृथ्वीराज ह्यास दिली होती आपल्या पतीबरोबर तीही दिल्लीस राहत असे मुसलमानाच्या राजधानीत राहूनही राजस्थानातल्या घटनाकडे तिचे बारीक लक्ष असे प्रतापाने आपत्तीना त्रस्त होऊन अकबराशी सधि करण्याची आपली इच्छा प्रकट केली तेव्हा किरणमयीने व तिच्या पतीने प्रतापला एक स्फूर्तिप्रद असे काव्यमय पत्र पाठविले व त्यास आपल्या हीन विचारापासून परावृत्त करून स्वातत्र्याचे युद्ध केव्हाही बद न पाडण्याची विनती केली पृथ्वीराजाची दुसरी पत्नी चपादे ही सुद्धा मोठी विदुषी व कवयित्री होती या दोघीही सापत्न स्त्रियाच्या कविता प्रसिद्ध आहेत ही व यासारखी अनेक उदाहरणे देऊन राजपूत स्त्रियाचा सुशिक्षितपणा शाबीत करता येण्यासारखा आहे

**१०. शीलसंन्यास की शीलसंरक्षण.** कित्येक राजपूत तरुणीनी मोगल बादशहाबरोबर विवाह केल्याचे इतिहासज्ञाना विदित आहेच. आपल्या हातानी आपल्या मुली मोगल जनानखान्यात घाल-

णारी अध पतित जाति म्हणून राजपुताचा अनेक ठिकाणी धिक्कारपूर्वक उल्लेख करण्यात येतो अशा तऱ्हेने आपल्या शीलाचा सन्यास करून व कुलाच्या अब्रूचा बाजार करून लाजिरवाणे जिणे घालविणाऱ्या अधमाधम कुलटा म्हणूनही राजपूत स्त्रियाचा निर्देश करण्यात येतो असले लाछनास्पद जीवन घालवून व परधर्मीय आक्रमकाकडून आपले देह विटाळवून जगाच्या इतिहासात उज्वल असलेल्या भारताच्या कीर्तीस कलक लावण्यापेक्षा आत्महत्या करून त्या विनाश का पावल्या नाहीत म्हणून त्याना कुत्सापूर्ण प्रश्न विचारण्यात येतो पण अशा प्रकारचे आक्षेप घेणारे लोक तत्कालीन एकदर राजकीय परिस्थितीकडे पाहत नसावेसे दिसते राजपूत राजे स्वखुषीने आपल्या मुली मोगल बादशहाना देत, तसे करण्यात त्याची मर्जी मपादन करून स्वत करिता मानमरातब मिळवावा अशी क्षुद्र आकाक्षा राजपूत राजे बाळगीत, अशी त्याची कल्पना दिसते पण त्याची ही कल्पना चुकीची आहे कारण कोणाही राजपूत राजाने आपणहून आपली कन्या मोगलाच्या जनानखान्यात घातली नाही अथवा कोणाही राजपूत तरुणीने आपणहून शीलसन्यास केला नाही मोगल राजे अथवा सरदार हे सदा राजपूत स्त्रियाच्या लावण्यावर मोहित असत व त्याच्या प्राप्तीसाठी ते शक्य ते सर्व अत्याचार व प्रयत्न करीत अकबराच्या वेळी राजपूत राजाचा जोर कमी झाला व मुसलमानाचा वाढला व तेव्हापासूनच राजपुताच्या मुली मोगल जनानखान्यात जाऊ लागल्या ज्या वेळी, आपल्या राष्ट्रावर सकट आलेले आहे व स्वारी करून आलेला यवन एक तर मुलगी दे अथवा सबध राज्याची राखरागोळी करतो अशा आग्रहाने तळ देऊन बसला आहे, असा पेच त्याच्या समोर पडे तेव्हा साहजिकच 'त्यजेदेक कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुल त्यजेत्' ह्या नीतीचा त्याना अवलब करावा लागे सबध राज्याच्या सरक्षणासाठी, सर्व कुलाच्या शुद्धीसाठी त्याना एखादी मुलगी या खेपेस नाइलाजास्तव द्यावी लागे तेही त्या मुलीच्या इच्छेविरुद्ध तिला मोगलाच्या जनानखान्यात लोटीत असेही नव्हे तिची जर समति नसेल तर तिच्या शीलाच्या सरक्षणाकरिता लढून मरण्यास ते तयार असत परतु शिक्षणाने सुविद्य व विचारशील झालेल्या, हो म्हणावे तर शील जाते व न

हो म्हणावे तर बापाचे राज्य जाते–राष्ट्राचा नाश होतो–अशा शृगापत्तीत सापडलेल्या त्या मुली पौराणिक कालातील शर्मिष्ठेप्रमाणे आपल्या वैयक्तिक शीलापेक्षा आपल्या राष्ट्राचे सरक्षण करणे अधिक महत्त्वाचे समजत व राष्ट्रहितार्थ हा स्वार्थत्याग–एक प्रकारचा आत्मनाश का म्हणाना–करण्यास सिद्ध होत अशा तऱ्हेने फार दूरवरचा विचार करून काही राजपूत तरुणी मोगल जनानखान्यात गेल्या त्यामुळे त्याचे हे उघड दिसून पडणारे कृत्य दूषणास्पद वाटते परतु त्याच्यापैकी प्रत्येकीने आपल्या स्वत च्या शीलाची आहुती देऊन आपल्या राष्ट्रातील बाकीच्या सर्व स्त्रियाचे शील सलामत ठेवले याची कोणासच कल्पना येत नाही राजपूत राष्ट्राच्या उत्तरकालात अमीरखानासारख्या पेढाऱ्याने जेव्हा राजपुतावर स्वाऱ्या केल्या तेव्हा जोधपूर व जयपूर राज्यातील स्त्रिया पैशाला एक या किमतीने विकल्या गेल्या असे श्री जगदीशचद्र गुहिलोत यानी आपल्या मारवाडच्या इतिहासात लिहिले आहे ज्या स्त्रियानी अत्यत स्वार्थत्यागपूर्वक आपल्या राष्ट्रातील अखिल भगिनीवर्गावर उन्मत्त यवनाच्या भडकलेल्या कामाग्नीत बळी पडण्याची पाळी कुशलतेने येऊ दिली नाही, आपल्या वैयक्तिक शीलसन्यासाने राष्ट्रातील सर्व स्त्रियाचे शीलसरक्षण केले व आपल्या राष्ट्राचा बचाव केला त्याना असा दोष देण्यापूर्वी त्याच्या परिस्थितीचा थोडा तरी विचार करणे जरूर आहे राजपूत राजानी राखले तसलेही मर्यादित स्वातत्र्य जे कायम ठेऊ शकले नाहीत त्या देशातील स्त्रियाना सर्रास मुसलमानी अत्याचाराना कसे बळी पडावे लागले याची थोडी जरी कल्पना दृष्टीसमोर ठेवली तरी आक्षेपकाना आपल्या कुत्सेची धार जरा बोथटच करावी लागेल

दुसरे, अशा तऱ्हेने केवळ व नाइलाजाने राष्ट्रहितैकबुद्धीने राजपूत स्त्रिया मोगल जनानखान्यात गेल्यानतरही त्या आपले मूळचे हिदू व्यवहार बहुधा कायमच ठेवीत बादशहाच्या अत पुरात राहूनही त्या शक्य त्या सर्व प्रकारे राजपुताच्या हिताचे सरक्षण करण्याचा प्रयत्न करीत त्याच्या पोटी उत्पन्न झालेले जहागीर व शाहजहान यासारखे बादशहा त्यामुळेच राजपुताशी स्नेहाने वागले व म्हणूनच राजस्थानातली बरीच राज्ये कायम टिकली मोगल दरबारात चाललेल्या बहुतेक राजकारणविषयक घटनाचे

धागेदोरे ह्या स्त्रियापर्यंत जाऊन पोचल्याशिवाय उकलू शकत नाहीत.

**११. चारुमती व औरंगजेब.** पण बादशहानी मागणी घातलेली प्रत्येक स्त्री त्याच्या जनानखान्यात चालून गेलीच असेही झाले नाही किल्येकानी त्याच्या मागण्या स्पष्ट झिडकारल्या किशनगढचा सरदार रूपसिंह याची कन्या चारुमती ही आपल्या वेळची राजस्थानची अप्रतिम लावण्यवती तरुणी समजली जात होती. तिच्या सौदर्यावर लुब्ध होऊन औरगजेबाने तीस मागणी घातली होती वास्तविक पाहता सर्व हिंदुस्थानचा शहानशाह असणाऱ्या औरगजेबाच्या एवढ्या निकराच्या मागणीस नकार देणे म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूसच निमत्रण देणे होते चारुमतीने त्यास धुतकारून तर लावलेच, पण त्याबरोबरच त्याचा कट्टा शत्रु मेवाडचा राणा राजसिंह ह्यास एका ब्राह्मणाबरोबर पत्र पाठवून आपला स्वीकार करण्याची व औरगजेबापासून आपले सरक्षण करण्याची विनती केली चारुमतीच्या ह्या कृत्यावरून शिशुपालापासून स्वत चा बचाव करू इच्छिणाऱ्या रुक्मिणीचे कोणास स्मरण येणार नाही ? चारुमतीने राजसिंहास पाठविलेल्या पत्रात औरगजेबास "माकडतोड्या जगली जठ" असे म्हटले आहे व्रजभाषेचा एकमेवाद्वितीय कवी सूरदास याने रुक्मिणीने श्रीकृष्णास पाठविलेल्या पत्रातील भाव अकित करून ठेवणारे पुढील पद्य लिहिले आहे--

सकत शृगाल सिहका भोजन। दुर्बल देखि कै छीने खाई ॥
परिमित गये लाज तुमहीको। हसिनि व्याहि काग लै जाई ॥
स्वानसग सिहिनि रति अजुगत। वेद विरुध असुर करै आई ॥

बरोबर याच अर्थाचे पत्र राजसिंहास लिहून त्याच्या शेवटी चारुमती म्हणते "राणाजी तुम्ही येऊन जर माझी सुटका करणार नाही तर मला आत्महत्या करण्याशिवाय दुसरा इलाज राहणार नाही " चारुमतीची विनती मान्य केल्यास औरगजेबाच्या क्रोधानलाखाली मेवाडचे सबध राष्ट्र भस्म झाल्याशिवाय राहणार नाही हे राजसिंहास पक्के माहीत होते पण स्त्रीस्वातंत्र्याच्या सरक्षणासाठी, स्त्रीदाक्षिण्याच्या परिपालनासाठी एकटी राजपूत व्यक्तीच काय पण राष्ट्रच्या राष्ट्र वाटेल तो त्याग करण्यास तयार असते मग राजसिंहासारखा शूर, तेजस्वी, कर्तृत्ववान व महत्वाकाक्षी

राणा ह्या असल्या पवित्र कार्यात माघार कसा घेईल ? त्याने लागलीच मेवाडचे निवडक शूर सैनिक बरोबर घेऊन किशनगढावर आक्रमण केले व औरगजेबाने पाठविलेल्या दोन हजार मोगल शिपायाना कापून काढून चारुमतीस श्रीकृष्णाप्रमाणेच आपल्या बरोबर मेवाडात आणले व तिच्या इच्छेनुसार तिच्याशी विवाह लावला राजप्रशस्ति महाकाव्यात वरील घटनेचे मोठ्या अभिमानाने पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे –

दिल्लीशार्थं रक्षिताया राजसिहनरेश्वर ।
राठोडरूपसिहस्य पुत्र्या पाणिग्रह व्यधात् ।।

राजसिहाच्या ह्या धाष्टर्याचा परिणाम जो व्हावयाचा तोच झाला औरगजेबाने आपल्या सपूर्ण शक्तीने मेवाडवर स्वारी केली परतु औरगजेबास जर कोणी शेरास सव्वाशेर भेटले असतील तर ते दोनच पुरुष होत एक दक्षिणेत छत्रपति शिवाजी महाराज व दुसरा उत्तरेत महाराणा राजसिह राजसिहाने ह्या युद्धात तीन वेळा ह्या धर्मांध बादशहाचा न भूतो न भविष्यति पराजय करून त्यास मेवाडातून अजमीरपर्यंत पिटाळून लावले अशा तऱ्हेने औरगजेबाचा क्रोधानल आपणहून आपणावर व आपल्या राष्ट्रावर ओढवून घेतला, पण आपणास सर्वस्व अर्पण करणाऱ्या राजपूत तरुणीचे–चारुमतीचे–सरक्षण करून तिच्याशी विवाह लावलाच व मगराने गिळलेले माणिक त्याच्या दाढात हात घालून बाहेर काढलेच !

**१२. गृहशिक्षणाची जबाबदारी स्त्रियांवर.** आपला वर आपणच पसत करणे अथवा प्रबळ सत्तेशी विरोध करूनही स्वाभिमानाचे रक्षण करणे ह्यापेक्षाही जास्त महत्त्वाचे परिणाम राजपूत रमणीनी समाजावर घडवून आणले आहेत वास्तविक पाहता कोणत्याही जातीचे, समाजाचे, अथवा देशाचे चिरजीवित्व त्यातील स्त्रियावर अवलबून असते लहान मुलाना घरीच योग्य शिक्षण देऊन तरुण पिढीस वळण लावण्याचे काम ज्या देशात स्त्रीवर्गावर सोपविलेले असते व ज्यातील स्त्रिया आपल्यावरील जबाबदारीचे हे कार्य उत्तम रीतीने बजावीत असतात त्याच देशाची सस्कृति, धर्म अथवा इतिहास चिरजीव होऊ शकतो व त्याच देशातल्या समाजान जिवतपणा राहू शकतो. स्पार्टन, ग्रीक व रोमन लोकानी

मोठमोठी साम्राज्ये स्थापन केली व आपल्या सस्कृतीचा जगभर प्रसार करण्याचा प्रयत्न केला त्या वेळी देशातील तरुण पिढीस बलवान, सुशिक्षित व लढाऊ करण्यासाठी व सुयोग्य नागरिकत्वाचे शिक्षण देण्यासाठी त्यानी शक्य ते प्रयत्न केले त्याच्या तेजाने काही काल जग दिपून गेल्यासारखे झाले परतु कालान्तराने त्याची साम्राज्ये, त्याच्या सस्कृति व त्याचे इतिहासही नामशेष झाले त्यानी आपल्या स्त्रियाना अगदी गुलामगिरीत डाबून ठेवले होते फक्त प्रजा उत्पन्न करण्यापलीकडे त्याचा समाजात बिलकुल उपयोग नव्हता स्वातत्र्य तर त्याना नव्हतेच कुलीन आणि घरदाज स्त्रियापेक्षा वेश्या अथवा वारयोषिताना अधिक महत्त्व व स्वातत्र्य असे आणि उत्पन्न झालेला मुलगा राष्ट्राचा समजून त्यास एकदम त्याच्या आईपासून तोडण्यात येई व सरकार त्याच्या शिक्षणाची व्यवस्था करी परतु इतकी काळजी करूनही त्याचा नाश झालाच आणि हिदु समाजाने मुलाचा प्रतिपाळ व गृहशिक्षण याची सर्व जबाबदारी स्त्रियावर सोपविल्याने त्याचा आत्यतिक नाश होऊ शकला नाही हूण, शक, कनिष्क, तुर्क, मोगल व युरोपियन इत्यादि अनेक जातीचे हल्ल्यामागून हल्ले हिंदुसमाजावर झाले, राज्यक्रान्त्यामागून राज्यक्रान्त्या झाल्या व एकामागून एक अशी अनेक साम्राज्ये उलटली, तरी एवढ्याही विषम सकटाशी तोड देऊन वैदिक सस्कृति व हिदुसमाज स्वत चे अस्तित्व कायम टिकवून आपल्याच ठिकाणी उभा आहे

**१३. स्त्रियांना आपल्या दुधाचा अभिमान** राजपूत इतिहासाचे वरवर अवलोकन केले तरीसुद्धा राजपूत स्त्रियानीच मोठमोठे वीर पुरुष निर्माण केले असल्याचे दिसून येईल किबहुना लढण्यास उभे राहिलेल्या प्रत्येक तरुणास मी पराजय पावून घरी परत गेलो तर माझी आई व पत्नी काय म्हणेल याची भीति वाटत असे व एक तर लढाईत जय मिळवून आपले उज्ज्वल मुख घेऊन परत घरी जावे व आपल्या माताच्या व स्त्रियाच्या अभिनदनास पात्र व्हावे, अथवा समरागणात अत्यत वीरतेने लढून मृत्यूस आलिगन द्यावे असा निश्चय करूनच आणीबाणीच्या वेळेस ते घरातून बाहेर पाऊल टाकीत दहादहा बाराबारा वर्षांच्या मुलानी थोर विक्रम प्रकट करावा अशी त्याच्या माताची अपेक्षा असे

राजपुताना सर्वात जास्त अभिमान कशाचा असेल तर तो आपल्या मातेच्या दुधाचा आणि स्त्रियानाही आपले दूध शक्य तितके पवित्र ठेवले पाहिजे व ते प्राशन करणारा मुलगा मोठा भीमपराक्रमी निघाला पाहिजे अशी महत्वाकाक्षा असे राजपुताच्या मोठमोठ्या घराण्यात व विशेषत राजघराण्यात मुलाचा प्रतिपाळ करण्याकरिता दाया ठेवतात आणि ह्या दाया आपल्या पोटच्या मुलापेक्षाही ह्या दूध-मुलाचा ममतेने व विशेष दक्षतेने प्रतिपाळ करतात आपल्या स्वामिपुत्राच्या प्रतिपाल-नार्थ जिने आपल्या पोटचा गोळा देखील दुष्ट बनबीराच्या तरवारीस बळी दिला व त्याच्या शवाचे काय झाले याच्याकडे देखील लक्ष न देता जिने उदयसिहास टोपलीत घालून पळविला, महिनोगणती जिने त्याला खाद्या-वर वाहून घोर अरण्यात व भीषण दऱ्याखोऱ्यात वाटेल ती भयकर सकटे सोसली त्या राजस्थानच्या हिरकणीचे–पन्नादाईचे–नाव माहीत नाही असा अभागी पुरुष भरतवर्षांत तरी कोणी असेल असे वाटत नाही सामान्यत राजपूत स्त्रियाचा आपल्या मुलावर इतका वचक असे की, तो एक वेळ बापाचे ऐकणार नाही, पण त्याने आईची अवज्ञा केली असे केव्हाच झाले नाही आपल्या घराण्याच्या, वशाच्या, समाजाच्या, धर्माच्या व देशाच्याही शत्रूची माहिती तरुणाना राजस्थानात त्याच्या आईकडून मिळत असे व त्यानी केलेल्या अपमानाचा सूड उगविण्यासाठी मुलाची मने लहानपणापासूनच तयार करण्यात येत

महाभारतात सजय जेव्हा युद्धात पराजय पावून घरी परत आला तेव्हा या नामर्दपणाबद्दल त्याचा धिक्कार करून—

एतावानेव पुरुषो यदमर्षी यदक्षमी ।
क्षमावान्निरमर्षश्च नैव स्त्री न पुन पुमान् ॥

" ज्याला आपल्या शत्रूच्या दुष्कृत्याची चीड येते व त्यावर सूड घेण्याचा आपला निश्चय जो विसरत नाही तोच खरा मर्द होय ज्याला राग येत नाही व जो अपमानाचा सूड उगवीत नाही तो पुरुष नव्हे व स्त्रीही नव्हे "–अशी मर्दाची व्याख्या त्यास विदुला मातेने शिकविली आहे राजपुताची देखील मर्दाची व्याख्या किती व्यापक होती हे पुढील पद्यावरून दिसून येईल.

मर्द सीसपर नवै मर्द बोली पहिचानै ।
मर्द खिलावै खाय मर्द चिंता नही माने ॥
मर्द देय औ लेय मर्दको मर्द बचावै ।
गाढे सकरे काम मर्दके मर्दै आवै ॥
पुनि मर्द उनहिको जानिये सुख दुख साथी दर्दके ।
वेताल कहै विक्रम सुनो लच्छन है ये मर्दके ॥

[ मर्द (योग्य मनुष्यापुढे) आपले मस्तक नम्र करतो, मर्द दुसऱ्याच्या बोलण्यातील इगित तेव्हाच ताडतो, मर्द इतराना खायला घालून आपण खातो, मर्द कशाचीही काळजी करीत नाही, मर्द देतो तसेच घेतो, मर्द मर्दाचा बचाव करितो, आणीबाणीच्या वेळी मर्दच मर्दाच्या उपयोगी पडतो,

सुख-दुःखाच्या व सकटाच्या प्रसगी जे साथीदार होतात तेच मर्द होत असे जाणावे, वेताळ म्हणतो, हे विक्रमा, मर्दाची लक्षणे ही अशी आहेत ]

राजपूत माता आपल्या मुलाना ती लहान असतानाच ह्या गोष्टी शिकवीत व उच्च शील व दिव्य पराक्रम याचा पाठ पाळण्यापासूनच त्याच्याकडून गिरवून घेत या सबधीची काही उद्बोधक उदाहरणे वाचकाच्या माहितीसाठी खाली देण्यात येत आहेत त्यावरून वरील विधानात केवढा सत्यार्थ भरला आहे याची कल्पना येईल

**१४. आल्हा व ऊदल.** बाराव्या शतकात मध्यप्रातात महोबा येथील राज्य प्रसिद्ध होते तेथील चदेल वशाचे राजे मोठे तेजस्वी व पराक्रमी पुरुष असत महोबाचा यशराज नावाचा एक सरदार शत्रूकडून मारला गेला. त्याची आल्हा व ऊदल नावाची दोन धाकटी मुले मागे राहिली त्याचा देवलदेने—त्याच्या मातेने—प्रतिपाळ करून बापाचा वध करणाऱ्या शत्रूवर सूड उगविण्याच्या भावना त्याच्या मनात लहानपणापासूनच उत्पन्न केल्या वयाच्या सोळा वर्षांच्या आतच त्या शूर भावानी शत्रूच्या गडावर आक्रमण करून त्याचे शीर कापून आणले व महोबाच्या वेशीबाहेरील वृक्षास उलटे टागले आणि घरी येऊन 'तुझ्या दुधाचा अभिमान आम्ही सार्थ केला' असे मातेस निवेदन केले पुढे काही कार-

णावरून महोबाच्या राजाशी त्याचा बेबनाव होऊन त्याना राज्याबाहेर घालविण्यात आले तेव्हा ते आपल्या मातेसह कनौजच्या जयचद राठोडाच्या पदरी येऊन राहिले त्याची तेजस्विता व पराक्रम याचा जयचदाने मोठा आदर करून त्याना सरदारीची वस्त्रे व जहागिरी दिल्या. पुढे साभरच्या पृथ्वीराज चौहानाने महोबावर स्वारी केली तेव्हा आल्हा व ऊदल या शूर तरुणाच्या साहाय्याशिवाय महोबाचे सरक्षण करणे आपणास अशक्य आहे असे तेथील राजास आढळून आले त्या वेळी त्याच्या राणीने—मालणदेने—जिने आल्हा व ऊदल याच्यावर पुत्रवत् व देवलदेवर भगिनीवत् प्रेम केले होते—जगनक नावाच्या एका चारणास आपला निरोप देऊन कनौज येथे देवलदेकडे पाठविले त्या वेळी चारण, देवलदे, आल्हा व ऊदल याच्यात जो सवाद झाला तो मुद्दाम साराशरूपाने खाली देत आहे त्यावरून राजपूत माताचा आपल्या पुत्रावर केवढा अधिकार असे, आणि त्याना शौर्याची, तेजस्वितेची व भव्यतेची कृत्ये करण्यास त्या कशा प्रवृत्त करीत व देशावर व राजावर सकट आले असता कशा धावून जात याची कल्पना येईल

चारण जगनक म्हणतो, "देवलदे, महोबाच्या मैदानावर चौहानाचा तळ पडला आहे नरसिंह व वीरसिह यानी रणभूमीवर शयन केले सिरस्वा जाळून खाक करण्यात आले व परमालचे राज्य उध्वस्त झाले आहे मालणदेने मला तुमच्याकडे पाठविले आहे महोबा सोडल्यापासून तिचे दिवस मोठ्या दु खात जात आहेत तिचे डोळे कनौजकडे लागले आहेत तुमचे स्मरण होऊन तिच्या नेत्रात अश्रू उभे राहिले व ती म्हणाली, 'यशराजाच्या पुत्रानो ! चदेलाचे यश नष्ट होत आहे, त्याबद्दल तुम्हास काहीच वाईट वाटत नाही काय ?'" "महोबाचा नाश ! चदेलाची कत्तल ! ! होईना ! आम्हास काय त्याचे ?"—आल्हा जोराने म्हणाला "ज्याच्या राज्याचा आमच्या पित्याने विस्तार केला व ज्याच्या सेवेत तो मृत्युमुखी पडला त्यानेच ना आम्हास आमच्या घरातून हाकून लावले ? ज्या आम्ही गोडाचा पराजय करून महोबाचा विस्तार केला, ज्या आम्ही देवगड व चदबारी जिकून चदेलाच्या स्वाधीन केले, ज्या आम्ही कच्छवाहाच्या तरवारीपासून महोबाचे रक्षण केले, गयेस मोठी लढाई मारून अमीर व सुल-

तानाचा पराभव केला त्या आम्हास या सर्व कृत्याचे बक्षीस काय मिळाले ? तर घरातून हाकून लावणे ! माझा बाप मेल्यापासून मी चदेलासाठी एकदर चाळीस लढाया लढलो मला मोठमोठचा सात जखमा लागल्या आणि तितक्याच जखमा सहन करून ऊदलनेही परमालाकडून जयपत्र मिळविले, तीन वेळा मी चदेलसाठी मृत्यूच्या जबडचात उडी घातली व त्याचे दात उपटून बाहेर आलो व त्याबद्दल मला पुरस्कार काय ? तर देशनिर्वासन !"

आल्हाचे हे भाषण ऐकून चारण पुन म्हणाला, "आल्हा, तुझ्या बापाने आपल्या जागी तुला सोडले आहे व महोबाच्या राज्यावर जेव्हा सकट येईल तेव्हा तू त्यास सोडता कामा नये असे बजाविले आहे जो राजपूत आपल्या राज्यास सकटात सोडतो तो नरकात जातो ज्याने तुझ्या जन्मप्रसगी आनदाचे उत्सव करण्यात हजारो रुपये खर्च केले त्याच्यावर आपत्ति आली असता तू कनौजलाच राहण्याची इच्छा करतोस ? राणी मालणदेवी, जी तुझ्यावर सख्या पुत्राप्रमाणे प्रेम करते, तिचा तू महोबास परत यावेस असा आग्रह आहे " यानतर तो देवलदेकडे वळून म्हणाला "देवलदे, तुझी प्रतिज्ञा आहे की, तुझ्या पुत्राचे जीवित व त्याच्या देशाचे सरक्षण ही अभिन्न राहतील या तुझ्या प्रतिज्ञेचे तुला स्मरण करून देण्यास मालणदेवीने मला सागितले आहे. जो आपल्या प्रतिज्ञेपासून च्युत होतो तो यावच्चद्रदिवाकरौ नरकात राहतो " मालणदेवीचा निरोप ऐकून व आपल्या प्रतिज्ञेचे स्मरण होऊन देवलदे म्हणाली, "चला ! पुत्रानो, आपणास आता महोबास पोचलेच पाहिजे ! " आल्हा तर गप्प बसला पण इतका वेळ हा सगळा प्रकार स्वस्थपणे पाहत बसलेला ऊदल उसळून म्हणाला—" महोबाला भुते लागली तरी पर्वा नाही आमच्या आपत्तीच्या काळात ज्या दिवशी त्याने आम्हास हाकून लावले तो दिवस आम्ही विसरू शकू काय ? म्हणे महोबास परत चला ! महोबा मरो अथवा जगो इत पर कनौज हीच आमची मातृभूमि होय ! ! " "देवानी माझी कूस वाझ केली असती तर फार बरे झालें असते ! " देवलदे पुत्रावर रागाने जळू लागली निखाऱ्याप्रमाणे जळजळीत असा एकेक शब्द ओकीत ती पुढे म्हणाली, "जी राजपुताचा मार्ग सोडतात व आपल्या राज्यास सकटकाळी मदत करण्यास तयार होत नाहीत असली कार्टी माझ्या पोटी

कशाला जन्मली ? " तिचा ऊर दु खाने भरून आला आकाशाकडे डोळे लावून ती म्हणू लागली, " हे जगन्नियत्या परमेश्वरा, कशाकरिता तू मला बाळतपणाच्या वेदना सहन करावयास लाविलेस ? पूर्वजाचे यश नष्ट करणाऱ्या ह्या कार्ट्यांच्या करिता ? नादान सतति ! सकट आणि युद्ध याचे नुसते नाव घेतले तरी खऱ्या राजपुताचे हृदय आनदाने नाचू लागते परतु तुम्ही–अधमानो यशराजाचे पुत्र असणेच शक्य नाही कोण्या तरी भुताने मला झपाटले असेल व त्यापासून तुम्ही झाला असाल ! " देवलदेचे हे सतापाचे भाषण ऐकून आल्हा व ऊदल उभे राहिले त्याचे चेहरे अतिशय खिन्न झाले होते मातेस उद्देशून ते म्हणाले–" महोबाचे सरक्षण करीत असताना जेव्हा आमचा नाश होईल, आमची शरीरे जेव्हा जखमानी भरून निघतील आणि आमच्या पराक्रमाने जेव्हा आम्ही अमर कीर्ति सपादन करू, जेव्हा आमची डोकी रणागणातल्या धुळीने भरून पडलेली दिसतील, जेव्हा वीरपथाचे अनुकरण करून आम्ही युद्धाच्या धुमश्चक्रीत प्रवेश करू व मृत्यूस आलिगन देऊ व दोन्ही कुळातील रक्ताची शोभा वाढवू, आणि हे सर्व जेव्हा चौहान वीर पाहतील तेव्हाच आमच्या मातेस खरा आनद होईल " असे म्हणून ते दोघेही बधु आपल्या मातेसह महोबास गेले

परतु ते तेथे जाईपर्यत मालणदेवीचा निश्चय बदलला होता ती म्हणाली, " चौहानाची सेना अफाट आहे खडणी भरून सुटका करून घेणेच उत्तम " तिचे हे भाषण ऐकून ऊदलचा तिळपापड झाला तिच्याकडे वळून तो मोठ्या त्वेषाने बोलू लागला–" मालणदे, आता तुला हे शहाणपण कोठून आले ? छट्, तें काही नाही माझ्या जिवात जीव असेपर्यंत महोबा सुरक्षित आहे असे समज " त्याचे हे भाषण ऐकून देवलदे म्हणाली–" कोण ? बेटा ऊदल ! तूच बोललास ना आता हे ? शाबास ! आता तू आपल्या कृत्यानी आपल्या आईचे दूध उज्ज्वल करून दाखीव " त्यावर राजा म्हणाला, " पण आज शनि वाईट आहे आपण उद्यापासून शत्रूवर आक्रमण करू " हे भाषण ऐकून आल्हा म्हणाला, "जो ग्रहाचा विचार करतो अथवा आपली माणसे मरतील व गावे जळतील या गोष्टीस भितो तो खरा राजपूतच नव्हे शत्रूने आक्रमण केले असता ज्यास भीति स्पर्श करू शकते तो रौरव नरकात पडल्याशिवाय राहत

नाही साठ हजार वर्षे त्याचा आत्मा भुताच्या योनीत भटकत राहील पण जो योद्धा आपले कर्तव्य पार पाडतो त्याचा सूर्यमडलात सत्कार होतो त्याची कृत्ये त्याचे यश अमर करून टाकतात" याप्रमाणे बोलून केवळ मातेची आज्ञा पालन करण्यासाठी अद्भुत पराक्रम गाजवून ते दोघेही राजपूत वीर धारातीर्थी वीरगतीस पावले

पृथ्वीराज रासोत त्याचे मोठे बहारदार वर्णन आले आहे टॉडनेही मोठ्या गौरवपूर्वक त्याचा दाखला दिला आहे विशेषत त्याच्या एकदर पराक्रमाचे, गुणाचे व चारित्र्याचे अगदी साध्या पण अत्यत जोरदार भाषेत वर्णन करणारे एक स्वतत्र काव्य हिदी भाषेत निर्माण झाले असून त्यास व ज्या छदात ते लिहिले आहे त्यासही आल्हा काव्य व आल्हा छद अशी नावे मिळाली आहेत व त्यायोगे देवलदेसारखी माता व तिचे रामलक्ष्मणासारखे आल्हा व ऊदल हे पुत्र याची नावे भरतवर्षात अजरामर झाली आहेत

धोका देकर शूर कहावै उसके जननीको धिक्कार
जिनके दुश्मन सुखसे सौवे तिनके जीवनको धिक्कार
जिसने जन्म लिया बादीसे वो तो खेत छोड भगजाय
जा दिन लडका समरथ हौवे अपने लेई बापके दाव
वा दिन चुडिया मै तारूगी तबहि मिटे जिगरका घाव

[ दगाबाजीच्या जोरावर जो स्वत ला शूर म्हणवून घेतो त्याच्या जननीला धिक्कार असो, ज्याचे शत्रु सुखाने झोप घेतात त्याच्या जीवनाला धिक्कार असो, ज्याने दासीच्या पोटी जन्म घेतला असेल तोच रणभूमि सोडून पळून जाईल, पुत्र समर्थ होऊन ज्या दिनशी आपल्या बापाबद्दल सूड घेईल त्याच दिवशी माझ्या सतीच्या वाणाचे सार्थक होईल व तेव्हाच माझ्या हृदयाची जखम भरून येईल ]

यासारखी ह्या काव्यातील तेजस्वी वचने प्रत्येक राजपूत तरुणास त्याच्या मातेच्या मुखातून ऐकावयास मिळतात ती ऐकून वृद्धाना देखील त्वेष चढल्याच्या आख्यायिका आहेत इतका त्याचा राजपूत समाजावर गाढ परिणाम झालेला आहे

**१५. शत्रूच्या प्रेतांचा गालिचा** आपल्या पतीनी समरागणावर खूप पराक्रम गाजवावा व त्याच्याच पावलावर पाऊल ठेवून निर्भयपणे सचार करीत आपल्या पुत्रानी तो अवलोकन करावा अशी राजपूत स्त्रियाची उत्कट इच्छा असे राजपुताचा पुत्र सिंहाच्या छाव्याप्रमाणे बालपणीच समशेर चमकवू शकतो–

सिहाचा जो बाल तोडी चपेटा
मारी त्याला जो करी मत्त मोठा।

असा त्याचा दृढविश्वास असे पद्मिनीच्या कामनेने अल्लाउद्दीनने चितोडवर केलेल्या स्वारीच्या वेळी मुसलमानी सैन्याशीं लढत असता गोरा रणागणात पडला व त्याचा पुतण्या बादल अनेक जखमानी भूषित झालेल्या आपल्या शरीरावर गोऱ्याच्या मृतदेहास धारण करून गडावर परत आला आपल्या चुलतीची भेट घेऊन गोऱ्याच्या मृत्यूचे वर्तमान त्याने तीस निवेदन केले चारण म्हणतो, "गोराचे प्रेत चितेवर जळत होते त्याची स्त्री–बादलची चुलती–सतीवेषाने समोर उभी होती त्या वेळी चुलतीपुतण्यात पुढील संवाद झाला

चुलती—बादल, तुझ्या काकाला परलोकी जाऊन भेटण्यापूर्वी तो स्वत त्या मार्गाने कसा गेला हे मला साग पाहू

बादल—काकी, तो लढाईचा हगाम कापीत चालला होता त्याच्या तरवारीने तोडलेली फळे वेचणारा एक नम्र सेवक म्हणून मी त्याच्या पावलावर पाऊल ठेवून चाललो होतो गौरवाच्या भव्य शय्येवर शयन करण्यापूर्वी त्याने त्याखाली शत्रूच्या प्रेताचा विशाल गालिचा आथरला एका जगली यवन शाहजाद्याचे शिरकमल कापून उशास घेतले व नतर त्यावर सुखाने शयन केले

काकीने पुन. विचारले, "साग, बादल पुन साग ! माझ्या प्रियतमाने त्या वेळी कसे वर्तन केले ?"

बादल—मा ! त्याच्या कृत्याचे मी कसे वर्णन करू ? कारण त्याच्या भयाने भिणारा एकही शत्रु त्याने शिल्लक ठेवला नाही, व त्याच्या गुणाची प्रशसा करणारा मित्र उरला नाही

हे ऐकून त्या उदारचरित सतीव्रतेनें एक मधुर स्मित केले आणि ‘बेटा बादल, मी इतका उशीर केल्याबद्दल तुझा काका माझ्यावर रागावेलना ? ’ असे म्हणून समोरच जळणाऱ्या पतीच्या त्या धगधगत्या चितेत एकदम उडी घेतली ” अशा तऱ्हेने आपल्या पूर्वजाच्या कीर्तीस शोभेल असेच वर्तन आपल्या पतीने केले हे प्रथम ऐकून नतरच ती राजपूत रमणी त्याच्या शवाबरोबर सती गेली

**१६. बर्नियरचा दाखला.** परतु जर का एखाद्या राजपुताने आपल्या कुलाची अपकीर्ति करण्यासारखे वर्तन केले असेल, समरागणात शत्रूकडून पराजय पावून तसे काळे तोड घेऊन तो घरी परत आला असेल, तर राजपूत स्त्रिया त्यास मुळी घरातच येऊ देत नसत मग तो प्रत्यक्ष पति का असेना ? मारवाडचा राजा जसवतसिह एकदा मोगलाबरोबर झालेल्या लढाईंत पराजय पावून जोधपुरास परत आला त्याची राणी ही उदयपूरची राजकन्या होती आपला पति पराजयाचे काळे तोड घेऊन घरी परत येत आहे हे पाहून तिने किल्ल्याचे दरवाजे एकदम बद करून घेतले जसवतसिहाने लाख सागून पाठविले, पण व्यर्थ असल्या पळपुट्या पतीस माझ्या घरात राहण्यास जागा नाही असे तिने साफ उत्तर दिले बर्नियर नावाचा युरोपीय प्रवासी योगायोगाने त्याच वेळी राजस्थानात प्रवास करीत होता त्याने आपल्या प्रवासवृत्तात ह्या अद्भुतरम्य प्रसगाचे पुढील प्रमाणे वर्णन केले आहे –

“ पराजयानतर मेवाडच्या राज्यकन्येने जसवतसिहाचे मोठे भीषण स्वागत केले त्याच्या पराजयाच्या दु खाचे सात्त्वन करण्यास कोणास पाठविण्याऐवजी तिने शुष्कान्त करणाने किल्ल्याची दारे बद करण्याचा हुकूम सोडला त्या वेळी ती म्हणाली, ‘ह्या कलकी माणसास मुळीच आत येऊ देऊ नका तो माझा पतीच नव्हे–मेवाडच्या राणाजीचा जामात इतका नीच असूच शकत नाही ज्या घराण्यात तो जन्मास आला त्याच्या यशाकडे लक्ष देऊन त्याने आपल्या पूर्वजाच्या गुणाचे एक तर अनुकरण तरी करावयास पाहिजे होते व ते होत नसेल तर एखाद्या विहिरीत जीव तरी द्यावयास पाहिजे होता.’ थोड्या वेळाने ती म्हणाली, ‘छे ! हा आपला प्राण येथे घेऊन येणारा मनुष्य माझा पति नव्हे हेच खरे ! माझा पति

लढाईंतच मेला असला पाहिजे तेव्हा तुम्ही माझ्या सती जाण्याची तयारी करा ' परतु जेव्हा हा येथे आलेला गृहस्थ तुझा पतीच होय व तो जिवत असल्याने तुला सती जाता येत नाही असे समजाविण्यात आले, तेव्हा तो बेत तिने रद्द केला परतु ते ऐकून पुन तीस विकाराचे भरते आले व त्या आवेगात तिने जसवतसिहाचा शेकडो प्रकारे धिक्कार केला अशा तऱ्हेने आठ नऊ दिवस किल्ल्याचे दरवाजे बद राहिले व जसवतसिह आत प्रवेश करू शकला नाही अखेरीस जेव्हा तिच्या आईने तीस समजाविले व, थोडी विश्राति घेतली की, तुझा पति पुन मोगलावर सूड उगविण्यासाठी गमन करील व आपले यश परत मिळवील असे आश्वासन दिले, तेव्हा कोठे दारे उघडून तिने जसवतसिहास आत येण्याची परवानगी दिली " बर्नियरसारख्या विदेशी प्रवाशाने 'चक्षुर्वैसत्य' या न्यायाने लिहिलेले हे वर्णन आहे आणि त्यावरून आपल्या पतीचा पराभव होऊन तो घरी आला तर ती गोष्ट राजपूत रमणीच्या चित्तात कसा क्षोभ उत्पन्न करीत असे व ह्या क्षोभाचे स्वरूप किती तीव्र असे ह्याची कल्पना येऊ शकेल आपल्या पतीचाही अशा प्रकारे त्याच्या दुष्कीर्तीबद्दल धिक्कार करणाऱ्या स्त्रिया आपल्या पुत्राना कशा तऱ्हेने वागवीत असतील हे कोणाच्याही लक्षात येण्यासारखे आहे मेवाड राजकन्येच्या या दिव्य चारित्र्याने बर्नियर देखील मुग्ध झाला होता व त्यासबधी त्याने पुढील उद्गार काढले आहेत "ह्या देशातील स्त्रियाच्या धैर्याचा हा एक नमुना होय अशी कोणती आपत्ति अथवा दिव्य आहे की, जी गौरव अथवा यश यासाठी मनुष्य सहन करण्यास तयार होणार नाही ? " पुढे जेव्हा औरगजेबाने जसवतसिहास काबुलास पाठवून तेथे त्याचा खून करविला आणि धाकट्या अजितसिहास घेऊन त्याच्या याच राणीस महान युक्तीने औरगजेबाच्या दाढेतून निसटून दुर्गादासाच्या साहाय्याने राजस्थानात परत यावे लागले, तेव्हा मेवाडचा राणा राजसिहाच्या म्हणजे आपल्या भावाच्या मदतीने मारवाडच्या स्वातत्र्याचे युद्ध ठाणून औरगजेबासारख्या बिकट शत्रूशीही तिने सामना दिला व समरभूमीच्या प्रत्यक्ष पाठशाळेत आपल्या एकुलत्या एक पुत्रास–अजितसिहास–राजनीतीचे पाठ शिकविले

**१७. समरोत्सुक वीराचा शृंगार.** समरभूमीवर जाऊ इच्छिणाऱ्या आपल्या पुत्राचा वीरोचित शृगार करून देणे ही गोष्ट राजपूत

स्त्रियाना फार प्रिय वाटत असे त्याचे यामबधीचे विशेष प्रघात असत रणागणावर जाणारा तरुण आपली तरवार कमरेस बाधीत असताना त्याची माता अथवा अन्य स्त्रिया त्याचे केश विचरून साफ करीत आणि वीरघटेने युक्त असा मदिल त्याच्या डोक्यास बाधीत हृया पगडीचे पदर साफसूफ करून चोपून बसविण्याचे काम काही जणी करीत तर काही रत्नजडित अथवा सोनेरी पुष्पे त्याच्या पगडीत खोचीत त्याच्या डोळ्यात सुरम्यासारखी अजने घालण्यात येत त्याच्या कमरेतली कटचार घेऊन तिने त्या आपल्या बोटातील रक्त काढीत व त्याचा टिळा त्याच्या कपाळास लावीत हातात वाघनख, कमरेस तरवार व कटचार, पाठीवर ढाल, धनुष्य व बाणाचा भाता अशा सर्व आयुधानी सज्ज होण्याच्या कामात स्त्रिया त्यास मदत करीत अशा तऱ्हेने सज्ज होऊन राजपूत वीराने आपल्या धनुष्याचा टणत्कार केला की, त्याची पत्नी त्याच्या गळ्यात मौक्तिकमाला अथवा पुष्पमाला अर्पण करी आणि नतर ती दोघेही पतिपत्नी एकमेकास गाढ आलिगने देत त्या वेळी अन्य स्त्रिया तो युद्धात यशस्वी व्हावा म्हणून सर्व देवताची व विशेषेकरून कुलदेवतेची प्रार्थना करीत जाताना तो पुन एकदा प्रतिज्ञा करी–'मी आपल्या बापाचे नाव अधिक उज्ज्वल करीन आणि मातेपासून मिळालेल्या रक्ताचा खरेपणा सिद्ध करीन कोठेही शत्रु भेटला तरी मी त्यास सामना देईन' याप्रमाणे पुत्राची दिव्य प्रतिज्ञा ऐकून माता त्यास आशीर्वाद देताना म्हणे, 'बाळा ये बरे आता! आपल्या मातेच्या दुधास व राज्याच्या मिठास जाग युद्धात जर तू मेलास तर तुला स्वर्गसिंहासन मिळेल याबद्दल शका धरू नकोस' सासूने दिलेला हा आशीर्वाद ऐकला की, त्याची वधू त्यास म्हणे, 'आपल्या पतीच्या मागे कोणती गुणवती पत्नी जिवत राहते? कारण गौरीचे म्हणणे आहे की, पति युद्धात मेल्यानतरही जी स्त्री जिवत राहते तिला माझा आशीर्वाद कधीच मिळत नाही' याप्रमाणे वीरमाता व वीरपत्नी याच्या हाताने सजून राजपूत तरुण मोठ्या उत्साहाने युद्धास जात व आपला पराक्रम प्रकट करीत

**१८. आदर्श सासूसुना.** युद्धास जाणाऱ्या आल्हा ऊदलाचा देवलदेने वरीलप्रमाणे शृगार केला होता त्याचे पृथ्वीराजरासोमध्ये

चदभाटाने मोठे रसभरित वर्णन केले आहे पण या बाबतीत त्याहीपेक्षा अलीकडचे एक अधिक तेजस्वी उदाहरण देता येण्यासारखे आहे

अकबराने चितोडवर आक्रमण केले होते राणा उदयसिंह गड सोडून अरण्यात पळून गेला होता राजपूताचा सेनानी बहादूर जयमल याने अकबराच्या गोळीने पाय लगडा झाल्यानतरही कल्ला नामक धिप्पाड राजपुताच्या खाद्यावर बसून रणागणात दोन्ही हातानी तरवार चालवून लढाई केली व शेकडो रिपूचा सहार केला पण अखेरीस जयमलही मरण पावला तेव्हा राजपुतानी खेळव्याचा सोळा वर्षांचा तरुण सरदार पत्ता उर्फ प्रताप याच्या मस्तकावर सेनापत्याचा मुकुट ठेवण्याचे ठरविले सेनापतिपदाचा मुकुट धारण करण्यापूर्वी पत्ता आपल्या वृद्ध मातेची समति विचारण्यासाठी गेला आपल्या पुत्राने ज्या कुशीतून तो निघाला तिचे नाव धन्य करावे अशी तिची महत्वाकाक्षा होती 'यदर्थं क्षत्रिया सूते तस्य कालोऽयमागत ।' हे तिने ओळखले होते म्हणून आपल्या हाताने तिने पत्ताची मगलपूजा केली व सैन्यापत्याचा मुकुट त्याच्या मस्तकावर ठेवला शैशवाच्या पलीकडील तीरावर स्थित असलेली पत्ताची नववधूही तेथेच उभी होती पत्तासाठी आपणही अखड स्फूर्तीचा निर्झर व्हावे अशी तिची इच्छा होती तिने व तिच्या सासूने पत्ताबरोबरच स्वत ही क्षत्राणीस उचित असा केसरिया वेष धारण केला दोघीही शस्त्रास्त्रानी सुसज्जित झाल्या पत्ताच्या कपाळाला मगलटिळा लावून त्या आपापल्या अश्वीवर स्वार झाल्या रणागणात पोचल्यावर पत्ताच्या आधी सिंहिनी-प्रमाणे त्या शत्रूवर तुटून पडल्या आणि अशा रीतीने आपल्या प्रत्यक्ष उदाहरणानी पत्तास आदर्शाचा व दिव्य वीरतेचा धडा शिकवीत त्या वीरागनाच्या गतीस प्राप्त झाल्या

**१९. मातृपदाचें माहात्म्य.** ज्या समाजातल्या माता इतक्या उत्कटपणाने आपल्या पुत्राच्या शिक्षणाची काळजी घेतात, आपल्या कुलाचा गौरव यत्किंचित देखील हीन न व्हावा एतदर्थ दक्षता बाळगतात, स्वत च्या हातानी मगल आभरणे चढवून आपल्या पुत्राना समरागणावर पाठवितात, वेळप्रसगी त्याना आदर्श दाखवून देण्यासाठी स्वत हातात शस्त्र घेऊन शत्रूशी लढू शकतात व शत्रूनेही तोडात बोटे घालावी इतका

अद्भुत पराक्रम व्यक्त करू शकतात, तो समाज असस्कृत व मागासलेला होता, त्यातील स्त्रिया अज्ञ, गुलाम, पराधीन व सुधारणाविन्मुख होत्या असे कोण म्हणू शकेल ? राजपूत समाजाला स्त्रियाचे महत्त्व सर्व तऱ्हेने पटलेले होते आणि विशेषत त्याच्या मातृत्वाचा अधिकार तर त्याने पूर्णपणे ओळखला होता माता ही आपल्या पुत्राकरिता अखड स्फूर्ति निर्माण करू शकते, त्याच्या हस्ते हवा तो पराक्रम व त्याग घडवून आणू शकते, कोणत्याही दिव्य कार्यास त्यास प्रवृत्त करू शकते व प्रसगविशेषी कुलाच्या, समाजाच्या, धर्माच्या अथवा देशाच्या यशोरक्षणाकरिता आपले प्राण देखील समर्पण करण्याची उदात्त भावना त्याच्या ठिकाणी निर्माण करू शकते इतके मातृपदाचे माहात्म्य आहे अशा माता ज्या देशात असख्य प्रमाणात निर्माण होतात त्याच देशाचा कीर्तिध्वज सदैव उच फडकत राहतो.

माते तुझ्या उदरी जाण । हनुमान जन्मला रत्न ।
एवढे माझे रामायण । त्याचेनि योगें ।।

असे म्हणून खुद्द रामचद्राने हनुमतासारख्या अलौकिक रत्नास प्रसविणारी खाण म्हणून अजनी मातेचा गौरव केला आहे राजपूत समाजही हे मातृपदाचे माहात्म्य पूर्ण जाणून होता म्हणूनच स्त्रियाना आवश्यक तेवढे सरक्षण व स्वातत्र्य देऊन त्याच्या मातृहृदयाचा पूर्ण विकास होण्याची सधि त्याने त्याना प्राप्त करून दिली व अशा उदारचरित माताच्या प्रत्यक्ष शाळेत तरुण पिढीच्या शिक्षणाची व्यवस्था केली

**२०. राजकारणी स्त्रिया.** अशा तऱ्हेने स्त्रियानी राजपूत समाजात मातृसस्था परिपूर्ण दशेस नेऊन पोचविली होती समाजाने याबाबत त्याच्यावर सोपविलेली जबाबदारी त्यानी उत्तम रीतीने पार पाडली होती इतकेच काम करून त्या थाबल्या असत्या तरी देखील त्यानी राजपूत समाजावर मोठा उपकार केला असेच म्हणावे लागले असते परतु राजपूत स्त्रियाच्या कर्तबगारीची साक्ष इतिहास यापेक्षा अधिक देतो देशात तेजस्वी तरुण निर्माण करण्याचे कार्य खरोखर अत्यत बिकट व महत्त्वाचे आहे व इतके बिकट कार्य यशस्वी रीतीने सपादन केल्याबद्दल पृथ्वीवरील अन्य कोणाही स्त्रीवर्गापेक्षा राजपूत स्त्रीवर्ग अधिक प्रशसेस

पात्र आहे पुरुषाचाही विवेक भ्रष्ट झाला तरी त्यानी विवेक सोडला नाही व आपले भविष्यकाळ निर्माण करण्याचे कार्य अखड सुरूच ठेवले परतु राजपूत स्त्रियानी जी अनेकविध कामगिरी केली आहे तिच्यातला तरुण पिढीचे तेजस्वी शिक्षण हा एक भाग झाला याव्यतिरिक्त, अनेक प्रसगी राजनीतीच्याही क्षेत्रात प्रवेश करून समाजकार्य व राजकार्य दोन्ही यशस्वी रीतीने सपादन करण्याची आपली निरपवाद योग्यता त्यानी सिद्ध करून दाखविली आहे राजा आपल्या अज्ञान मुलास मागे सोडून मरण पावला असता त्याच्या राणीने स्वत आपल्या अज्ञान मुलाच्या नावाने उत्कृष्ट कारभार चालविल्याची कैक उदाहरणे राजस्थानात सापडतील सामर-सीच्या मृत्यूनतर लहानग्या कर्णास गादीवर बसवून विधवा राणी कूर्मदेवीने मेवाडचा राज्यशकट हाकला आणि कुत्बउद्दीन गुलामाने स्वराज्यावर स्वारी केली असता स्वत च्या नेतृत्वाखाली राजपूत सेनेचे सचालन करून तिने यवनसेनेचा खासा पराजय केला असे टॉडने वर्णन केले आहे अल्लाउद्दीन खिलजीने चितोडवर स्वारी करून विश्वासघाताने राणा भीमसिहास, अथवा काही लोक म्हणतात त्याप्रमाणे लक्ष्मणसिहास अथवा रत्नसिहास, कैद केले असता त्याच्या मुक्ततेची युक्ति त्याची स्त्री पद्मिनी हिनेच शोधून काढली असल्याचे प्रसिद्धच आहे हमीरच्या पुनर्विवाहित पत्नीने आपल्या बापाच्या वचनेबद्दल त्यास शिक्षा देण्याच्या कार्यांत व चितोडचा मुसलमानानी जिकलेला गड परत मिळविण्याच्या कार्यांत स्वत पुरस्कार घेतला असल्याचा वृत्तातही टॉडने दिला आहे राणा सगाच्या मृत्यूनतर त्याच्या विधवा राणी कर्मवतीने हुमायूनला आपला राखीबद भाई करण्याची युक्ति योजून त्याचे मेवाडवर होणारे आक्रमण रोखले होते व गुजराथच्या बहादूरशहाने स्वारी केली असता तिने चितोडचा गड लढविला होता ह्या प्रसगी तिने देशातील राजपूत सरदाराना जे पत्र लिहिले त्यातील काही भाग आत्यतिक देशभक्तीचा नमुना म्हणून खाली उद्धृत करीत आहें "आतापर्यंत तर चितोड राजपुताच्या हाती राहिला परतु आता मात्र तो त्याच्या हातातून जाण्याची वेळ जवळ आली आहे मी किल्ला तुमच्या हाती सोपवीत आहे वाटल्यास तुम्ही तो शत्रूस देऊन टाका वाटल्यास त्याचे सरक्षण करा समजा तुमचा स्वामी अयोग्य आहे

तरी पण जे राज्य वशपरपरा तुमचे आहे ते शत्रूच्या हाती गेल्याने तुमचीच अपकीर्ति होणार नाही काय? "

ह्याच वेढयाच्या प्रसगी एकदा गडाचे दार सर करून मुसलमान आत प्रवेश करीत असताना सगाची दुसरी राणी जौहरबाई हिने स्वत अगावर चिलखत घालून व हाती शस्त्र घेऊन राजपूत सेनेच्या अग्रभागी दरवाजाचे रक्षण केले व मुसलमानास बाहेरच्या बाहेरच थोपवून धरले, आणि अखेरीस पुरुषानाही लाजविण्याइतका आचाट पराक्रम प्रकट करून आपला देह देशाकरिता धारातीर्थी समर्पण केला तिचा तो अद्भुत पराक्रम पाहून शत्रूदेखील आश्चर्यस्तभित झाला अकबराने चितोडवर आक्रमण केले असता पत्ताच्या अगोदर मोगल सेनेवर जाऊन तुटून पडणारी त्याची वीरमाता व वीरपत्नी या सासूसुनाचा उल्लेख मागे केलाच आहे राणा प्रतापच्या प्रत्येक हाल अपेष्टेत त्याच्या बरोबर सावलीप्रमाणे राहणाऱ्या त्याच्या राणीचाही उल्लेख या ठिकाणी करणे अवश्य आहे मृतपतीच्या मागे मारवाडच्या स्वातत्र्याचे युद्ध औरगजेबाबरोबर चालविणाऱ्या व जातीने समरागणावर हजर राहून त्याची सर्व व्यवस्था पाहणाऱ्या मारवाडच्या राणीचा म्हणजे जसवतसिहाच्या पत्नीचा अथवा राजसिहाच्या भगिनीचाही उल्लेख मागे आलाच आहे अरिसिहाच्या मृत्यूनतर राणी सरदारकुअरीने आपल्या धाकटचा पुत्राचा प्रतिपाळ करून मेवाडचे राज्य सुमारे ३० वर्षे साभाळले स्वत च्या प्रत्यक्ष अनुभवाचे म्हणून टॉडने बुदीच्या राणीचे उदाहरण दिले आहे तो म्हणतो, "मी बुदीच्या राजमातेबरोबर तासचे तास सभाषण करीत असे आमचे सभाषण तिच्या राज्याचा कारभार व तिच्या अज्ञान पुत्राचे हितचितन या विषयावर चालत असे बुदीच्या राजाने मृत्यूपूर्वी मलाच या मुलाचा पालक नेमले होते व राणीने मला आपला भाऊ मानले होते तथापि आमचे समाषण चालू असताना राणीच्या खास विश्वासातला कोणी तरी तिसरा मनुष्य तेथे हजर असेच व आमच्यामध्ये एक बारीक जाळीदार पडदा सोडलेला असे स्वत च्या राज्यकारभाराविषयीचे तिचे ज्ञान मोठे व्यापक व बिनचूक असे तिने पाठविलेली जी कित्येक पत्रे मजजवळ आहेत त्यातही हीच गोष्ट दिसून येते " अशाप्रकारे राजनीतिशास्त्र व तदगभूत राज्यशासन, युद्धसचालन,

संधिसपादन इ० अनेक महत्त्वाचे विषय यात राजपूत स्त्रियानी आपला थोर अधिकार संशयातीत रीतीने सिद्ध करून दाखविला आहे

राजपूत समाजातील स्त्रियाचे महत्त्व दर्शविण्यास वास्तविक पाहता वरील गोष्टी पुरे आहेत परतु त्याशिवाय आणखीही अनेक गोष्टीचे दिग्दर्शन करता येण्यासारखे आहे राजपूत राजानी अथवा श्रीमत पुरुषानी आपल्या स्त्रियाच्या नावानी अनेक मदिरे, महाल, विहिरी व तलाव बाधले आहेत व सदावर्ते उघडली आहेत यावरूनही त्याचे महत्त्व कळून येते अनेक राजपूत स्त्रियानी मोठमोठ्या क्षेत्रादिकाच्या ठिकाणी केलेली दाने प्रसिद्ध आहेत त्यानी ब्राह्मण, पुरोहित, यति अथवा मठमदिरे याना दिलेली इनामे त्याच्या नावे आजही चालू आहेत सामान्य हिदु मनुष्याप्रमाणेच राजपुताचेही कोणतेही धार्मिक कार्य त्याच्या स्त्रीवाचून साग होऊ शकत नाही किबहुना स्त्री ही त्याची अर्धांगी असल्याने त्याचे प्रत्यक्ष जीवनच तिच्यावाचून पूर्णतेस पोचू शकत नाही जीवनातील राजकीय, धार्मिक अथवा सामाजिक किवा शैक्षणिक कोणत्याही बाबतीत स्त्रियाच्या साहाय्यावाचून त्याचे चालू शकत नाही. राजपूत स्त्रियानी या सर्व बाबतीत आपली अनन्यसाधारण योग्यता सिद्ध करून दाखविली आहे असे आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून कोणाच्याही लक्षात येईल

२१. **सतीची प्रथा.** वरील एकदर वर्णनावरून राजपूत स्त्रिया अगदी अडाणी अथवा रानटी नसून चागल्या सुज्ञ, सुधारलेल्या, उन्नत सस्कृतीच्या व उदात्त ध्येयाच्या होत्या असे दिसून येईल त्यामुळे सतीसारखी प्रथा त्याच्यात असली व बाह्यत ती मोठी क्रूर दिसत असली तरी तिच्या मुळाशी रानटी अथवा क्रूर हेतु होता असे म्हणणे सर्वथा अप्रयोजकपणाचे होईल सतीची चाल फार प्राचीन असून हिदुधर्माच्या अनेक चालीरीतीबरोबरच तीही राजपुतात विद्यमान होती यात शका नाही दक्षाच्या घरी अपमान झाल्याने शकराची स्त्री सती हिने तेथील अग्निकुडात उडी घेऊन स्वत स जाळून घेतले व नतर हिमालयाच्या येथे जन्मास आल्यावर तिने पुन आपणास शकरच पति प्राप्त व्हावा म्हणून तपश्चर्या केली ह्याच कथेला अनुलक्षून ह्या प्रकाराला पुढे सती हे

नाव मिळाले असावे आपल्या मृतपतीच्या शवाबरोबर चितारोहण करणाऱ्या स्त्रियांच्याही ठिकाणी पुढल्या जन्मी आपणास हाच पति मिळावा अशी पतिनिष्ठेचीच भावना असते व त्यानाही सतीच म्हणतात शिवाय पतीच्या शवाबरोबर स्त्रीने सहगमन केल्यास तिच्या ह्या पुण्य-प्रतापामुळे पति आपल्या सर्व पातकापासून मुक्त होतो व असख्य कालप-पर्यंत ती उभयता स्वर्गात निवास करतात—

तिस्त्र कोट्योऽर्धकोटी च यानि लोमानि मानवे ।
तावत्काल वसेत्स्वर्गं भर्तार यानुगच्छति ।।

अशा प्रकारची शास्त्रात वर्णन केलेली भावनाही ह्या प्रकारच्या मुळाशी असेच सतीची चाल बद करण्याचा प्रयत्न प्रथमत अकबराने, नतर जहा-गीरने, व अखेरीस लॉर्ड वुइल्यम् बेंटिकने केला व त्याच्या फलस्वरूप हल्ली सती जाणे कायद्याने बद झाले आहे मोगल बादशाहाच्या कायद्याविरुद्ध त्या काळात स्त्रिया सती जातच होत्या राजपूत समाजात हा प्रघात सामान्यत प्रचलित होता राजपूत स्त्रियाचे हे सती जाणे अनेक युरोपीय विद्वानानी स्वत अवलोकन केले आहे राजपूत पुरुष ज्याप्रमाणे मृत्यूला क पदार्थ समजून सदैव रणागणात झुजण्यास सिद्ध असतो त्याचप्रमाणे राजपूत रमणीही कोणत्याही वेळी मृत्युपथाचा प्रवास पत्करण्यास सज्ज असते त्यातून आपल्या पतीबरोबर तो करण्यात तर त्याना एक प्रकारचा विशेष आनद होतो राणा भीमसिहाने कृष्णाकुमारीसाठी विषाचा प्याला पाठविला तेव्हा तो अत्यत आनदाने प्राशन करून तिने आपल्या शोकाकुल मातेचे पुढील साध्या पण गभीर तत्त्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या शब्दानी सात्वन केले आहे ती म्हणते, "आई, माझ्या आयुष्याचे अखेरचे क्षण मी मोजीत असताना तू अशी दु खी काय म्हणून बसली आहेस ? मला तर मृत्यूची मुळीच भीति वाटत नाही मी तुझीच कन्या नाही काय ? मग मला मृत्यूची भीति का वाटावी ? आमचा जन्मच मुळी त्यागाकरिता आहे मग माझ्या पित्याने मला एवढे मोठे होऊ दिले हे त्याचे मजवर उपकारच नव्हेत काय ? प्राणोत्सर्गद्वारा माझ्या पूज्य पित्याचे कष्ट दूर करून आपले जीवन स्वराज्यसरक्षणाच्या कार्यात सार्थकी लावण्याचा हा प्रसग हाताचा जाऊ देणे योग्य नव्हे, असे मला वाटते" अशा तऱ्हेने विषाचा परिणाम

होऊन तोडातून रक्ताच्या गुळण्या येईपर्यंत ती बोलतच राहिली कृष्णा-कुमारीचे हे भाषण सामान्यत राजपूत स्त्रियाच्या मृत्युविषयक भावनाचे द्योतक आहे यात शका नाही मृत्यूसबधी आत्यतिक बेफिकिरी व मरणात देखील पतीबरोबर सहकार्य करण्याची उदात्त भावना ह्या उच्च कल्पनानी राजपूत स्त्रिया सती जात रायबहादूर गौरीशकर ओझाजी म्हणतात, "इग्रज सरकारद्वारा सतीची प्रथा बद होण्यापूर्वी कोणाही राजाच्या राणीला सती जाण्याकरिता आग्रह करण्यात येत नव्हता परतु त्यापैकी एखादी स्वत सती जाऊ इच्छित असली तर तिला तिच्या निश्चयापासून कोणी परावृत्तही करू शकत नव्हता सर्व राण्या सती जात होत्या असेही नव्हे सतीची प्रथा बद होण्यापूर्वी अनेक जातीत ही रीति थोडी बहुत प्रचलित होतीच. कोणी बाई कोणाच्या सागण्यावरून अथवा बहकाविण्यावरून सती जात नव्हती परतु आपल्या पतीवर विशेप प्रेम असल्यामुळे तिला एक प्रकारचा विरहोन्माद होत होता व त्यायोगे शारीरिक कष्टाची पर्वा न करता मोठ्या वीरतेने ती आपल्या पतीबरोबर जळून मरत असे त्या वेळी सती जाणाऱ्या स्त्रियाची सख्या शेकडा एक किवा दोन होती अशीही काही उदाहरणे मिळतात की, प्रेमाच्या आवेशात माता आपल्या पुत्राबरोबर, दासी स्वामिनीबरोबर व दास स्वामीबरोबर जळून मेले आहेत असेही आढळून आले आहे की, काही स्त्रिया आपल्या पतीच्या मृत्यूनतर कित्येक वर्षांनी पतीचे स्मरण येऊन प्रेमोन्माद झाल्यामुळे सतीप्रमाणे जळून मेल्या आहेत"

प्रत्येक चागल्या गोष्टीचाही विपर्यास होऊ शकतो मग सतीसारख्या बाह्यत अत्यत क्रूरपणाच्या दिसणाऱ्या चालीचा झाला असल्यास काहीच नवल नाही. विधवा झालेल्या स्त्रीस शास्त्रवचनाविरुद्ध जबरदस्तीने जाळल्याचे एखाददुसरे उदाहरण घडल्याबरोबर हिदु स्त्रियाच्या मनोभूमिकेशी अनभिज्ञ अशा लेखकानी सतीच्या मूळ हेतूवरच टीका करण्याचा सपाटा चालविला परतु समतोल बुद्धीने व खऱ्या सहृदय दृष्टीने राजपूत स्त्रियाच्या समग्र चारित्र्याकडे लक्ष दिले असता त्याच्यात विद्यमान असलेल्या ह्या सतीच्या कल्पनेच्या मुळाशी प्रारभी उदात्त भावनाच होती हे नि सशय प्रत्ययास आल्यावाचून राहत नाही

**२२. जोहाराची मीमांसा.** राजपूत स्त्रियाबाबतची आणखी एक गोष्ट सागून हे प्रकरण सपवावयाचे आहे ही गोष्ट म्हणजे जोहाराची होय देशावर जबरदस्त परचक्र आले असता, आणि ज्या दुर्गांत राजस्त्रिया व त्याच्या आनुषगिक स्त्रिया आश्रयार्थ राहिल्या असतील त्याचे अत पर सरक्षण करणे अशक्य असल्याचे दिसून आले असता, राजपूत स्त्रिया सामुदायिक रीतीने एखाद्या घरात बसून स्वत स जाळून घेत आणि नतर राजपूत सैनिक 'देह वा पातयेत् कार्यं वा साधयेत्' ह्या निश्चयाने शत्रूवर जाऊन तुटून पडत स्त्रियाच्या पतीच्या शवाबरोबर वैयक्तिक दहनास सती जाणे म्हणतात, तर ह्या सामुदायिक दहनास जोहार म्हणतात राजपूत इतिहासामध्ये असे जोहाराचे प्रसग एकूण पाचदा आले आहेत तीनदा चितोडात व दोनदा जेसलमीरात राजपूत आपल्या स्त्रीच्या पातिव्रत्याची व शीलाची पर्वा सर्वांत अधिक करतो त्यामुळे गड पडून शत्रूच्या हाती गेल्यावर आपल्या स्त्रियाची शत्रूकडून होणाऱ्या विटबनेची कल्पनाच त्याला असह्य होते राजपूत स्वत शत्रूचा प्रदेश जिकल्यावर हातीं सापडलेल्या स्त्रियाना अथवा मुलीना धरून आणीत व आपल्या रावळांत म्हणजे अत पुरात ठेवीत कधी कधी त्याशी ते विवाहसुद्धा लावीत शत्रूच्या स्त्रिया पळविणे व त्याना आपल्या दासी बनविणे ही प्रथा अनेक पौरस्त्य व पाश्चिमात्य देशामध्ये विद्यमान होती तीत शत्रूवर आत्यतिक सूड घेतल्याची भावना भरलेली होती हल्लीच्या आतरराष्ट्रीय कायद्याच्या युगांत जरी ही प्रथा बद झालेली असली व कायदा उजळ माथ्यानें तिचा पुरस्कार करीत नसला तरी विजयोन्मत्त झालेल्या शिपायाच्या ठिकाणी ती भावना जागृत होतेच राजपूतामध्ये ही गोष्ट गौरवाची व पराक्रमाची मानीत

पण शत्रुपक्षाची स्त्री हरण करून आणणे याचा अर्थ ती चोरून, लपून, उडवून आणणे अथवा पळविणे असा नव्हे हिंदु विवाहपद्धतीत ज्या विविध विवाहाचे वर्णन केलेले आहे त्यातच राक्षस व गाधर्व विवाहाचे वर्णन आहे शत्रु आपल्या सर्व सैन्यासह सज्ज असताना पराक्रम गाजवून व त्याच्या सैन्याचा पराभव करून त्याच्या डोळ्यादेखत त्याच्या मुली हरण करण्याचा व त्याशी विवाह लावण्याचा राक्षस व गाधर्व विवाह पद्धतीत हिंदुधर्मशास्त्राने अधिकार दिला आहे याप्रमाणे हरण करून

आणलेल्या मुलीशी स्वत च विवाह केला पाहिजे असेही नाही, हे भीष्माच्या उदाहरणावरून स्पष्ट होते श्रीकृष्णाने रुक्मिणीस असेच शिशुपाल व रुक्मीशी लढून व त्याचा पराभव करून हरण करून आणले होते. त्याचप्रमाणे पृथ्वीराजानेही राजा जयचदाच्या दरबारात भरलेल्या भर स्वयवरातून सयोगितेस हरण करून आणले होते या दोन्ही बाबतीत त्याचे त्या उभय राजपुत्रावर प्रेम तरी होते. पण भीष्माने हरण करून आणलेल्या अबा, अबिका व अबालिका या मुलींचे तर त्याच्यावर प्रेम देखील नव्हते व त्यानेही स्वत च त्यांच्याशी विवाह लावण्याऐवजी त्याना आपल्या भावाच्या वधू बनविल्या होत्या यावरून शत्रूच्या मुली हरण करून आणण्याची ही पद्धत आर्यांत जुनीच असून बाकीच्या धार्मिक परपराबरोबरच तीही राजपुतात उतरली होती हे उघड होते बाप्पा रावळने जिकलेल्या शत्रूच्या मुलीबरोबर कैक विवाह केले होते ज्या ज्या राजाचा त्याने पराभव केला त्या त्या सर्वांच्या कन्याशी त्याने बलपूर्वक विवाह लावला होता असे ‘पर्यगृहीन्नृपसुता शतश स्वशक्त्या’ ह्या एकलिगजीच्या मदिरातील शिलालेखामधील वचनावरून दिसते त्याचप्रमाणे राणा कुभाच्याही बाबतीत त्याने यवनाच्या शेकडो स्त्रिया बद्धा म्हणजे दासी केल्या होत्या असे कुंभलगडप्रशस्तीत व कीर्तिस्तम्भप्रशस्तीतही वर्णन आले आहे

साराश, राजपूत स्वत जितशत्रूच्या स्त्रियाना कैद करून दासी बनवीत असल्याने त्याना आपण हारल्यास आपल्या स्त्रियांना शत्रूही कैद करील व दासी बनवून त्याची विटबना करील अशी सकारण भीति वाटत असे लढाईमध्ये जीवनमरणाचा प्रश्न समोर उभा राहिला असता व राष्ट्राच्या सरक्षणाकरिता देशातील आबालवृद्ध सर्व पुरुषवर्गाने आत्मत्याग करण्याचा प्रसग येऊन ठेपला असता राष्ट्रात विधवाचे प्रमाण वाढून अर्जुनाने गीतेत म्हटल्याप्रमाणे कुलस्त्रिया भ्रष्ट होतील, वर्णसकर माजेल व तो आपणास नरकावह होईल अशी पारलौकिक भीतीही त्याच्यापुढे उभी असे गेल्या जर्मन युद्धात फरान्स देशातील पुरुषाची अतोनात हानि झाल्यामुळे देशात स्त्रियाचेच प्रमाण फार वाढले व आता लोकसख्येची ती हानि भरून काढण्यासाठी खटपटी सुरू आहेत हे आपण

पाहतोच स्वत राजपूत स्त्रियानाही अशा प्रकारे आपल्या पतीनी देशाकरिता मरावे व आपण मात्र त्याच्या पश्चात् वैधव्याचे कटाळवाणे जिणे कठीत व कामी पुरुषाच्या पापीवासनाचे विषय बनत देशास भारभूत होऊन राहावे ही कल्पनाच असह्य वाटत असे. पतीच्या पश्चात् विधवा होऊन राहण्यापेक्षा पतिसमक्ष अग्निप्रवेश करून मरणे शतश श्रेयस्कर होय अशी त्याची भावना असे, आणि आपल्या समक्ष आपल्या स्त्रियानी अग्निप्रवेश केला म्हणजे पाठीमागचे सर्व मायापाश तुटत असल्याने राजपूत वीर स्वतःच्या जीविताची तमा न बाळगता लढत व अत्यत विषम सख्येच्या शत्रूशीही मोठ्या धैर्याने सामना देऊन रणागणावर मरण पावत. आपल्या स्त्रिया आपल्या अगोदर स्वर्गात गेल्या असून पचारती घेऊन आपणास ओवाळण्यास व आपले स्वागत करण्यास त्या स्वर्गाच्या द्वाराशी उभ्या आहेत ह्या कल्पनेने राजपूत योद्ध्यास अधिक बळ चढे व शक्य तितका अधिक शत्रुसहार करून ते लढता लढता देह ठेवीत.

राष्ट्रीय आपत्तीच्या प्रसगी स्त्रियाच्याही सरक्षणाचा देशावर अधिक भार पडू नये व वैधव्याचा दुर्धर प्रसग येऊन पुढे शत्रूकडून होणाऱ्या बीभत्स विटबनेस आपण बळी पडू नये म्हणून जोहाराच्या द्वारा स्वत होऊन स्वत स अग्निनारायणास समर्पण करण्याचा स्त्रियाचा हा दिव्य त्याग जगाच्या पाठीवर भरतवर्षाखेरीज अन्यत्र कोठेही आढळणार नाही, व भरतवर्षात देखील सर्व हिंदु समाजात तो प्रचलित नाही फक्त राजपुतातच तो सापडतो राजपुताच्या अनेक वैशिष्ट्यापैकी हे प्रधानतम वैशिष्ट्य होय राजपूत रमणीच्या ह्या आनदाने व स्वसतोषाने केलेल्या दिव्य आत्मत्यागाची वर्णने वाचून त्याच्या अद्भुत आकर्षकतेने सर्व मनुष्यजातीस मुग्ध करून सोडले आहे जोहार अद्भुत खरा! पण अद्भुततेबरोबरच त्यात एक प्रकारचे रमणीयत्वही असल्याने त्यास आकर्षकपणा प्राप्त झाला आहे कोणाही सहृदय मनुष्याच्या चित्तास राजपूत रमणींचा जोहार मनोवेधक वाटल्याविना राहणार नाही व त्यातील उदात्तता व भव्यता त्याच्या चित्तावर ठसल्याविना राहणार नाहीत

**९३. जोहाराची उदाहरणे-जेसलमीर** राजपूताच्या इतिहासात पहिला जोहार जेसलमीरच्या स्त्रियानी केलेला आहे दिल्लीच्या

सुलतानाने मुलतान व ठठ्ठा काबीज करून मिळविलेली लूट व खजिना दिल्लीस येत असता जेसलमीरच्या राजपूत सरदारानी त्यावर पाळत ठेऊन हल्ला केला व मुसलमान सरक्षकास कापून काढून तो लुटून जेसलमीरास आणला राजपूताच्या या धाष्टर्याने चिडून जाऊन दिल्लीच्या सुलतानाने महबूबखान नामक आपल्या सरदाराबरोबर मोठी फौज देऊन त्यास जेसलमीरावर रवाना केले इ स १२९४ साली याप्रमाणे जेसलमीरास वेढा पडला असता व यावनी आक्रमणापासून गडाचे सरक्षण करणे अशक्य आहे अशी खात्री झाली असता राजा मूलराज याने आपले सर्व सैनिक जमवून "आपण इतकी वर्षे आपल्या गडाचे सरक्षण केले आहे पण आता आपला निधि सपला असून अधिक द्रव्य प्राप्त करण्याची आशाही उरलेली नाही तेव्हा अशा प्रसगी काय करावे ?" असा आपल्या सरदाराना प्रश्न विचारला त्या वेळी सर्व सरदारानी "जोहार केल्याशिवाय गत्यतर नाही या त्यागास आपण तयार झालेच पाहिजे" असे उत्तर दिले झाले! लगेच त्याप्रमाणे ठरवून त्यानी सर्व स्त्रियाना जोहाराची तयारी करण्याची सूचना दिली कर्नल टॉड म्हणतो, "राजपूत आपल्या स्त्रियाना भेटले व त्याना त्यानी 'स्वर्गात आमची भेट घेण्यासाठी सोहाग तयार करा, तोपर्यंत आपल्या धर्माच्या व यशाच्या सरक्षणासाठी आम्ही आमची शरीरे रणागणात ठेवतो' असे सागितले राजाचा निरोप ऐकून राणी म्हणाली, 'ह्याच रात्री आम्ही आपली तयारी करतो सकाळचा सूर्यप्रकाश आमच्या अगावर पडतो न पडतो तोच आम्ही स्वर्गात तुमची वाट पाहत असू ! सर्व सरदार व सैनिक ह्याच्या स्त्रियानीही आपापल्या पतीना हीच उत्तरे दिली सर्व पतिपत्नीनी दुसऱ्या दिवशीच्या अ्भुत प्रभाताच्या प्रतीक्षेत ती रात्र एकमेकाच्या सहवासात घालविली सूर्य उगवला सध्यावदन व प्रार्थना आटोपण्यात आल्या गडावरील सर्व बाला, प्रौढा व वृद्धा राजद्वारापाशी जमा झाल्या आपापल्या आप्तेष्टाना त्यानी अतिम अभिवादन केले आणि जोहारास प्रारभ झाला लहानापासून थोरापर्यंत एकदर चोवीस हजार स्त्रियानी आत्मसमर्पण केले कित्येकीनी आपल्या तरवारीनी आपली शिरकमले छेदिली व बाकीच्यानी अग्निनारायणास आपले देह अर्पण केले रक्ताचे प्रवाह वाहिले आणि त्याच्या चिताचा धूर स्वर्गास

जाऊन भिडला त्यातील एकसुद्धा रमणी मृत्यूस भ्याली नाही. आता राजपुताना आपले जीवन म्हणजे ओझे वाटू लागले त्यानी स्नाने करून देवपूजा केल्या. गरिबाना दाने दिली. आपल्या पगड्यामध्ये तुळशीची पाने ठेवली. गळयांत शाळिग्राम बांधले. अगावर चिलखत व त्यावर केशरी पोषाख चढविले व परस्परानी परस्पराना अखेरची आलिगने देऊन तीन हजार आठशे वीर क्रोधसतप्त मुद्रानी शत्रूवर तुटून पडले"

जेसलमीरच्या पहिल्या जोहाराचे टॉडने वरीलप्रमाणे मोठे रसभरित वर्णन केले आहे त्यानतर आणखी दहाबारा वर्षांतच जेसलमीरचा दुसरा जोहार घडून आला

**२४. चितोडचे जोहार.** इ० स० १३०३ मध्ये चितोडचा पहिला जोहार झाला पद्मिनीसारखे राजस्थानचे रत्न मिळविण्याच्या आशेने अल्लाउद्दीनने चितोडवर स्वारी केली होती चितोडच्या सरक्षणाकरिता अकरा राजपुत्रानी रणक्षेत्रात आत्मार्पण केले होते व इतके करूनही गडाचे रक्षण होणे अशक्य आहे असे दिसून आले होते त्यामुळे स्त्रियानी जोहाराचा निश्चय केला टॉडच्या कथनाप्रमाणे ठरलेल्या दिवशी गडावरील आबालवृद्ध पधरा हजार स्त्रिया एकत्र जमल्या पद्मिनीसह त्यानी मगल सुहासिनीचा पोषाख केला व राजमहालाखाली असलेल्या तळघरात त्या जाऊन बसल्या सर्व प्रकारचे ज्वालाग्राही पदार्थ त्यात भरण्यात आले सौंदर्यराणी पद्मिनीच्या समोवार बसून मगलगीते गाण्यास राजपूत रमणीनी प्रारभ केला त्याबरोबर त्याच्या शीलसरक्षणार्थ राजपूत वीरानी स्वहस्तानी त्या तळघरास अग्नि लावला आणि भगवान एगलिगजीचा जयघोष करीत चितोडगडाची दारे सताड मोकळी टाकून ते यवनसैन्यावर वाघासारखे तुटून पडले इकडे त्याच्या सती जाणाऱ्या स्त्रिया कडाडणाऱ्या अग्निज्वालात भस्म होत होत्या, तर ज्याच्या हातून त्याच्या सतीत्वाचा उपमर्द होण्याची भीति होती त्या दुश्मनाना ते आपल्या क्रोधाग्नीमध्ये जाळून भस्म करीत होते थोड्या वेळाने गड अल्लाउद्दीनाच्या स्वाधीन झाला. पण तो निर्जीव व भयाण गड पाहून असे म्हणतात की, क्रूर अल्लाउद्दीनचे देखील हृदय थरारले विशेषत पद्मिनीच्या आशेने शोध करणाऱ्या

त्याच्या दृष्टीला पधरा सहस्र राजपूत रमणीच्या जोहाराचे ते भयकर दृश्य दिसले तेव्हा त्याची दृष्टि क्षणभर अध झाली त्या सती स्त्रियाच्या जोहाराचे ते स्थान अद्याप अत्यत पवित्र मानले जाते त्या तळघराच्या घनाधकारात आजपावेतो कोणी ही प्रवेश केलेला नाही त्यातील परम पवित्र राखडोलाही कोणाचा स्पर्श होऊ नये म्हणून तिच्या सरक्षणार्थ एक मोठा नाग आपला विषारी फणा उभारून सदैव सज्ज असतो अशी आख्यायिका टॉडने दिली आहे

यानतरचा दुसरा जोहार राणा सगाच्या विधवा पत्नीच्या—कर्मवतीच्या—कारकीर्दींत बहादुरशहाने चितोडवर स्वारी केली तेव्हा करण्यात आला गडसरक्षणाची आशा पार नष्ट झाली होती राजपूत पुरुषानी केशरी वेष धारण करून अतिम युद्धाचा निश्चय केला आपल्या पतीचा हा निश्चय पाहून राजपूत रमणीनीही पद्मिनीने घालून दिलेला मार्ग अनुसरण्याचे ठरविले कर्मवतीने सर्व स्त्रियाचे नेतृत्व पत्करले सर्वजणी मगलवेष व सौभाग्याभरणे धारण करून एका मोठ्या महालात बसल्या• तेरा हजार राजपुतिनीच्या मध्ये त्याची आवडती राणी कर्मवती बसली होती पतिदर्शनाच्या लालसेने तिने मगल मळवट भरून सौभाग्यवेष धारण केला होता महालात कापूर, राळ, चदन इत्यादि ज्वालाग्राही पदार्थ खचून भरण्यात आले राजपुतानी आपल्या हातानी त्यास अग्नि लावून पवित्र जोहाराचे पुण्य सपादन केले आपल्या पावित्र्याचा भग होऊ देण्यापेक्षा व आपल्या पतीचे मरण डोळ्यानी पाहण्यापेक्षा तेरा सहस्र पतिव्रतानी कडाडणाऱ्या अग्निशिखामध्ये जळून भस्म होण्याचे दु ख आनदाने व धैर्याने सहन केले बहादूरशहाने गडावर प्रवेश केला तेव्हा त्यास काय दिसले ? तेरा हजार स्त्रियाचा पचमुखानी स्वाहा करून भगवान् हुताशन आपल्या लोलायमान जिव्हानी त्या निर्जन गडाच्या भीषणतेत भर घालीत होता ज्वालाग्राही द्रव्याच्या विषमय धुराचा गध जिकडे तिकडे पसरला होता आणि शात होऊ पाहणाऱ्या अग्निस्तभामधून हजारो स्त्रियाच्या रक्षेचा पर्वत दृष्टिगोचर होत होता

चितोडचा तिसरा जोहार अकबराने स्वारी केली असता घडून आला गडाचे रक्षण करणे अशक्य, हे शाबीत झाल्यानतर राजपुतिनीनी जोहार

पुकारण्याचा निश्चय केला हजारो राजपूत स्त्रिया मगलवेष धारण करून महालात जाऊन बसल्या. राजपूत वीरानीही एकत्र बसून विडे खाल्ले, केशरी वेष धारण केला, सर्व शस्त्रास्त्रे हाती घेतली व ज्वालाग्राही पदार्थाचे ढीगच्या ढीग महालात रचून त्याना अग्नि लावला राजपूत रमणीच्या स्वर्गकामनाची मगलगीते व जयध्वनि ऐकताच राजपुतानीही मोठ्याने जयघोष करून किल्ल्याची द्वारे सताड उघडून दिली मोगलसेनेच्या अनेक तुकड्या आत शिरल्या व कापल्या गेल्या अग्निज्वालात आनदाने भस्म होणाऱ्या रमणीची मगलगीते ज्वालाग्राही पदार्थांच्या धडाधड आवाजातूनही अद्याप ऐकू येत होती त्याचा ध्वनि जसजसा मद होत होता तसतसा राजपुताच्या ठिकाणी शौर्याचा उमाळा येऊन मोगल फौजेचा ते ते फन्ना पाडीत होते

याप्रमाणे राजपूत स्त्रियाच्या जोहाराची अद्भुतरम्य वर्णने आहेत. व प्रत्येक जोहारामध्ये त्याची देशहिततत्परता, पतिनिष्ठा, सतीव्रत, शीलसरक्षणप्रियता, अलोट धैर्य, असीम त्याग व आनदाने मृत्यूशी सामना घेण्याची निर्भय वृत्ति इत्यादि अलौकिक गुण व्यक्त होतात.



## प्रकरण चवथें

# राजपुतांची युद्धरीति, खेळ, उत्सव व सण

**१. सामाजिक खेळ, उत्सव इत्यादि संस्कृतीची शाखा.** कोणत्याही समाजाच्या अथवा देशाच्या सस्कृतीच्या अतरगात शिरावयाचे असल्यास त्या समाजातील अथवा देशातील सामाजिक जीवनाकडे लक्ष पुरविणे अवश्य असते आणि सामाजिक जीवनाचे उत्कृष्ट प्रतिबिब त्या देशाच्या अथवा समाजाच्या खेळात, सणा–समारभात व उत्सव इत्यादिकात पाहावयास सापडते त्या दृष्टीने प्रस्तुत प्रकरणात राजपुताच्या सामाजिक जीवनाची योग्य कल्पना वाचकास आणून देण्यासाठी त्याच्या खेळाची, सणा–समारभाची व उत्सवादिकाची माहिती देण्याचे योजिले

आहे त्याच्या पुष्कळशा गोष्टी सामान्य हिंदु सणासमारंभासारख्याच असल्या तरी कित्येकीत त्याचे असे खास वैशिष्टच उमटलेले आहे, असे वाचकाच्या लक्षात आल्याशिवाय राहणार नाही

२. **चौपट व बुद्धिबळ.** प्रारंभी खेळाचाच मुद्दा घेऊ खेळाच्याच दृष्टीने विचार केला तर राजपुताच्याही खेळाचे आभ्यतर व बाह्य ( Indoor and outdoor ) अशा दोन प्रकारे वर्गीकरण करता येईल आभ्यतर खेळामध्ये चौपट व बुद्धिबळ हे त्याचे आवडते खेळ होत उन्हाळयाच्या दिवसात रात्रीच्या प्रसगी निर्मल आकाशात चद्राची आल्हादकारक कौमुदी विकास पावलेली आहे व तिच्या शुभ्र प्रकाशात गुलहौशी राजपूत तरुणाचे व वृद्धाचे गटच्या गट आपापल्या अगणात अथवा मौधावर बसून कुसुब्याचा रस प्राशन करीत आहेत, फाशाचे डाव सुरू आहेत, बुद्धिबळातील प्यादी मागेपुढे सरकत आहेत, व कोणी तरुण बेफिकीर अत करणाने आपणास आवडता असा टप्पा अथवा ख्याल गात असून बाकीचे लोक त्यास वाह्वा वाह्वा म्हणून उत्तेजन देत आहेत व तोही हातभर वर उठून अभिवादनपूर्वक सर्वांच्या अभिनदनाचा स्वीकार करीत आहे, अशा प्रकारचे देखावे राजपूत जीवनात सार्वत्रिक आढळतील पट्टीचे फासे खेळणारे लोक राजपुतात सापडतील मृच्छकटिकात म्हटलेली ‘ द्यूत हि नाम पुरुषस्य असिहासन राज्य ’ ही म्हण राजपुताच्या बाबतीत यथार्थत्वाने लागू पडेल फाशाबरोबर सहचारित्वाने जुगाराची वाढ होत असते व त्याचेही प्राचुर्य राजस्थानात आढळून आल्याविना राहणार नाही द्यूताचा फड पडला व तेथील खेळाडूनी आपल्या हातात फासे घेऊन व त्याना हातावर घोळून त्याचा एकदा कडकड शब्द केला की अत्यत दरिद्री असला तरी राजपूत त्यात सामील झाल्याशिवाय राहणार नाही इतके त्याना या खेळाचे वेड आहे

३. **बाह्य खेळांचा विचार.** बाह्य खेळात घोडयावर बसणे, शिकार खेळणे, निशाण मारणे, भाला, बरची, तरवार इत्यादि फिरविणे, कुस्त्याची दगल भरविणे इत्यादि गोष्टीचा अतर्भाव होतो थोडक्यात सागावयाचे म्हणजे ज्याला शस्त्रविद्या अथवा युद्धोपयोगी कला म्हणता येईल तिचाच या मैदानी खेळात समावेश होतो पण या ठिकाणी जरी शस्त्र-

विद्येचा अथवा तद्विषयक खेळाचा विचार करावयाचा असला व त्याचा युद्धशास्त्राशी बराच मबध असला तरी राजपुताची युद्धनीति हा विषय स्वतत्र प्रतिपादनाचा असल्याने त्याचा विचार प्रस्तुत प्रकरणी कर्तव्य नाही फक्त निरनिराळ्या शस्त्राचे सचालन, शस्त्राच्या बाबतीत राजपुताच्या आवडीनिवडी, त्याची शस्त्रसचालनाची कुशलता इत्यादि गोष्टीचाच विचार कर्तव्य आहे

३. **धनुर्विद्येची व्याप्ति.** वर ज्या खेळाचा उल्लेख केला आहे त्या सर्वांचा प्राचीन भाषेत बोलावयाचे म्हणजे धनुर्विद्येत अतर्भाव होतो धनुर्विद्या म्हणजे प्राधान्येकरून धनुष्यबाणाची विद्या असे जरी असले, तरी शस्त्र व अस्त्र या सबधीची जेवढी विद्या ती सर्व धनुर्विद्या होय, अशी तिची व्याप्ति आहे विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज इत्यादि ऋषीनी या विषयावर लिहिलेले ग्रथ सध्या उपलब्ध होऊ लागले आहेत नाशिकचे स्थापत्यविशारद कै० रावसाहेब वझे यानी या बाबतीत परिश्रम करून धनुर्वेदशास्त्रावरचा एक ग्रथ लिहिण्यास घेतला होता, त्याची सुमारे एक हजार पृष्ठे तरी होतील असे त्यानी प्रस्तुत लेखकास कळविले होते परतु त्याचा सकल्प सिद्धीस जाण्याच्या आधीच ते दुर्दैवेकरून कालवश झाले तथापि तत्पूर्वी त्यानी पुण्याच्या भारत इतिहास सशोधक मडळाच्या त्रैमासिकात आपले ह्या विषयावरील विचार प्रकट करणारा एक लहानसा निबध लिहिला होता काशीच्या नागरी प्रचारिणी सभेच्या त्रैमासिकात रा ब गौरीशकर ओझा यानीही धनुर्वेदाचे विस्तृत विवेचन करणारा निबध लिहिला आहे कागडा गुरुकुलाचे स्नातक देशबधु विद्यालकार यानीही धनुष्यावरून बाण मारण्याच्या कलेचा अभ्यास करू इच्छिणाऱ्यास मार्गदर्शक होईल अशी एक लहानशी पुस्तिका लिहिली आहे याशिवाय या विषयावरील वाङ्मयोत्पादनाचा फारसा प्रयत्न कोणी केला नाही. धनुर्विद्येच्या सशोधनाच्या व पुनरुज्जीवनाच्या बाबतीत अमरावतीच्या सुप्रसिद्ध हनुमान् व्यायाम प्रसारक मडळानेही अभिनदनीय प्रयत्न चालविले आहेत या मडळाने श्री रघुनाथराव खानीवाले या गृहस्थाना धनुर्विद्येचे शिक्षण दिले असून श्री खानीवाले हे आपल्या अविरत अभ्यासाने या विद्येत धुरधर असे धनुर्विद्याविशारद झाले आहेत धनुर्विद्या आजही

थोडया फार प्रमाणात जपानात जिवत आहे जपानच्याच प्रयत्नाने धनुष्यावरून बाण मारण्याच्या कलेस आतरराष्ट्रीय खेळाच्या सामन्यात प्रवेश मिळाला आहे श्री खानीवाले यानीही जपानात भ्रमण करून तेथे भारतीय धनुर्विद्येची श्रेष्ठता सिद्ध केली आहे व त्याबद्दल तिकडील वर्तमानपत्रानी त्याचा गुणगौरव करून त्याना 'हिदुस्थानचा वुइल्यम टेल' अशी पदवी बहाल केली आहे याबद्दल हनुमान व्यायाम मडळाचे सचालक व श्री खानीवाल्याचे गुरु बलोपासक अबादासपत वैद्य यासच सर्व श्रेय दिले पाहिजे धनुष्यावरून बाण मारण्याच्या कलेखेरीज धनुर्विद्येच्या इतर अगोपागातही हनुमान व्यायाम मडळाने जी प्रगति केली आहे तिच्यामुळेच तिला भारतीय प्रसिद्धि प्राप्त झाली आहे

वर निर्दिष्ट केलेल्या महत्त्वाच्या प्रयत्नाशिवाय आर्यांचे हे प्राचीन शास्त्र प्रकाशात आणण्याचा नेटाचा उद्योग फारसा झालेला नाही वास्तविक पाहता भारतीय सशोधकाचे नीटसे लक्षच इकडे वेधले गेले नाही महाभारत रामायण भागवतादि ग्रथात या विषयावर बरेच वर्णन आढळते उदाहरणार्थ, कुस्ती हा विषय घेऊ साप्रत हिदुस्थानात कुस्तीच्या अनेक परपरा विद्यमान आहेत धनुर्विद्येवरील ग्रथातही कुस्तीच्या निरनिराळ्या डावपेचाची नावे व वर्णने आढळतात तसेच रामायणात हनुमत व मकरध्वज, वाली व सुग्रीव याच्या कुस्तीचे, महाभारतात भीमाच्या जरासध, जीमूत व कीचक याच्याबरोबर झालेल्या कुस्त्याची आणि भागवतात श्रीकृष्ण-चाणूर व बलराम-मुष्टिक याच्या कुस्त्याची विशद वर्णने लिहून ठेवलेली आहेत कुस्तीस नियुद्ध अथवा बाहुयुद्ध म्हणत व त्यातच केशाकेशि म्हणजे परस्परानी परस्पराचे केश धरून आकर्षण करणे व मुष्टामुष्टि म्हणजे परस्परानी परस्परावर मुष्टीचे आघात करणे याचाही समावेश होत असे हल्ली केशाकेशि तर बदच झाली आहे मुष्टामुष्टीचा नवीन पाश्चात्य प्रकार म्हणजे बॉक्सिग मात्र प्रचारात येऊ पाहात आहे वज्रमुष्टीच्या स्वरूपात मुष्टामुष्टीचा प्रकार हिदुस्थानात हाताच्या बोटावर मोजण्या इतक्या ठिकाणीच विद्यमान असेल पोत्यामध्ये रेती भरून त्यावर मुष्टीचे आघात करण्याची सवय हा या खेळाचा प्राथमिक अभ्यास होय काशीसारख्या ठिकाणी सुरू असलेला मुरब्बीचा खेळ

अथवा वऱ्हाडात वणीसारख्या ठिकाणी सुरू असलेला गुद्दलपेडीचा खेळही या मुष्टामुष्टीचेच प्रकारान्तर होय प्राचीन काळच्या कुस्तीत प्रतिपक्षी-याच्या मर्मावर प्रहार करून त्याचा प्राण घेण्याची कला विद्यमान होती तीही आज नष्ट झाली असून केवळ चीतपट करण्याचा प्रघात पडलेला आहे त्यातही आता प्रदर्शनी कुस्त्याचा नवीन पायडा पडत चाललेला आहे साराश, कुस्तीसारख्या महत्त्वाच्या व पहिल्या युद्धकलेतही कृत्रिमपणाकडेच लोकाचा कल झुकू लागल्याचे स्पष्ट दिसत आहे प्राचीन काळी मोठमोठाले क्रीडारग ( arenas ) तयार करून त्यात दगली कशा प्रकारे भरविण्यात येत व त्याप्रसगी कोणकोणते खेळ कोणकोणत्या प्रकारे खेळण्यात येत इत्यादि गोष्टीची महाभारतातील राजपुत्राच्या धनुर्विद्येतील नैपुण्याच्या परीक्षेसाठी भरविण्यात आलेल्या रगाच्या व त्यात अर्जुन व कर्ण, भीम व दुर्योधन याच्यामध्ये झालेल्या सामन्याच्या वर्णना-वरून कल्पना येऊ शकते सध्या अतिविस्तीर्ण प्रमाणात असे रग हिदु-स्थानात होत नसले तरी जर्मनी सारख्या पाश्चात्य देशात होतात व ते पाह-ण्यास लक्षावधि लोक जमतात अस्तु हे थोडे अप्रस्तुत व लाबलचक विवरण करण्याचा हेतु इतकाच का, हा विषय अद्याप कसा असशोधित आहे हे दाखवावे हे सशोधन करू इच्छिणाऱ्या माणसास राजस्थानात सर्वांत अधिक उपयुक्त सामग्री मिळण्यासारखी आहे हे पुढील वर्णनावरून दिसून येईल

४. **धनुर्वेदशास्त्राचा विकास.** नियुद्ध अथवा कुस्तीसारख्या बिनहत्यारी खेळापासून धनुर्वेदशास्त्रास प्रारभ होतो आणि असिचर्म म्हणजे ढालतरवारीचे युद्ध, कुतयुद्ध, गदायुद्ध, छुरिकायुद्ध या निकटवर्ती द्वद्वाच्या प्रकाराचाही त्यात समावेश होतो या प्रकारात दोन्ही प्रतिपक्षी अगदी आमनेसामने हात पसरून प्रहार करण्याच्या कक्षेत असतात या-नतरचे प्रकार म्हणजे प्रतिपक्षी एकमेकापासून अधिक लाब असताना लाबून फेकून मारून प्रहार करण्याच्या साधनाचे होत धाकटे धाकटे भाले अथवा लोखडी सागी याना शक्ति म्हणतात ह्या शक्ति दूर अस-लेल्या शत्रूवर फेकून मारावयाच्या असतात परतु त्याचीही मजल मनुष्याच्या बाहूतील सामर्थ्यावरच अवलबून असते यानतर याहून अधिक लाबच्या अतरावरून युद्ध करण्याचा प्रकार म्हणजे धनुष्याच्या

साहाय्याने बाण फेकून मारणे या धनुष्याच्याही शेकडो जाति असत, अथवा आहेत म्हटले तरी चालेल तसेच बाणाच्याही! कोणत्या पक्ष्याची पखे लावली असता, कोणत्या जातीचा बोरू अथवा वेत वापरला असता, कोणत्या प्रकारचा फाळ बसविला असता, त्यास कोणत्या पदार्थाचे पाणी दिले असता, रेशमाची–वसेची अथवा कामटीची–कोणत्या जातीची प्रत्यञ्चा वापरली असता बाण लाब जाऊ शकेल, खोल जाऊ शकेल, प्राणघातक होऊ शकेल इत्यादि गोष्टीचेही एक तितकेच मोठे व विस्तृत असे शास्त्र आहे, त्याचा तर प्रामुख्याने धनुर्वेदशास्त्रात समावेश आहेच धनुष्यावरून एक मनुष्य एकदम फार झाले तर एकापासून चारपाचपर्यंत बाण मारू शकेल व त्यायोगे तितक्याच इसमाना इजा होईल. पण पुष्कळ माणसावर एकदम प्रहार करणारे सुरनाळे, शतघ्नी यासारखे प्रकार हे त्यानतरचे होत या सर्वाचा धनुर्वेदशास्त्रात समावेश होतो त्याचप्रमाणे विविध सेनाप्रकार, त्याचे विभागमचालन, व्यूह–प्रतिव्यूह इत्यादिकाचे ज्ञान, त्याचप्रमाणे युद्धीय पशूच्या चागलेवाईटपणाचे ज्ञान व त्याच्या सचालनकलेचे ज्ञान इत्यादि गोष्टीही धनुर्वेदशास्त्राचा अभ्यास करणारास शिकाव्या लागतात भारतीय आर्यांनी धनुर्वेदशास्त्राचा एवढा विकास केला होता राजपुतानीही या शास्त्राचा चागलाच अभ्यास केला होता यात शका नाही निरनिराळ्या राजपूत राजाच्या वर्णनावरून त्यानी ह्या शास्त्राची परपरा १९व्या शतकापर्यंत कायम टिकविली होती असे दिसते. आजही सशोधनकर्त्या पुरुषास धनुर्वेदशास्त्रावरील माहिती राजस्थानात जितकी उपलब्ध होऊ शकेल तितकी दुसरीकडे होऊ शकणार नाही

५. **कुस्तीचा शौक** राजपुताना कुस्तीचा विलक्षण शौक होता व आहेही त्याच्या भुजबलाचा त्याना मोठा गर्व असे कवि देखील त्याच्या भुजबलाच्या प्रतापाचे वर्णन करीत 'निजभुजप्रौढप्रताप', 'समानितबाहुवीर्य', यासारख्या विशेषणानी त्याच्या भुजबळाचा ठिकठिकाणी गौरव करण्यात आला आहे भूषण कवीने शिवाजीचे वर्णन करताना–

तेरेहि भुजानपर भूतलोका भार है ।<br>
कहिबेको शेषनाग दिगनाग हिमाचाल है ॥

'शिवाजीच्या भुजबलावरच अखिल पृथ्वी स्थित आहे, शेषनाग, दिङनाग व हिमाचल हे देखाव्यासाठी आहेत' असे म्हटले आहे व त्यात बाहुबलाचा गौरव करण्याची राजपूत मनोवृत्ति स्पष्ट दिसून पडत आहे राजस्थानचा प्रत्येक राजा स्वत कुस्तीचा शौकी असल्याने तो नामांकित पहिलवान आपल्या पदरी बाळगी आज ज्याप्रमाणे सरकारचे या विषयाकडे दुर्लक्ष अथवा औदासीन्य आहे तसे राजपूत राजाचे नसे आपल्या प्रजेस या बाबतीत शक्य तितकी उत्तेजना कशी मिळेल याचा ते विचार करीत मेवाडचा राणा विक्रमाजित (राणा सगाचा पुत्र) यास कुस्तीचा फार मोठा शौक असून त्याने एकदर सात हजार पहिलवान आपल्या पदरी बाळगले होते ही गोष्ट प्रसिद्ध आहे कुस्त्याचा शौक वाढावा एतदर्थ आवश्यक तो सर्व खर्च सरकारी तिजोरीतून करण्यात येई निरनिराळ्या दरबाराचे पहिलवान एममेकाना रीतसर आव्हाने पाठवीत व त्याचा स्वीकार झाला म्हणजे ज्याच्या राज्यात दगल भरेल तो राजा दगलीचा सर्व खर्च सोशी हया दगली पाहण्याकरिता ज्या मानाने पहिलवान नामांकित असेल त्या मानाने दूरदूरचे लोक जमत नुकतीच काही दिवसापूर्वी पतियाळाच्या महाराजानी सुप्रसिद्ध भारतीय पहिलवान गामा व रशियन पहिलवान झेविस्को याची कुस्ती केली होती व तीत गामाने झेविस्कोला अर्ध्या मिनिटात चीत केले होते ही कुस्ती पाहण्यास अखिल हिंदुस्थानातून जो अफाट जनसमूह जमला त्यावरून पूर्वीच्या काळच्या कुस्त्याच्या दगली कशा प्रचड प्रमाणावर होत असतील याची कल्पना करता येईल राजपूत पहिलवान कोणत्या पद्धतीच्या कुस्त्या खेळत, त्यांच्या विशिष्ट परपराचे कोणते विशिष्ट डावपेच असत इत्यादि गोष्टी साम्प्रत सशोधनास्पद आहेत

६ **गदा व कुंत** कुस्तीप्रमाणेच गदा, भाला व तरवार याची द्वद्वयुद्धे खेळण्याचीही राजपुताना फार हौस असे गदेला गुरुज असेही म्हणतात गुरुजात एका लोखडी दाड्याच्या टोकास तीक्ष्ण धारेच्या आठ पाकळ्याचे अथवा दहा पाकळ्याचे एक पोलादी कमळ जोडलेले असते व त्याचा एक प्रहार कोणाही प्राण्याचे मस्तक चूर्णविचूर्ण करून टाकण्यास पुरेसा होतो गदायुद्धाचे फारसे प्रसग राजपूत वाङमयात आढळून येत नाहीत त्यावरून ही कला फारशी लोकप्रिय असावी असे दिसत नाही

तथापि १० व्या ११ व्या शतकापर्यंत मात्र गदायुद्धाचा प्रघात बराच सुरू असल्याचे दिसते मेवाडचा राणा अल्लट याने 'दुर्द्धरमरि यो देवपाल व्यधात् चचच्चण्डगदाभिघातविदलद्वक्षस्थल सयुगे ।'—'आपल्या चचल गदेच्या चडप्रहाराने अजिक्य अशा देवपालाचा युद्धात छाती फोडून प्राण घेतला' असे त्याचे वर्णन आहाडच्या अप्रकाशित शिलालेखात केले असल्याचे रा ब ओझाजींनी आपल्या राजस्थानाच्या इतिहासात लिहिले आहे अल्लट दहाव्या शतकात होऊन गेला

गदेचा प्रघात कमी झाल्यावर भाल्याचा प्रघात वाढला असे दिसते भाल्यास सस्कृतात कुत तर राजपुताच्या भाषेत सागा असे म्हणतात गदेपेक्षा भाला हे लाबसडक, हलके व परिणामकारक शस्त्र असल्याने व घोड्यावर व पायदळ दोन्ही प्रकारे त्याचा उपयोग होऊ शकत असल्याने ते अधिक लोकप्रिय झाले असावे मराठ्याचे सुद्धा खरे आवडते शस्त्र म्हणजे भाला ढालतरवारीच्या मैदानी लढायाची सवय असलेल्या दिल्लीतील मोगलाना जेव्हा प्रथम १७१९ साली बाळाजी विश्वनाथाबरोबर गेलेल्या मराठ्याच्या जवळ भालेच भाले दिसले तेव्हा त्याना त्याचे परम आश्चर्य वाटले राणा प्रताप व त्याचा भाऊ शक्त उर्फ सगरजी याच्या आपापसातील कलहाचा परिणाम जेव्हा द्वद्वात झाला तेव्हा भाल्याचेच द्वद्व खेळण्यास ते तयार झाले होते हळदीघाटच्या सुप्रसिद्ध लढाईंत सेलीमच्या, अथवा काही लोक मानतात त्याप्रमाणे मानसिहाच्या, हत्तीच्या गडस्थलावर समोरील दोन पाय टेकून प्रतापचा पराक्रमी निळा घोडा चेतक उभा आहे व आपल्या हातातील लाब भाल्याची फेक प्रतापने मोठ्या वेगाने सेलीमच्या अगावर केली असून माहुताने चलाखी करून हत्ती वळविल्यामुळे ती चुकून अबारीच्या रुपेरी खाबात शिरली आहे असे राणा प्रतापचे चित्र सर्वांच्या परिचयाचे आहे भाल्याच्या सचालनामध्ये राणा प्रतापाइतका निपुण दुसरा कोणीच झाला नसेल त्याच्या भाल्याची फेक अगावर घेणे म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूसच निमत्रण देणे होय चपल चेतकवर बसून डावीउजवीकडे भाल्याच्या फेकी करीत प्रताप निघाला म्हणजे शत्रूचे सैन्य दुभग होऊन जाई व त्यामधून

चालणारा प्रताप विजेसारखा चमके एवच भाला हे शस्त्र राजपुतात अधिक लोकप्रिय असून ते खेळण्याचा त्याना चागला अभ्यास असे हत्तीचे गडस्थळ विदीर्ण करण्याइतकी जबरदस्त भाल्याची फेक त्याना मारता येत असे, असे–'कुतव्रातनिपातदीर्णहृदयास्तस्यावधीद्दतिन ।' यासारख्या वचनावरून म्हणता येते

**७. छुरिका व तरवार** प्रत्येक राजपूत व्यक्ति स्त्री अथवा पुरुष छुरिकेचा उपयोग जाणीत असे छुरिका म्हणजे कटचार उर्फ जबिया होय तरवारीचीच ही धाकटी आवृत्ति होय प्रत्येक राजपूत स्त्रीपुरुषाच्या कमरेस दुपट्ट्यात अथवा कमरबदात कटचार खोचून ठेवलेली असावयाचीच विशेषत स्त्रियाचे तर वैयक्तिक सरक्षणाचे हेच सर्वोत्तम शस्त्र होय छुरिकेच्या द्वद्वयुद्धाचा देखील प्रघात असे व तिचेही आघात–प्रत्याघातरूप खेळ चालत युद्धासारख्या ठिकाणी मात्र छुरिकेचा फारसा उपयोग होत नसे परतु एखादा शत्रु अगाच्या इतका लगट येऊन भिडला की, भाला अथवा तरवारीचा त्याच्यावर उपयोग करणे शक्य होत नसेल तर अशा प्रसगी छुरिकेचा वार त्याच्यावर करावा लागत असे 'त्याने भर युद्धात अबाप्रसादाचे छुरिकेनेच मुख विदीर्ण केले,' 'भिन्नमम्बाप्रसादस्य येन छुरिकया मुखम् ।' असे जे वर्णन आढळते ते अशाच प्रसगीचे होय

गदा व भाला याहीपेक्षा राजपुताचे युद्धातील आवडते शस्त्र म्हणजे कृपाण–खड्ग-उर्फ तरवार होय राजपुताना आपल्या तरवारीचा अत्यत अभिमान असे हमीरमदमर्दन नामक नाटकामध्ये वीरधवल म्हणतो–

प्रतिपार्थिवायुर्वायुकवलनप्रसर्पदसितसर्पायमाणकृपाणदर्पस्थितमस्मदमिलित मेदपाटपृथिवीललाटमडल जयमलम् ।

'प्रतिपक्षी राजाच्या आयुष्यरूपी वायूचे पान करण्यासाठी चालणाऱ्या कृष्णसर्पाप्रमाणे चपल अशा आपल्या तरवारीच्या अभिमानामुळे मेवाडचा राणा जयमल याने आमच्याबरोबर समेट केला नाही" राजपुतातील निरनिराळ्या वीर पुरुषाच्या तरवार चालविण्याच्या नैपुण्याची उदाहरणे विपुल प्रमाणात सापडतात जेव्हा सामतसिंहाने गुजराथच्या सैन्याचा पराजय केला तेव्हा धारावर्षाचा धाकटा भाऊ प्रल्हादन याने आपल्या तरवारीने गुजरातच्या राजाचे रक्षण केले—"श्रीगुर्जररक्षितिपतिपरक्षण-

दक्षिणासि ।", 'भयकर अशा तुर्कसेनारूप सागरात बुडालेल्या गुर्जर भूमीचा दष्ट्राकुराने आपल्या तरवारीच्या विलासाने क्षणात् उद्धार केला'—

"आद्य क्रोडवपु कृपाणविलसद्दष्ट्राकुरो य क्षणा-
न्मग्नामुद्धरति स्म गुर्ज्जरमहीमुच्चैस्तुरुष्कार्णवात् ।

'वैरिरूपी गजेद्राच्या गडस्थळाचा तरवाररूपी नखाने घात करणारा सिह' "बिभेद यो वैरिगजेद्रकुभस्थलीमनूना नखखड्गघातै ।", 'आपणास पत्नी-सारखी आवडती अशी तरवाररूपी लता त्याने हाताशी धरली'—"कृत्वा करे खड्गलता स्ववल्लभाम् ।", 'आपल्या तरवारीनी त्यानी यवनाचे स्कध फोडून काढले'—"यवनस्कधान्विभिद्यासिभि ।", 'आपल्या तरवारीच्या प्रभावाने त्याने सपूर्ण यवन जिकले व ठार मारून टाकले'—"असिप्रभावा-ज्जित्वा च हत्वा यवनानशेषान् ।", 'स्वसामर्थ्यावर विश्वासून त्याने आपल्या प्रसिद्ध तरवारीने युद्धामध्ये तमाम यवनाना फोडून काडले व यमसदनास पाठविले'—"भित्त्वातानखिलान्निहत्य च बलात्ख्यातासिना सगरे ।", 'ज्याने जगताचे सरक्षण करण्यास समर्थ असा कृपाण आपल्या हाती धारण केला होता'—"जगत्त्राणकृद्यस्य पाणौ कृपाण ।", 'आपल्या तरवारीने त्याने शत्रूचे समुदाय पळविले'—"असिप्रध्वस्तवैरिव्रजै ।", 'ज्याच्या महान तरवारीने शत्रु मरण पावले'—"महासिहतिभि ।", 'आपल्या हातातील कृपाण चालवून त्यानी वैरिगणाचा सहार केला'—"कर-कलित कृपाणैर्वैरिवृन्द निहत्य ।", 'आपल्या तरवाररूपी ओजळीने भरभरून शत्रुसैन्यरूपी सागर ज्याने प्राशन करून टाकला'—"अभोनिधि क्षोणीश पिबति स्म खड्गचुलुकै ।" इत्यादि प्रकारची राजपुताच्या तरवारी चालविण्याच्या कौशल्याची शेकडो उदाहरणे देता येतील हिदी काव्यातून राजपुताना सिरोही नामक तरवार फार प्रिय असल्याबद्दल वर्णन आढळते पण त्याच्या शस्त्रपूजनात खाडा उर्फ दुधारी तरवारीला महत्त्व देण्यात येते दुधारी तरवार चागली की वाकडी तरवार चागली हा अद्याप अनि-र्णीत वाद आहे सामान्यत आशिया खडातली राष्ट्रे वाकड्या तरवारीचा उपयोग करतात, तर युरोपीय राष्ट्रे दुधारी तरवारी वापरतात प्रशियन लोकाच्या हल्ल्याविरुद्ध स्वत चा बचाव करण्यासाठी फ्रान्सने दोन वेळा आपल्या तरवारीच्या पद्धतीत फरक करून पाहिला. बदुकाचा व दारू-

गोळ्याचा शोध लागेपर्यंत आशियातील वाकड्या तरवारी वापरणारे लोकच युरोपियन लोकावर जय मिळवीत गेले राजपूत, मराठे, शीख व मुसलमान ह्या सर्वांना वाकडी तरवार अधिक प्रिय आहे

**८. बाणवृष्टीचे कौशल्य.** ज्याप्रमाणे सनिकट युद्धात राजपूत लोक भाला अथवा तरवार याचा विशेष उपयोग करीत त्याचप्रमाणे लाबच्या युद्धात धनुष्यबाणाचा उपयोग करीत निशाणबाजीचे खेळ हे त्याचे आवडते खेळ होत बाण मारण्यात निष्णात असणाऱ्या अथवा आपल्या बाणाच्या प्रभावाने शत्रूचा नाश करणाऱ्या अनेक पुरुषाची वर्णने आढळतात उदाहरणार्थ,

शौर्यविलसद्दोर्दंडहेलोल्लस-
च्चापप्रोद्गतबाणवृष्टिशमितारातिप्रतापानल ।

‘शौर्याने ज्याच्या भुजा शोभायमान दिसत आहेत, ज्याने त्या भुजानी मोठ्या उल्हासपूर्वक धनुष्याचे आकर्षण करून बाणाची वृष्टि केली आहे व त्यामुळे शत्रूचा प्रतापरूपी अग्नि ज्याने थड करून टाकला आहे’

दीर्घान्दोलितबाहुदडविलसत्कोदडदडोल्लसद्-
बाणास्तान्विरचय्य मडलकर दुर्ग क्षणेनाजयत् ।

‘ज्याच्या दीर्घ बाहूमध्ये कोदड म्हणजे धनुष्य विलसते आहे व त्यावर बाणाची रचना करून त्यायोगे क्षणमात्रात ज्याने मडलकरचा दुर्ग काबीज केला’

ता कुभकर्णनृपतेरिह क सहेत
बाणावलीमसमसगरसचरिष्णो ।

‘सगरामध्ये विषम म्हणजे इतस्तत सचार करणाऱ्या त्या कुभकर्ण नृपतीने एकामागून एक मारलेले बाण कोण सहन करील?’ राणा कुभाला **‘चापगुरु’** अशी पदवी त्याच्या धनुर्विद्यानैपुण्याबद्दल मिळाली होती

राजपुतासारखे सुसस्कृत लोक तर धनुष्यबाणाचा नैपुण्याने उपयोग करीतच, पण त्याच्याबरोबरच राजस्थानचे मूळचे रहिवासी असे जे भिल्ल, मीना वगैरे जातीचे लोक त्याचे तर धनुष्यबाण हे एकमेव शस्त्र असून अत्यत नामाकित व बाके तिरदाज त्याच्यात सापडत असत प्रारभी

धनुष्यबाणाने व नतर बदुकाचा प्रघात सुरू झाल्यावर बदुकीने नेम मारणे हा राजपुताचा एक अत्यत आवडता खेळ असे स्विट्झर्लंडच्या इतिहासातील वुइल्यम टेलप्रमाणे आपल्या मुलाच्या डोक्यावर एखादे फळ ठेऊन त्याचा आपल्या बाणाने अचूक छेद करणे, आकाशात ऐन भरारीत असलेल्या ससाण्याचा नेम मारून वध करणे, चाकूच्या पात्यावर असलेल्या चेडवाचा वेध करणे, पाण्याने भरलेल्या मातीच्या घागरीत चेडू तरगत ठेऊन त्याचा घागरीस भेदून वेध करणे, यासारखी निशाणबाजीतील नैपुण्याची कामे करणारे अनेक शूर पुरुष राजपुतात सापडतील कित्येकाची तर अशी ख्याति असे की, त्यानी मारलेला बाण जमिनीत अथवा हेल्याच्या मानेत पखापर्यंत खोल घुसतो अशा प्रकारे अद्भुत शक्तीने अचूक शरसधान करणारे शेकडो लोक त्याच्यात असत महाराजा शिवदानसिहाच्या अद्भुत निशाणबाजीची वर वर्णन केल्याप्रमाणे जी कित्येक कामे टॉडने अवलोकन केली होती, ती त्याने आपल्या ग्रथात नमूद करून ठेवली आहेत

९ **पोहणे व घोड्यावर बसणे** वरील प्रकारच्या मर्दानी खेळाच्या बरोबरच पोहणे व घोड्यावर बसणे याचाही राजपुतास चागला शौक असे मोठमोठ्या तलावात या काठापासून त्या काठापर्यंत लीलेने पोहून जाणारे पट्टीचे लोक राजपुतात असत पण पोहण्यापेक्षाही घोड्यावर बसण्याची कला त्याना करतलामलकवत् झालेली होती किबहुना राजाची सर्व शक्ति म्हणजे त्याचे घोडेस्वाराचे सैन्य होय घोड्यावर बसण्याच्या अनेक कसरती करून दाखविण्यात राजपूत लोक पटाईत असत व आहेत राणा राजसिहाचा पुत्र भीमसिह हा घोड्यावर बसण्यात अत्यत निष्णात असे आणि भर धावत्या घोड्यावरून डोक्यावरील झाडाच्या फांदीस तो एकाएकी लोबकळू शकत असे व पुन्हा झाडावरून धावत्या घोड्यावर उडी घेत असे अखेरीस अशाच एका घोड्यावरील कसरतीने त्याचा प्राण गेला घोड्यावर बसून हातातल्या लाब भाल्याने धावत्या डुकराची शिकार करणे हा राजपुताचा एक आवडता खेळ होय व त्यामुळेच आज पोलो खेळण्यामध्ये राजपूत लोकच जास्त प्रमाणात पुढे येत असल्याचे दिसून येते ह्या शिकारीविषयी पुढे आहेरियाच्या उत्सवात सविस्तर वर्णन येणारच आहे

**१०. अहिंसेची मर्यादा.** युद्ध म्हटले की त्यात मनुष्याचे रक्त हे सांडणारच आणि युद्ध ही गोष्ट जर आतापर्यंत परिहार्य ठरू शकली नाही तर मनुष्याने मनुष्याचे रक्त सांडण्याची प्रथा बाह्यत कितीही निंद्य दिसत असली तरी तिचे निराकरण करणे शक्य होत नाही रक्त–रुधिर हे शब्द मोठे भयकर वाटतात विशेषत ह्या विसाव्या शतकात इग्रजी अमलाखाली रक्त सामान्य मनुष्याच्या दृष्टीस पडणे बद झाल्यापासून त्यास रक्त शब्दाचीहि भीति वाटू लागली आहे वास्तविक कोणा हिदूस असली भीति वाटू नये अशी हिदुधर्मशास्त्राची इच्छा आहे त्याने अहिंसेची आज्ञा प्रचलित करताना ‘ अहिंसनन्यत्र तीर्थेभ्य ’ म्हणजे शास्त्रविहित ठिकाणे सोडून अन्यत्र अहिंसेचे आचरण करावे अशी दक्षता बाळगली आहे ज्या ठिकाणी हिंसेस मोकळीक ठेवली आहे अशी शास्त्र-सिद्ध स्थाने कोणती ? जर एखादा मनुष्य आपला जीव घेण्यास, किंवा आपली कन्या, माता, भगिनी अथवा पत्नी याचेवर बलात्कार करण्यास, अथवा आपल्या घरास आग लावण्यास, अथवा आपले क्षेत्र किंवा वित्त हरण करण्यास हातात शस्त्र घेऊन सज्ज झाला तर असल्या आततायी माणसाची–मग तो गुरु, म्हातारा अथवा लहान बालक अथवा बहुश्रुत ब्राह्मण असला तरी त्याची उपेक्षा न करता त्यास एकदम ठार करावे अशी मनुस्मृतीत आज्ञा देऊन ठेवली आहे

**११. राजपुतांचा रुधिरपरिचय.** अशा तऱ्हेने सामान्य दृष्टचा-ही जर रक्तपाताच्या अभ्यासास धर्मशास्त्राने इतके उत्तेजन दिले आहे तर त्याच आधारावर विशिष्ट परिस्थितीत असलेल्या राजपूत राष्ट्राना या हिंसवादाच्या शिक्षणाची किती आवश्यकता भासली असेल? महमदी आक्रमणाच्या प्रचड प्रवाहात वाहता वाहता ब्रह्मावर्तातले आर्य राजस्था-नच्या आश्रयास लागले तेथेही सतत एक सहस्रक त्याना हा परकीय आक्रमणाचा आवेग सहन करावा लागला हिंसेच्याच एक भावनेने आपाद-तलमस्तक स्फुरण पावणारे शत्रु प्रतिक्षणी अगावर येत असताना त्याचा प्रतिकार करण्यासाठी तितक्याच सीमेची हिंसा करण्याचा अभ्यास राजपु-तानाही करणे भाग पडले असल्यास नवल नाही त्याच्या राष्ट्रीय आयुष्याचे ध्येयच रुधिराच्या गगेत स्नान करणे हे होऊन बसले सामाजिक,

राजकीय अथवा धार्मिक प्रत्येक प्रघाताची प्रतिष्ठापना रुधिरावर करण्या-शिवाय त्याना गत्यतरच उरले नाही त्यानी आपल्या ध्वजाचा वर्ण रुधिरवर्ण ठरविला धर्माच्या बाबतीत महादेव अथवा काली म्हणजे शिव–शिवानी याची उपासना त्यानी प्रचलित केली या दोन्ही देवता अत्यत रुधिरप्रिय असल्याचे प्रसिद्धच आहे त्याच्या उपासनेप्रीत्यर्थ भिन्नभिन्न पशूचे, विशेषतः मदोन्मत्त महिषाचे, बळी देण्याचा प्रघात पाडण्यात आला आणि मृगयेच्या रूपाने सामाजिक जीवनात रक्त वाहविणारा खेळ त्यानी निर्माण केला अशातऱ्हेने आयुष्याशी सबध येणाऱ्या प्रत्येक गोष्टीच्या योगे तरुणपिढीचा–देशातील सर्व स्त्रीपुरुषाचा–रुधिरपरिचय कसा वाढेल याचाच त्यानी विचार केला फार काय पण आपल्या शरीरातून रक्त काढून त्याचा टिळा कपाळी लावल्याने शपथविधि पूर्ण होतो अथवा राज्यारोहणसमारभ समाप्त होतो अशा रूढी प्रचलित होईपर्यंत सुद्धा मजल गेली दुसऱ्याच्या शरीरातले रक्त काढणे तसेच स्वशरीरातील रक्त काढविणे अथवा स्वत काढणे या दोन्ही गोष्टीचा मुद्दाम बाल्यापासून पूर्वाभ्यास केल्याशिवाय त्या ऐन वेळेवर साधू शकत नाहीत मागे राजपुताच्या मर्दानी खेळाचे विवरण वाचताना बहुतेक खेळ शस्त्राचे असत व आपसात खेळतानाही शस्त्राचे सामने ते करवीत हे वाचकाच्या ध्यानात आलेच असेल अर्थात हे खेळ म्हणजे केवळ लुटुपटीचे सामने नसून त्यात खेळाडूना शस्त्राचे वार लागत व त्यामुळे शरीरातून निघालेले रक्त डोळयाने पाहण्याची सवय त्याना होत असे

१२. **मृगयारंग–हिंसेच्या पाठशाला** प्रस्तुत स्थळी विवरणास घेण्याचा विषय म्हणजे राजपुताचा मृगयेचा खेळ व त्यावरच उभारलेला आहेरियाचा महोत्सव होय मृगया ही क्षत्रियास शास्त्राने आवश्यक सागितली आहे वर निरूपण केलेला हेतु मृगयेच्या मुळाशी आहे क्षत्रियाचा मृगयेचा खेळ होतो पण हरिण अथवा ससा या गरीब वन्य पशूचा मात्र त्यायोगे जीव जातो, त्याची निष्कारण हिसा होते, हा विचारच येथे उपपन्न होऊ शकत नाही मनुष्याने मनुष्य मारण्याच्या युद्धरूपी परीक्षेसाठी अभ्यासाच्या पाठशाला म्हणजे मृगयारग होत. त्यात मुद्दामच हिसा करावयाची असते–नव्हे हिसा शिकवावयाची असते

अद्याप वराह, वाघ अथवा सिंह याशी सामना करण्याइतक्या मोठ्या न झालेल्या बालकास आपली हिंसेची धुळाक्षरे ससे व हरिण याच्याच पाठी-वर गिरवावी लागतात त्याच्यावर न कचरता बेदरकारपणे प्रहार करण्याची सवय झाली म्हणजे कोल्हे अथवा लाडगे याच्या पाठशाला, नतर वराह, वाघ, सिंह याची विद्यालये व अखेरीस मनुष्यामनुष्यातील युद्धाची विश्वविद्यालये इतक्या अभ्यासक्रमातून वर चढणे अवश्य असते एकूणएक राजपूत राजे अथवा वीर किंबहुना प्रत्येक हाडाचा राजपूत यास मृगयेचे व्यसनच होते म्हटले तरी चालेल विदुरनीतीत क्षत्रियाना जडणाऱ्या व्यसनातच मृगयेचा समावेश केलेला आहे पण हे व्यसन इष्ट व्यसनापैकी असल्याने मृगया ही क्षत्रियाना आवश्यक सागितली आहे बहुतेक राजपूत राजाची वर्णने ते मोठे 'मृगयारसिक' होते अशी आढ-ळतात काही राजे मोठे मृगयाशील असून वाघसिंहासारख्या मृगाधि-राजाना ते वारवार ठार करीत 'मृगयाभिरता परे नरेशा । विनि-हन्ति प्रसभ मृगाधिराजान् ।' किंबहुना वन्य पशूचा नागरजनाना अथवा प्रजेला उपद्रव पोचू नये याबद्दल दक्षता ठेवणे आणि असल्या उपद्रवी जनावराचा निपात करणे हे राजाचे एक प्रधान कर्तव्य होय. राजपुतानी या कर्तव्यासच खेळात रूपातरित करून टाकले व ते प्रत्येक राजपूत तरुणाच्या सहज गळीं उतरविले शाकुतल नाटकात दुष्यत राजाचा सेनापति म्हणतो त्याप्रमाणे प्रत्येक राजपूत वीराचेही 'मिथ्यैव व्यसन वदन्ति मृगयामीदृग्विनोद कुत ।' असेच विचारणे असे

**१३. मृगयेचा श्रीगणेशा.** हा मृगयेचा खेळ राजपुतात अगदी लहानपणापासूनच सुरू होतो अगदी चार अथवा पाच वर्षांच्या चिमुकल्या वीराने आपल्या लहानशा बाणाने अथवा इवल्याशा तरवारीने एखाद्या हरिणाचा बच्चा अथवा ससा मारला म्हणजे राजपूत आईबापास जितका आनद होतो तितका दुसऱ्या कशानेही होत नाही ते तो दिवस मोठ्या सणावाराप्रमाणे पाळतात आपल्या आप्तेष्टाना व मित्रमडळीना भोजनास बोलावितात व प्रत्यक्षाच्या पाठशाळेत रक्ताच्या रगाने मृगयेच्या द्वारा हिंसेचा श्रीगणेशा प्रारभ करणाऱ्या त्या बालवीराच्या पगतीस बसवितात त्याने मारलेल्या हरिण शावकाच्या अथवा सशाच्या मासाचे पक्वान्न तयार

करून त्याचा प्रथम कुलदेवतेस नैवेद्य दाखवितात व प्रसाद म्हणून तो सर्वांना वाढण्यात येतो बाल राजपूतवीराने आपल्या हाताने मारलेल्या या प्रथम मृगाच्या पक्वान्नाची गोडी राजपूत स्त्रीपुरुषाना अवर्णनीय लागते अशा तऱ्हेने त्याच्या वीरतेचा गौरव करून ते त्यास पुढील उच्चतर हिंसेसाठी प्रोत्साहित करतात

**१४ शस्त्राची पारख व सगरजींची गोष्ट** मृगयेच्या निमित्ताने राजपूत बालकाचा शस्त्रसचालनाचा अभ्यास अगदी लहानपणीच सुरू होतो व तो करीत असता शरीरातून रक्त काढण्याची व ते डोळ्यानी पाहण्याची सहजच सवय लागते या बाबतीत राणा प्रतापसिहाचा धाकटा बधु शक्त उर्फ सगरजी याची बालपणीची एक आख्यायिका प्रसिद्ध आहे सगरजी चार किवा पाच वर्षांचा असेल एकदा काही तीक्ष्ण कटचारी धार पारखण्यासाठी म्हणून राजवाड्यात आणण्यात आल्या सगरजीची त्याच्यावर नजर पडली असता त्याची धार कशी पारखतात अशी त्याने पृच्छा केली त्यावर रुईचा एक पातळ थर जमिनीवर पसरून त्यावर वार केला असता जर तो बरोबर कापला गेला व त्याचे दोन तुकडे झाले तर धार चागली जमली असे समजतात असे त्यास सागण्यात आले परतु मनुष्य अथवा जनावर याना मारण्यासाठी योजिलेल्या कट्यारीची धार कापसावर का पारखतात याचे कोडे सगरजीच्या बालमनास सुटेना ज्या कामाकरिता ही शस्त्रे आहेत तेच का करून पाहू नये अशी शका त्याच्या मनात उत्पन्न झाली त्यासरशी "ह्या कटचारीची धार कशी आहे हे मी तुम्हास आता येथेच सागतो," असे म्हणून त्याने त्यातली एक कट्यार उचलून हाती घेतली व सर्व लोक पाहत असताना आपल्या तळहाताच्या मासल भागावर चालविली हातास खोल जखम होऊन तिच्यातून भळभळा रक्त वाहू लागले व त्यायोगे त्याचे सर्व कपडे भिजून लाल झाले तरी दु खाचा अथवा वेदनेचा अल्पमा देखील विकार मुद्रेवर न उमटता तो मोठ्या कौतुकाने म्हणाला, "हा, हिची धार मात्र उत्तम आहे" या एकाच उदाहरणावरून मृगयेच्या खेळाचा राजपूत बालकावर कसा परिणाम होत असे व त्याची रक्ताची भीति अजिबात नष्ट होऊन तितिक्षा कशी वाढत असे याची कल्पना येईल

**१५. आहेरियाचा महोत्सव.** मृगयेसाठीच राजपुतानी आहेरिया नामक उत्सव राखून ठेवला आहे वसतागम होऊन वृक्षाना पालवी फुटली, हवेतील कडक थडी नाहीशी झाली, वनश्रीबरोबरच प्राणिमात्राची अत करणेही फुलली, म्हणजे हा उत्सव सुरू होतो वसत हा सर्व ऋतूचा राजा होय त्याच्या प्रभावाने एरव्ही वर्षभराची मुकी कोकिळा देखील मधुर गान करू लागते सर्व ऋतून वसतच श्रेष्ठ होय असे भगवतानेच गीतेत म्हटले आहे आणि या सर्व गोष्टीमुळे वसतापासूनच नववर्षारभ धरण्याची हिंदु समाजात चाल आहे राजपुताना वसताचे हे महत्त्व नुसते कबूल होते एवढेच नव्हे तर त्याना वसताचे वेड होते म्हटले तरी चालेल. वसतागमासारख्या शुभ व प्रसन्न कालात त्याना अत्यत आवडती अशी जी मृगया तिचा प्रारभ करण्याचा उत्सव त्यानी ठरविला यात त्याचे सर्वतोपरीने औचित्यच दिसून येते मेवाडचा राणा व अन्य राजेमहाराजे आपल्या पुरोहिताकडून मुहूर्त पाहवून एक चागला शुभ दिवस ठरवितात व त्या दिवशी आपल्या सर्व परिवारासह ते मुद्दाम राखून ठेवलेल्या जगलात शिकारीस जातात ह्या शिकारीस ते मुहूर्ताची शिकार असे म्हणतात. ह्या दिवशी ज्या मानाने शिकारीस शुभ अथवा अशुभ प्रारभ होईल त्या मानाने पुढील सबध वर्ष शुभ किंवा अशुभ जाणार याचा ते निर्णय करतात म्हणून अगातील सर्व शक्तीने व शौर्याने या मुहूर्ताच्या दिवशीं आपली शिकार साधण्याचा ते प्रयत्न करतात

येणेप्रमाणे आहेरियाचा मुहूर्त ठरला म्हणजे राजपूत राजे आपल्या निमत्रित सरदारासह व त्याच्या सैन्यासह शिकारीस जातात ह्या प्रसगी ते बसती वर्णाचा पोषाख परिधान करून आपापल्या खास पसतीच्या घोड्यावर स्वार झालेले असतात लहानमोठे सर्व राजपूत आपापल्या शस्त्रास्त्रानी सुसज्जित होऊन स्वारीबरोबर असतात प्रत्येक राजपुताची धाडस व पराक्रम यात आजच्या दिवशी दुसऱ्यास मागे टाकण्याची महत्त्वाकाक्षा असते आहेरियाच्या शिकारीचा मृग म्हणजे वराह होय खरे पाहिले असता वराहाइतकी दुसरी कशाचीही शिकार राजपुताना प्रिय नाही अशा तऱ्हेने ही मडळी एकदा जगलात पोचली म्हणजे रान उठविण्यात येते आणि तदनतर प्रत्येक जण सूर्यप्रकाशात विशेष तळपणारा

असा आपला भाला सरसावून तयार राहतो शिकाऱ्याच्या हाक्यामुळे उठून कावऱ्याबावऱ्या व भयकर मुद्रेने इतस्तत पळू लागलेल्या वराहाच्या पाठीवर प्रत्येकजण आपापला घोडा भरधाव वेगाने सोडतो एकदा एखाद्या वराहाचा एखाद्या राजपुताने पिच्छा घेतला म्हणजे त्यास पुरा ठार केल्याशिवाय तो सोडतच नाही त्याकरिता अनेक दऱ्याखोऱ्या, नद्यानाले व चढउतार ओलाडीत निबिड झाडीतून दिवसभर त्याच्या मागे पळावे लागले तरी हरकत नाही, पण वराह मारलाच पाहिजे आहेरियाच्या दिवशी ज्या बेफामपणाने राजपूत वीर आपल्या मृगाचा पाठलाग करतात तो अवर्णनीय असतो शेकडो मृग राजपूत वीराच्या मृगयातृष्णेस बळी पडतात व सबध रानात रक्ताचा व मासाचा नुसता चिखल होऊन जातो आहेरियाच्या दिवशी उसळलेले बेफाम वराह देखील आपला घात करणाऱ्यावर तीव्रतेने उलटून पडतात व कित्येक वीरास जखमी करून तर कित्येकास मृत्युपथास लावून ते पुन दऱ्याखोऱ्याचा सुरक्षित मार्ग आक्रमू लागतात पण अशा तऱ्हेने कित्येकाना घायाळ करून जाणाऱ्या वराहास बाकीचे लोक थोडेच निमूटपणे जाऊ देतील ? त्याच्या सुळ्याखाली आपल्या घोड्याची मान देऊन देखील ते त्यावर भाल्याचा नेम मारतातच आणि एकदा अशा त्वेषाने मारलेला भाला वराहाच्या पाठीतून निघून जमिनीपर्यंत पोचल्याविना राहत नाही एकाच मृगावर आघात करताना त्याने झुकाडी दिल्यामुळे परस्परवीराचे प्रहार परस्पराना लागतात व त्यामुळेही कित्येक प्रसगी ते जखमी होतात राजपुताचे त्या दिवशीचे ते साहस व शौर्य पाहून इग्रज शिकारी सुद्धा तोडात बोटे घातल्याविना राहणार नाहीत असे टॉडने म्हटले आहे ह्या आहेरियाच्या प्रसगाने अनेकाचे हातपाय तुटले आहेत, अनेकाचे डोळे फुटले आहेत, अनेकाना कायमची व्यग्ये झाली आहेत व अनेकाचे प्राणही गेले आहेत तरी राजपूत ही प्रथा सोडण्यास तयार झाले नाहीत कारण तरुण पिढीच्या भावी शौर्याची सर्व बीजे ह्यातच साठविली आहेत आपल्या देहावर पूर्ण अनासक्ति ठेवून अगीकृत कार्य पार पाडण्याची व त्याकरिता कोणतीही आपत्ति सहन करण्याची तयारी करण्याचे शिक्षण त्यामुळे त्यास अनायासे प्राप्त होते

सकटाच्या भट्टीतून देशाची सबध तरुण पिढी एकदा ताऊन सुलाखून काढली जाते व त्यामुळे त्याच्या शौर्याचे, सहिष्णुतेचे, नि स्वार्थीपणाचे व साहसाचे सुवर्ण अधिकाधिक कातवर्ण होऊन उज्ज्वलप्रभ दिसू लागते

अगावर जखमा बाळगणे ही राजपूत लोक मोठया गौरवाची गोष्ट समजतात कामवेलप्रमाणेच त्याचीही अशी ठाम समजूत आहे की, मनुष्याचे सौदर्य त्याच्या बाह्य रगारूपावर निर्भर नसून त्याच्या साद्‌गुण्यावर, निर्भयतेवर व पराक्रमावर अवलबून असते त्यामुळे अशा प्रकारे होणाऱ्या शारीरिक विद्रूपतेचा त्याच्या सौदर्याची हानि करण्यामध्ये कोणताही परिणाम होत नाही उलट त्यामुळे ते अधिक खुलून दिसते राजपूत रमणीही ह्या आहेरियाच्या महोत्सवास जातीने हजर असतात व त्या प्रसगी जो तरुण सर्वांत अधिक साहस व शौर्य प्रकट करील अथवा अद्‌भुत कर्म करून दाखवील त्याच्यावरच राजपूत कुमारिका प्रम करू लागतात आहेरियाची राने म्हणजे ज्याप्रमाणे पराक्रमाच्या शाळा होत व हिसाधर्माच्या शिक्षणाचा ओनामा त्यात गिरविण्यात येतो, त्याचप्रमाणे व्यक्तपराक्रम तरुणावर अनुरक्त होणाऱ्या तरुणींची तीच प्रेममदिरेही होत व तेथेच आपले प्रेमाकर्षण त्या सुरू करतात ह्यात शका नाही आहेरियाच्या दिवशी केवळ पुरुषच आपले बाहुवीर्य दाखवू शकतात अथवा दाखवितात असे नाही तर धाडशी तरुणीही आपल्या रक्ताचे तेज व तारुण्याचे ओज पुरुषाच्या प्रत्ययास आणतात व अशा तऱ्हेने समानशील व समानव्यसन तरुणतरुणींच्या सख्याच्या जन्माच्या गाठीही आहेरियाच्या उत्सवातच बाधण्यात येतात

आहेरियाची शिकार ही गौरीच्या म्हणजे शिवानीच्या तुष्टीकरिता करण्यात येते वराहाचा नैवेद्य गौरीस फार आवडतो म्हणून राजपुतानाही त्याचा प्रसाद फार प्रिय आहे वरीलप्रमाणे राजाने अथवा राजपुत्राने मारलेल्या वराहाचे मास त्यानतर शिजविण्यात येते आणि त्याचा प्रथम गौरीस नैवेद्य दाखवून नतर सर्व मडळी त्या पक्वान्नावर यथेच्छ ताव मारतात दिवसभराच्या मृगयेच्या श्रमाने थकलेभागलेले ते वीर गौरीचा तो प्रसाद भक्षण करून ताजेतवाने झाल्यावर क्षणभर विश्राति घेऊन व श्रमपरिहारार्थ प्रेमाच्या व आनदाच्या गप्पागोष्टी बोलून सायकाळी आपापल्या घरी परत येतात त्यानतर कित्येक दिवस आहेरियाच्या दिवशी ज्यानी

ज्यानी अद्‌भुत वीर्य व्यक्त केले असेल त्याच्या त्याच्या प्रशसेचे पोवाडे सर्वत्र गाण्यात येतात अशा तऱ्हेने या आहेरियाच्या महोत्सवाने राज-पूताच्या ठिकाणची रुधिरप्रियता व युयुत्सा कायम टिकविली व त्याना उत्तम प्रतीचे लढवय्ये बनविले

**१६. वसंतोत्सव.** वास्तविक पाहता सामान्य हिदूचे जे सण-समारभ तेच राजपुताचेही असावयास पाहिजेत व आहेतही परतु देशकाल-परत्वे एकाच धर्मांत भिन्नभिन्न रीतिरिवाज अथवा सणसमारभ उत्पन्न होऊ शकतात तसेच एकाच हिदू समाजाच्या राजपूत, बगाली, महाराष्ट्रीय अथवा गुजराथी शाखामध्ये त्याचे त्याचे असे काही विशेष आहेतच राजपूत समाजात तर विशेषत हे सणसमारभ इतके विपुल आहेत की, त्याच्याच भाषेत बोलावयाचे म्हणजे 'सात वार और नौ त्यौहार' अशी म्हणच पडून गेली आहे तथापि त्यातील काही वैशिष्ट्यदर्शक गोष्टीच येथे देण्याचे योजिले आहे वसतागमाच्या शुभकाली देशातील तरुण पिढीच्या ठिकाणी युयुत्सावृत्तीचा प्रादुर्भाव करण्यासाठी म्हणून मृगयेचा 'आहेरिया' नामक जो उत्सव राजपुतामध्ये विद्यमान आहे तो अशा विशिष्ट उत्सवापैकीच असून त्याचे वर्णन मागे आलेच आहे त्याचा वसतकालचाच दुसरा उत्सव म्हणजे वसतोत्सव होय

वसतोत्सव हा सर्वसामान्य हिदुसमाजात आहे. पण राजपुतान्यात ज्या विराट स्वरूपात तो साजरा केला जातो तसा अन्यत्र क्वचितच होत असेल व होत असेल तर तो राजपुताच्या सपर्कानेच राजस्थानात हा वसतोत्सव बरोबर वसतपचमीस सुरू होतो आणि पुढे चाळीस दिवस चालतो राजपुतात जानपदाचे माहात्म्य किती प्रबळ होते व लोकशाहीचे तत्त्व कसे विकास पावत चालले होते याची या उत्सवावरून कल्पना करता येण्यासारखी आहे कारण अत्यत गरिबापासून तो अत्यत श्रीमता-पर्यंत सर्व प्रकारचे लोक या उत्सवामध्ये समान भावाने भाग घेऊ शकतात 'सगच्छध्व सवदध्व स वो मनासि जानताम्' हा वैदिक मत्र या उत्सवात अगदी चरितार्थ करून दाखविला जातो लहान-मोठा, गरीब-श्रीमत, ग्रामीण-नागरिक, राव-रक, धनी-चाकर इत्यादि सर्व प्रकारचे भेदभाव बाजूस सारून सर्व लोक एकमेकात मिसळतात निरनिराळ्या प्रकारची

चित्रविचित्र व रगीबेरगी वस्त्रे परिधान करून हिंडण्यात त्याना मोठी मौज वाटते आनद, खुषी, चैन, विलास याची जितकी म्हणून साधने असतील त्या सर्वांचा सर्व लोक अभेदरूपाने मनमुराद उपभोग घेतात. वाणी व करणी याचे प्रवाह या उत्सवात स्वच्छदपणे वाहत असतात मादक पदार्थांचाही मनमुराद उपयोग करण्यात येतो अत्यत श्रीमत समाजातील लोकही अगदी सामान्य ग्रामीणाबरोबर खजेऱ्या व ढोल वाजवीत टोळीने बाहेर पडतात आणि कामदेवाच्या शक्तीची स्तुतिस्तोत्रे गाणारी अत्यत बहारदार वर्णनाची गाणी म्हणत राजमार्गाने भ्रमण करतात त्याची गीते बाह्यत अत्यत ग्राम्य दिसत असली तरी त्यातही अत्यत यथार्थ असे सृष्टि-वर्णन असते मानवी हृदयाच्या अत्यत आनदमय सवेदनाचे श्रुतिमनोहर भाव त्यात भरलेले असतात यात शका नाही वसताच्या आगमनाने निखिल सृष्टजातीत उत्पन्न होणारी प्रफुल्लता मानवी मनालाही प्रमुदित करते व त्यामुळे मनुष्य स्वच्छद विहार करू लागतो गाणे-नाचणे-खेळणे-उडणे-बागडणे इत्यादि गोष्टी अशा स्वच्छद मोदमय अवस्थेतच मनुष्याला सुचतात वसतोत्सवामध्ये राजपुताच्या ठिकाणी ही स्वच्छदता पूर्णतेस पोचलेली दिसून येते परतु प्रत्येक स्वच्छद मनुष्य दुसऱ्याच्या स्वच्छदतेचा अथवा स्वातत्र्याचाही तितकाच आदर करीत असल्याने रावापासून रकापर्यंत सर्व लोक या उत्सवात सामील होतात. उच्चनीच भाव पार मावळलेला असतो इतका की, एरव्ही आपल्या गुहा सोडून सहसा नगरवासीयात न मिसळणारे वनौकस भिल्ल, मीर, मीना इत्यादि जगली जातीच्या लोकाच्या मन सागरास देखील सृष्टीच्या या प्रसन्न वसत-चद्राच्या दर्शनाने भरती येते व ते आपापली मर्यादा सोडून विनिर्मुक्त वृत्तीने शहरात येऊन या उत्सवात सामील होतात आणि मोगरा व चमेलीच्या फुलाच्या माळा गळयात घालून अथवा तुरे पगडीत खोचून नैसर्गिक आनदाने नाचणाऱ्या व गाणाराच्या कल्लोळात एकरूप होतात

**१७. भानुसप्तमीचा उत्सव व सूर्याची उपासना.** वासती ही निसर्गाची देवता असल्याने तिची ह्या चाळीस दिवसात शक्य तितक्या सर्व मार्गांनी उपासना करण्यात येते रथसप्तमीच्या दिवशी उदयपूरच्या राण्याची त्याच्या सरदारदरकदारासह राजवाड्यापासून तो सूर्यमदिरा-

पर्यंत मोठी मिरवणूक निघते व सूर्यदेवतेची पूजा अर्चा झाल्यावर ती समाप्त होते. जयपूर दरबारात सूर्याच्या रथाची आठ घोडे जुपून मिरवणूक काढण्यात येते. रथसप्तमीस राजपूत लोक भानुसप्तमी म्हणतात. रघुवशाचे आद्य कुलदैवत या नात्याने—(कारण उदयपुरचे राजे लवाच्या वशापासून व जयपूरचे राजे कुशाच्या वशापासून आपली उत्पत्ति सिद्ध करतात)— सूर्योपासनेचे राजपुतात फार महत्त्व आहे वसतऋतूमध्ये निसर्गत च सर्व सृष्टि आनदमय असताना आपल्या कुलदेवतेची उपासना सूर्यवशी राजे साधून घेतात राजपूत वीराची सगळयात मोठी आयुष्यातील महत्त्वाकाक्षा म्हणजे मेल्यावर सूर्यलोकास जाऊन पोचण्याची होय महाभारतात म्हटल्याप्रमाणे—

> द्वाविमौ पुरुषव्याघ्र सूर्यमडलभेदिनौ ।
> परिव्राड् योगयुक्तश्च रणेचाभिमुखो हत ।।

'योगयुक्त असा सन्यासी अथवा रणागणात शत्रूस पाठ न दाखविता मृत्यु पावलेला वीर हे दोघेच सूर्यमडलाप्रत प्राप्त होतात' अशी त्याची धारणा असल्याने प्रत्येक जण रणागणात लढत असताना मरून सूर्यलोकास जाण्याची महत्वाकाक्षा बाळगीत असतो 'सूर्यपोळ'—शहरात प्रवेश करण्याचा प्रमुख दरवाजा, 'सूर्यमहाल'—राजवाड्यातील प्रमुख दिवाणखाना, 'सूर्यगोपुर' —राजवाड्यावरील सर्वात उच गोपुर, या व्यवहारातल्या महत्त्वाच्या भागाना त्यानी दिलेल्या सूर्याच्या नावावरूनही राजपुताच्या सूर्योपासनाप्रियतेची कल्पना येते रुधिरप्रियतेमुळे राजपुताच्या ध्वजाचा रग रक्ताचा म्हणजे ताबडा लाल आहे तर सूर्योपासनेमुळे त्या उषेसारख्या ताबड्या क्षितिजावर उन्मेष पावणाऱ्या बालरवीचे बिब त्यानी अकित करून ठेवले आहे सूर्य ही निसर्गांतील सर्वांत मोठी देवता होय सूर्याच्या कृपेनेच सृष्टीच्या ठिकाणी प्रफुल्लता येते व वसताचा आगम होतो, म्हणून राजपुताच्या वसतोत्सवामध्ये एका बाजूस वासतीचे म्हणजे निसर्गदेवतेचे स्वच्छद पूजन समाविष्ट केलेले आहे तर दुसऱ्या बाजूस सूर्याची स्फूर्तिप्रद उपासना अतर्भूत केली आहे

१८. **फाग.** चाळीस दिवसाच्या वसतोत्सवात वासतीची म्हणजे निसर्गदेवतेची स्वच्छद उपासना व सूर्यपूजन याबरोबर तसे पाहिले तर

आहेरियाचाही समावेश होतो पण त्याचे स्वतंत्र महत्त्व असल्याने प्रारंभीच वेगळे वर्णन केले आहे त्याचप्रमाणे 'फाग'चाही वसंतोत्सवातच अंतर्भाव होऊ शकतो पण त्याचेही त्याच न्यायाने पृथक् विवरण करण्याची आवश्यकता आहे

नूतन वसंताचे लोक मोठ्या उल्लासाने स्वागत करतात न करतात तोच फाल्गुन लागतो राजस्थानचे पंचांग व महाराष्ट्रीय पंचांग यांत पंधरा दिवसांचा फरक आहे आपला महिना शुद्ध प्रतिपदेपासून सुरू होतो तर त्यांचा वद्य प्रतिपदेपासून—त्यामुळे आपल्या पंधरा दिवस अगोदर त्यांचा नवीन महिना सुरू होतो उदाहरणार्थ, आपल्या पंचांगाप्रमाणे माघ वद्य प्रतिपदेपासून त्यांचा फाल्गुन सुरू होतो व आपल्या फाल्गुन वद्य प्रतिपदेपासून त्यांचा चैत्र सुरू होतो अर्थात् वसंतपंचमी ही आपल्या पंचांगाप्रमाणे माघ शुद्ध पंचमीस व त्यांच्या पंचांगाप्रमाणे फाल्गुन लागण्यापूर्वी दहा दिवस येत असल्यामुळे वसंतोत्सव माघातील दहा दिवस व फाल्गुनातील तीस दिवस मिळून एकंदर चाळीस दिवस चालतो अर्थात वसंतपंचमीपासून नववसंताचे स्वागत करणारे लोक ८–१० दिवस आनंद करतात न करतात तोच फाल्गुन सुरू असल्याने व 'फाग' हाही त्यांचा आवडता उत्सव असल्याने त्यांच्या आनंदात भरच पडते नववसंतागमनाने उन्मेष पावणारी त्यांची आनंदकलिका फागात पूर्ण विकास पावते

फाग लागल्यानंतर गाण्याबजावण्यात रंगगुलालाची अधिक भर पडू लागते रस्तोरस्ती सर्व प्रकारच्या लोकांचे तांडेच्या तांडे एकमेकांच्या अंगावर रंगगुलाल उधळीत फिरत असतात निरनिराळ्या रंगाच्या पिचकाऱ्या भरून एकमेकांवर उडविण्यात येतात हा रंगगुलाल सारखा महिनाभर चाललेला असतो तरी फाल्गुन शुद्ध अष्टमीस विशेष फाग मानला जातो त्या दिवशी राजपूत राजे आपल्या अंतःपुरात मनमोकळेपणे आपल्या राण्या व उपपत्न्या यांच्यात मिसळतात व अत्यंत स्वच्छंदपणे रंगगुलाल खेळतात

पण अष्टमीच्या फागापेक्षाही पौर्णिमेची होळी फारच मनोवेधक होते राजदरबारचे नगारे मोठमोठ्याने वाजू लागले की, सर्व सरदार जहागिरदार आपापले आवडते पोषाख घालून व घोड्यावर बसून राज-

वाड्याच्या समोर जमा होतात प्रत्येक सरदार आपल्याबरोबर रग मारण्याची पिचकारी, रगाने भरलेली मोठमोठी भाडी व गुलालाची तबके आणीत असतो. एकदा सर्व लोक जमा झाले म्हणजे घोड्यावरून रगगुलाल खेळण्यास प्रारभ होतो युद्धात अथवा शिकारीत ज्या चापल्याने अथवा कौशल्याने त्याना अश्वमचालन करावे लागते तशाच तऱ्हेची घोड्यावर बसण्याची सफाई याही प्रसगी त्याना दाखवावी लागते आणि अशा प्रकार-च्या धावत्या घोड्यावरून एकमेकाच्या अगावर एकमेकानी बिनचूक पिचकाऱ्या मारणे व दुसऱ्यानी मारलेल्या चुकविणे असा खेळ ते खेळतात विशेपत उदयपूरला या होळीच्या दिवशी घोड्यावरून रग खेळण्याची फारच बहार असते मराठ्याच्या उत्कर्षाच्या काळात थोरले माधवराव व सवाई माधवराव पेशव्याच्या अमदानीत जे नामाकित रग-पचमीचे उत्सव पुण्यास झाले त्याचे स्मरण वरील वर्णन वाचले असता झाल्याशिवाय राहत नाही अशा तऱ्हेने घोड्यावरून रग खेळून झाल्यावर उदयपुरास राणाजीसह सर्व मडळी तशीच मिरवणुकीत घोड्यावरून रगशाळेकडे जातात ही रगशाळा म्हणजे चारी बाजूनी मोकळा असलेला असा एक विस्तीर्ण दिवाणखानाच समजावा त्या ठिकाणी बसून एक तासभर होळीची गाणी गाण्यात येतात त्यातही पूर्व पराक्रमी पुरुषाची स्मृति जागृत करण्यात येतेच ही गाण्याची बैठक सुरू असतानाच चित्र-विचित्र पोषाख केलेल्या विदूषकी तमासगिराची टोळी येऊन मध्येच घुसते व पुन रगगुलाल उधळण्यास प्रारभ होतो

यापमाणे रगगुलाल झाल्यावर उदयपुरास सर्व सरदाराना राणाजी-कडे मेजवानी देण्यात येते व तिच्या अती प्रत्येकास दरबारतर्फे एकेक खाडा व नारळ याचा अहेर करण्यात येतो रात्रीच्या वेळी देशभर सर्वत्र मोठमोठ्या होळ्या पेटविण्यात येतात आणि त्याभोवती सर्व आबालवृद्ध नागरिक जमून आपल्या इकडच्या प्रमाणेच त्या होळीवर गुलाल इत्यादि उधळून तिची पूजा करतात ती सबध रात्र होळीजवळ बसून गाणी म्हणून घालविण्यात येते मुले उड्या मारून आनदाने नाचत असतात यापमाणे बरोबर चाळीस दिवस अत्यत आनदाचा व जानपदमाहात्म्याचा असा हा

उत्सव करून राजपूत होळीच्या दुसऱ्या दिवशी पुन अत्यत गभीरपणे आपल्या पूर्वव्यवसायास प्रारभ करतो

१९. **स्त्रियाचे अन्नपूर्णादर्शन** याप्रमाणे पुरुषाचा वसत सपला की, लगेच स्त्रियाचा सुरू होतो असे म्हणण्यास हरकत नाही कारण सबध चैत्रभर राजपूत स्त्रियाचे सण–उत्सव सुरू असतात आहेरियाच्या, वसताच्या व फागाच्या निमित्ताने पुरुषाना मनमुराद आनद उपभोगलेला असतो पुरुषाच्या इतक्याच, किबहुना 'काकण'भर अधिकच स्त्रियाही उत्सवप्रिय असल्याने सृष्टीच्या नैसर्गिक प्रसन्नावस्थेत आपलेही उत्सव साजरे व्हावेत अशी त्याची इच्छा असणे स्वाभाविक आहे स्त्रीस्वातत्र्यप्रिय राजपूत समाजाने त्याची ही इच्छा चैत्रातील गौरीच्या समारभाने परिपूर्ण केली आहे सामान्यत राजपूत समाजात कर्पूरगौर उर्फ शकर ही पुरुषाची आराध्यदेवता व गौरी उर्फ पार्वती ही स्त्रियाची आराध्यदेवता होय राजपूत स्त्रियाची गौरी ही वास्तविक पाहता एका हातात कमल व दुसऱ्या हातात शख धारण करणारी आहे प्राणिमात्राच्या ठिकाणी गौरी हीच जीवनकुसुम प्रफुल्ल करते व तिच्या हातातील सरोजाप्रमाणेच प्रत्येकाने आपले जीवन सदैव ताजेतवाने, रसभरित व विकसित ठेवावे असा भाव तिच्या कमलावरून सूचित होतो आणि अशा तऱ्हेचे मोदमय जीवन व्यतीत करीत असताना भौतिक अथवा दैवी कोणतीही आपत्ति मनुष्यावर कोसळली तरी त्याने तिशी सदैव लढण्यास सज्ज असावे व आपल्या धवल यशाचा निनाद सर्वत्र पसरत रहावे असे शख–युद्धास आवाहन करणारे व कीर्तिप्रसाराचे द्योतक असे वाद्य–ध्वनित करतो परतु चैत्रात राजपूत रमणी ज्या गौरीची उपासना करतात तिचे स्वरूप अशा प्रकारचे जीवनमरणात्मक नसून जीवमात्राचे पोषण करणाऱ्या अशा सदापूर्ण अन्नपूर्णेचे आहे हे ध्यानात ठेवले पाहिजे

ह्या अन्नपूर्णेचे दर्शन घेऊन आनद करण्याकरिता शेतातील पिके पिकू लागली असता, सृष्टिमातेने उत्कृष्ट हगामाचा शालू परिधान केला असता, आणि लता, फुले व फले यानी वनेउपवने सुशोभित झाली असता ग्रामातील व नगरातील सर्व स्त्रिया सघासघाने एखाद्या सुदरशा उपवनात अथवा वनात जातात त्या ठिकाणी प्राणिमात्रास पोषण देणाऱ्या

अन्नपूर्णेचे भाडार डोळे भरून अवलोकन करतात निरनिराळ्या फुलांच्या माळा व गजरे इत्यादि आभूषणे तयार करून एकमेकीच्या अगावर घालतात आणि मोठ्या सोल्लास आनदाने झाडाना झोपाळे बाधून त्यावर बसतात व झोके घेण्यात व श्रुतिमनोहर अशी मधुर गाणी म्हणण्यात तासचे तास घालवितात ह्या गोष्टीमुळे--

वृक्षस्कधी बाधुनी लाब दोले घेती नारी बैसुनी तेथ झोले।
ओव्या गानी स्वप्रियाते बहाती क्रीडायाते, लोक लीला पहाती ।।

ह्या जुन्या मराठी चौथीच्या पुस्तकातील वसतऋतूच्या वर्णनातील मार्मिकपणा कोणाच्या लक्षात भरणार नाही ? अशा तऱ्हेने झोके घेऊन व गीते गाऊन थकल्या म्हणजे राजपूत रमणी तेथेच थोडा उपाहार करून प्रसन्न चित्ताने आपापल्या घरी परत येतात

**२० गौरीपूजन** ह्यानतर एके दिवशी सर्वजणी ग्रामाबाहेर जाऊन शेतातील माती घेऊन येतात ह्या मातीच्या गौरीच्या प्रतिमा करण्यात येऊन त्याची प्रतिष्ठापना करण्यात येते त्याच्या शेजारीच काळ्या मातीत धान्यबीजे लावण्यात येतात त्याना अकुर फुटून मोठे झाले म्हणजे त्याच्या सभोवार मेळा करून व हातात हात घालून स्त्रिया फेऱ्या घालतात व गौरीच्या स्तवनाची गाणी म्हणतात नतर ते नवीन धान्याकुर आपल्या इकडील दसऱ्याप्रमाणे राजपूत स्त्रिया पुरुषाना वाटतात व पुरुषही त्याचे तुरे आपल्या पगडीत खोचून मोठ्या अभिमानाने मिरवतात ह्या सर्व समारभात स्त्रिया गौरीची स्तुतिस्तोत्रे गात असतात व गौरीने आपल्या पतीचे कल्याण करावे, त्यास दीर्घायुष्य व अनामय काया प्रदान करावी, व आपल्यासही अखड सौभाग्य द्यावे अशी प्रार्थना करून गौरीचा आशीर्वाद मागत असतात

हा गौरीपूजनाचा सभारभही उदयपुरास विशेष प्रेक्षणीय होतो अखेरच्या दिवशी गौरीची मिरवणूक काढण्यात येते पुरुषवर्ग आपापल्या सौधावर उभे राहून ती पहात असतो मिरवणूक उदयपूर शहराबाहेर तलावापर्यंत जाते तेथे मेवाडचा राणा, आपल्या सरदार व सैन्यासह अगोदरच जाऊन बसलेला असतो मिरवणूक तलावाच्या काठी आल्याबरोबर ते सर्वजण एकदम उभे राहून गौरीस उत्थापनपूर्वक अभिवदन करतात व

तलावातील आपापल्या नौकात जाऊन बसतात हाच राजपूत रमणीच्या स्वातत्र्याचा मोठा गौरव होय महाराणा व त्याचे सरदार इत्यादि मडळी त्या प्रशात सारसाच्या पृष्ठभागी नौकात बसली आहेत, शहरातील हजारो पुरुष लाब अतरावर उभे राहून मोठ्या कौतुकाने व गाभीर्याने समारभ अवलोकन करीत आहेत, आणि सर्व स्त्रिया प्रेमभराने गौरीच्या प्रतिमाच्या सभोवार निरनिराळी मडले करून व तालबद्ध टाळचा वाजवून फेरे धरीत आहेत व गाणी म्हणत आहेत, हे दृश्य मोठे नयनाभिराम आहे यात शका नाही गुजराथी लोकात सभावित घराण्यातील स्त्रियाही नवरात्रात गरब्याचे नृत्य ज्या गभीर व सुदर रीतीने करीत असतात त्याच पद्धतीने राजपूत रमणीही निरनिराळ्या शारीरिक कसरती करून व ठराविक तालावर टाळ्या वाजवून पावले टाकीत फेरे घालीत असतात ह्या प्रसगी त्या जी गाणी म्हणतात त्यात गौरीची स्तुति व तिचे अन्नपूर्णास्वरूप, प्रेम, शौर्य, राष्ट्रीय गौरवाचे प्रसग, इत्यादि विषयाची वर्णने भरलेली असतात सर्वस्वी स्त्रियाच्या या उत्सवात एकही पुरुष मिसळलेला नसतो इतकेच काय, पण गौरीच्या पुढे शिवाच्या अथवा ईश्वराच्या प्रतिमेची सुद्धा मातब्बरी ठेवण्यात येत नाही अशा प्रकारची शेकडो स्त्रीमडळे सरोवराच्या काठावर गौरीच्या प्रतिमासभोवार नृत्य करीत असतात व महाराणा व त्याचे सरदार काठाकाठाने आपल्या नौका हाकारून सर्व दृश्य कुतूहलाने अवलोकन करीत असतात अखेरीस सायकाळ झाली म्हणजे प्रचड आतषबाजीचे काम उडविण्यात येते व नतर स्त्रिया आपापल्या घरीं परत येतात व समारभ समाप्त होतो महाराष्ट्रातही चैत्र महिन्यात गौरीचे पूजन मराठी ललना ज्या थाटाने साजरे करितात आणि तदर्थ होणाऱ्या हळदीकुकवाच्या समारभासाठी गरीब श्रीमत अथवा लहान थोर सर्व भेदाभेद विसरून व आपापल्या ऐपतीप्रमाणे नटूनथटून महाराष्ट्रीय स्त्रियाची मडळेच्या मडळे सप्रेम उत्साहाने एकमेकीच्या घरी अगत्यपूर्वक जात असतात त्याचे स्मरण राजपुताचे वरील वर्णन वाचले असता झाल्यावाचून राहणार नाही

**२१. मदनत्रयोदशी व चतुर्दशीचा कामदेवोत्सव.** गौरीपूजनाचा समारभ सपतो न सपतो तोच चैत्री पौर्णिमेच्या सुमारास काम-

देवाचा उत्सव सुरू होतो वसंताच्या विकासाने व अन्नपूर्णेच्या आशीर्वादाने मनुष्याच्या ठिकाणच्या सात्त्विक कामविषयक भावना उत्तेजित होणे साहजिक असते सूर्याची उष्णता हळू हळू प्रखर होऊ लागलेली असते त्यामुळे रात्र आणि विशेषत चांदणी रात्र अत्यंत प्रिय वाटू लागते दिवस-भर दिनमणीच्या किंचित् किंचित् कठोरता धारण करू लागणाऱ्या किरणांचा थोडासा पीडादायक खरा पण सुसह्यच त्रास सहन केल्यावर राजपूत रमणींना रात्रीच्या प्रसंगी आपापल्या सौधावर कौमुदीमध्ये बसून विलास करणे व तद्द्वारा कामदेवाची उपासना करणे अत्यंत आल्हादकारक वाटते गुलाबाच्या पुष्पांना या वेळी बहर आलेला असतो त्याशिवाय मोगरा, जाई, जुई, चमेली इत्यादि उष्णऋतूत फुलणाऱ्या फुलांचा हंगाम सुरू झालेला असतो त्यांच्या सुगंधाने सर्व वायुमंडल दरवळून राहिलेले असते अशा वेळी राजपूत रमणी ह्या सर्व फुलांच्या व त्यांच्या कळ्यांच्या माळा करून आपल्या गळ्यात घालतात, गजरे करून वेणीस बांधतात व लहानमोठे निरनिराळ्या तऱ्हेचे हार करून मनगटाभोवती व दंडाभोवती गुंडाळतात कामदेवाचे धनुष्य पुष्पाचे असल्याने त्याची पूजा करताना राजपूत अंगना अशा प्रकारे सर्वथैव पुष्पांचाच शृंगार करतात त्यांच्या सर्व वेषभूषा पुष्पमय बनलेल्या असतात पुष्पशृंगाराच्या बाबतीत राजपूत स्त्रियांइतकी आवड जगाच्या पाठीवरील दुसऱ्या कोणत्याही स्त्रीवर्गांत सापडणार नाही चैत्र शुद्ध त्रयोदशी व चतुर्दशीस हा उत्सव चालतो व त्यांना मदनत्रयोदशी व मदनचतुर्दशी म्हणतात ह्या दोन दिवसात राजस्थान पुष्पमय झालेला असतो जिकडे पहावे तिकडे सौंदर्याची चालती बोलती रूपे आपादतलमस्तक पुष्पमभारानी नटलेली दृष्टीस पडतील त्या मृगनयनींचा तो पुष्पशृंगार, त्यामुळे अधिकच शोभायमान दिसणारे काळेभोर नागिणीसारखे असलेले त्यांचे जुल्फ म्हणजे कपोलावर रुळत असलेले कुरळ कुंतल, त्यांची हंसगति, त्यांच्या नूपुरांचा झणत्कार, कामशराने बाधित होऊन त्या पुष्पधन्व्याची प्रार्थना करण्याकरिता त्यांनी म्हटलेली विरहव्याकुल भावगीते इत्यादिकांमुळे त्यांच्या निसर्गलावण्यात जी अपूर्वता उत्पन्न होते तिने आकर्षित होऊन कोणा सहृदय पुरुषाचे चित्त व्यथित होणार नाही ? व त्यांच्या प्राप्तीच्या अभावी कोणाच्या

निराशापूर्वक हृदयातून 'दो मह एक तो देहु कृपानिधि, दो मृगनैनि कि दो मृगछाला'—'हे कृपानिधि, मला हरिणाक्षी किंवा मृगचर्म या दोहोपैकी एक दे'—असे उद्‌गार निघणार नाहीत ? ज्याच्या निघणार नाहीत तो एका सुभाषितकाराने म्हटल्याप्रमाणे 'मुक्तोऽथवा पशु'च नव्हे काय ? कामदेवाला उद्देशून राजपूत रमणी जी उत्तेजक गाणी म्हणतात त्याच्या साध्या आकर्षकतेने टॉडलाही मोहून टाकले होते व त्याने त्याचे एक दोन नमुने आपल्या पुस्तकात दिले आहेत—

"पुष्पाचे धनुष्य धारण करणाऱ्या देवा तुझे स्वागत असो ! मीनाचा ध्वज धारण करणाऱ्या वीरा तुझे स्वागत असो ! हे दिव्य शक्तिमान देवा तुझे स्वागत असो तू ऋषीना देखील आपल्या निश्चयापासून च्युत केले आहेस ! !

"मदनाचा जय असो कामाचा–देवाच्याही देवाचा–जयजयकार असो त्याने ब्रम्हाविष्णुमहेश व इद्र याना देखील आपल्या बाणाने व्यथित करून टाकले आहे ! "

अशा तऱ्हेने माघ शुद्ध पचमीपासून चैत्री पौर्णिमेपर्यंतचे सुमारे अडीच महिने राजपूत स्त्रीपुरुषाना उत्सवमय जात असतात वर निर्दिष्ट केलेल्या उत्सवाशिवायही ह्या काळात अशोकाष्टमी, रामनवमी इत्यादि सामान्य उत्सव असतात ते निराळेच.

**२२. धाकटी गौरी, रंभापूजन, अरण्यषष्ठी इत्यादि.** वैशाख महिन्यात पुन धाकटी गौरी म्हणून मागच्याच उत्सवाची धाकटी आवृत्ति करण्यात येते तसेच महाराष्ट्रीय स्त्रियाप्रमाणेच वटसावित्रीचे व्रतही राजपूत स्त्रिया वैशाखशुद्ध चतुर्दशीस साजरे करतात वैधव्यनिवारण हाच त्याचाही हेतु असतो ज्येष्ठ महिन्यात अप्सराची नायिका जी रभा तिचे पूजन साजरे करण्यात येते रणागणात मरण पावलेल्या वीराचे स्वागत करून त्यास सूर्यमडलाप्रत नेण्यास स्वर्गातून अप्सराच येत असतात अशी राजपुताची समज असल्याने राजपूत स्त्रिया अप्सराच्या ह्या नायिकेचे—रभेचे–पूजन मोठ्या प्रेमाने व थाटाने साजरे करतात ज्येष्ठातील दुसरा महत्त्वाचा सण म्हणजे अरण्यषष्ठीचा होय हाही स्त्रियाचाच सण होय सततीची कामना करणाऱ्या कामिनी ह्या दिवशी अरण्यात जाऊन काही विशिष्ट वनस्पति भक्षण करतात

श्रावणातील नागपचमीचा सणही महाराष्ट्रीयाप्रमाणेच राजपूतही साजरा करतात श्रावण शुद्ध पौर्णिमेच्या–रक्षाबधनाच्या–सणाची हकीकत स्त्रियाच्या प्रकरणात स्वतत्रपणे दिली आहे कृष्णाष्टमीचा अथवा कृष्ण-जन्माचा उत्सवही आपल्याप्रमाणेच कडाख्याने राजपूत लोक साजरा करितात.

२३. **दंडधारण** (Sanction) यानतर महत्त्वाचा उत्सव म्हणजे आश्विन शुद्धातला नवरात्रोत्सव होय हा आश्विन शुद्ध प्रतिप-देस सुरू होऊन विजयादशमीस म्हणजे दसऱ्याच्या दिवशी सपतो या दसऱ्याच्या समारभाने राजपूत आणि मराठे या उभय जातीच्या उत्थान-कालात त्याच्या ठिकाणी युयुत्सावृत्ति निर्माण केली आहे. मनुष्याच्या युयुत्सावृत्तीची दर्शक अशी दोन साधने होत एक तरवार व दुसरे घोडा मनुष्याला स्वत च्या व समाजाच्या सरक्षणार्थ उपयोगी पडणारी जितकी म्हणून शस्त्रे अथवा अस्त्रे असतील त्या सर्वाची तरवार ही प्रतीक होय ज्या अर्थाने सस्कृतात दड शब्दाचा व इग्रजीत सँक्शन शब्दाचा उपयोग कर-ण्यात येत असतो त्याच अर्थाने येथे तरवार शब्दाचा उपयोग करण्यात येत आहे एका व्यक्तीच्या बाबतीत ‘अवष्टम्भकर चैव भयघ्न दडधारणम् ।’—दडधारण आधार देणारे म्हणजे आत्मविश्वास उत्पन्न करणारे व भय हरण करणारे म्हणून जसा दडाचा उपयोग वर्णन केला आहे, तद्वतच समष्टीच्या बाबतीतही ‘ दण्डस्य हि भयात्सर्वं जगद्भोगाय कल्पते । ’ दडा-च्याच (Sanction) भयाने वास्तविक पाहता जगरहाटी सुरळीत चालते असा दडाचा गुण वर्णिला आहे महाभारतातील शातिपर्वात या दडाचे माहात्म्य एका स्वतत्र अध्यायात वर्णिले आहे समाजाने राजसत्ता निर्माण करून तिच्या हाती दड उर्फ तरवार (Sanction) दिली आणि भगव-द्गीतेतल्या ‘अनेन प्रसविष्यध्वमेष वोस्त्विष्टकामधुक्’ या वचनात सागि-तल्याप्रमाणे ‘ह्या तरवारीने तू आपली उन्नति करून घे तू जे इच्छिशील ते सर्व देण्यास ही समर्थ आहे’ असे सागितले तेव्हापासून प्रत्येक राजसत्तेस सज्जनाचे सरक्षण करताना, दुष्टाचे पारिपत्य करताना, आर्ताचे परित्राण करताना, अन्यायाचे परिमार्जन करताना, सद्धर्माची प्रतिष्ठापना करताना, स्वातत्र्याचे मगलाचरण गाताना, दलिताचा उद्धार करताना, असत्याचा

विनाश करताना व सन्यास उत्थापन देताना अथवा समाजाची विस्कटलेली घडी सुघडताना प्रत्येक खेपेस दड उर्फ तरवारच हाती घ्यावी लागली आहे ही तरवार हाती घेतल्यावाचून अन्यायापासून न्यायाचे, असमतेपासून समतेचे व अत्याचारापासून सदाचाराचे सरक्षण होणे शक्य नाही म्हणूनच तरवारीचे किवा दडाचे हे महत्त्व जाणले पाहिजे व राष्ट्रातील अबालवृद्ध स्त्रीपुरुषाना तिची पूजा अथवा उपासना करण्यास शिकविले पाहिजे खड्गपूजेचे हे महत्त्व राजपुतानी ओळखले होते आणि म्हणूनच विजयादशमीच्या नवरात्रोत्सवात प्रत्येक राजपुताच्या घरी असलेल्या तरवारप्रमुख सर्व शस्त्राचे मोठ्या श्रद्धाभक्तिसमन्वित अत करणान पूजन करण्यात येई रोमन व ग्रीक योद्ध्याप्रमाणेच राजपूतही आपल्या तरवारीची इतक्या पवित्र भावनेने जोपासना करतो की, कोणतीही प्रतिज्ञा करताना तो म्यानातून आपली तरवार बाहेर काढतो व तीस स्पर्श करून 'ह्या तरवारीची शपथ घेऊन मी प्रतिज्ञा करतो की'— असे शब्द उच्चारतो कोणासही बक्षीस देण्यास सर्वोत्कृष्ट व योग्य वस्तू म्हणजे तरवार व घोडा होय असे तो समजतो महाराष्ट्रात सुद्धा आश्विन शुद्ध नवमीस हा शस्त्रपूजेचा व अश्वपूजेचा विधि सर्वत्र पाळण्यात येतो वर्षभर शमीवृक्षावर अथवा शततेच्या कोटरात दडवून ठेवलेल्या आपल्या शस्त्राना ह्याच दिवशी अर्जुनाने बाहेर काढले व कौरवयुद्धाचा मुहूर्त साधला आणि ह्याच मुहूर्तावर आर्यावर्ताच्या श्रीसीतेस हरण करून नेणाऱ्या व समुद्रापलीकडे राहणाऱ्या रावणाचा रामाने वध केला अशा याबाबतच्या पौराणिक कथा हिंदु मनुष्यास माहीतच आहेत ह्याच खड्गपूजनाच्या मुहूर्तावर आपली भीमथडी घोडी महाराष्ट्राबाहेर फेकून शिवोत्तरकालीन मराठ्यानी रुमशामवर भगवा झेडा फडकविण्याची आकाक्षा धारण केली होती हीही गोष्ट प्रसिद्धच आहे

**२४. अश्व–प्रगतीचे प्रतीक.** मागे सागितल्याप्रमाणे खड्गाप्रमाणेच अश्वाचीही उपासना राजपुतात प्रचलित होती ज्याप्रमाणे खड्ग दडधारणेचे (Sanction) प्रतीक होय, त्याचप्रमाणे अश्व हा मनुष्याच्या प्रागतिक आकाक्षाचे प्रतीक होय चित्रशिल्पादि कलातही वेगवान असा उत्कृष्ट अश्व आपला उजवा पाय प्रगमनोत्सुक भावनेने वर उचलून

धरीत आहे असेच दाखविलेले असते अर्जुनाप्रमाणेच अश्व हाही नर असल्याने पौरुषाचा, पराक्रमाचा, मनुष्यत्वाचा अथवा मर्दानीपणाचा अभ्यास करावयाचा म्हणजे प्रथम अश्वारोहणाचा अभ्यास करणे जरूर असते. धनुष्यावरून सुटलेल्या बाणाप्रमाणेच ठाण्यावरून मुक्त झालेला अश्व देखील सहस्रावधि सकटाची कुपणे ओलाडून व आपत्तीचे खदक उडून मनुष्यास इष्ट स्थळी घेऊन गेल्याशिवाय राहत नाही त्याचा वेग अनिरुद्ध असतो त्याची गति उमदी, दृष्टि तरळ, कान चौकस अर्थात् टवकारलेले, पाऊल पुढे आणि शील प्रामाणिकपणाचे असते त्याची स्वामिभक्ति अद्वितीय असते युद्ध पाहून त्यास स्फुरण चढते प्रतिस्पर्धी पाहून त्यास त्वेष येतो अशा प्रकारचे अश्वाचे गुण जाणूनच प्रतिक्षणी सकटाना सामना देण्याच्या किबहुना आपत्तीच्या सागरात निर्भयपणे आपण-होऊन उडी घालून आपल्या बाहुबलावर ती पोहून जाण्याची आकाक्षा बाळगणाऱ्या राजपूत जातीने अश्वोपासनेला आपल्या एकदर सस्कृतीत अत्यत महत्त्वाचे स्थान दिले आहे ह्या उपासनेमुळेच उच्चतम शील, आत्यतिक प्रामाणिकपणा व प्रखर स्वामिभक्ति हे गुण त्याच्या ठिकाणी ठळकपणे दिसून येतात युद्धात राजपूत सिहाप्रमाणे तुटून पडतो बरोबरीचा प्रतिस्पर्धी भेटला की, त्यास अवर्णनीय स्फुरण चढते अश्वोपासनेनेच एकसारख्या भराऱ्या मारून जग पादाक्रान्त करण्याचे गुण मध्यआशिया-तील साप्रत अस्तगत झालेल्या सीथियन सस्कृतीच्या लोकाच्या ठिकाणी उत्पन्न झाले होते त्याच गुणाच्या बळावर मराठ्यानी महाराष्ट्रस्वातत्र्याचा व हिदवी साम्राज्याचा जरीपटका नर्मदेच्या उत्तरेस चालविला आणि महमदी सत्तेची अटक पार करून मराठी घोड्याची तृषा कभूनदीतील उदकाने शात करविली साराश, खड्गात जशी वीरतेची तशीच अश्वात प्रगतीची कल्पना साठविली आहे व त्याच्या उपासनेच्या मुळाशी वर वर्णिलेला गभीर अर्थ भरलेला आहे

**२५. उदयपूरचा नवरात्रोत्सव** विजयादशमीच्या नवरात्रात होणाऱ्या तरवारीच्या व घोड्याच्या पूजनाचे तात्त्विक स्वरूप वर वर्णिल्या-नतर आता हा उत्सव राजस्थानात कसा साजरा करण्यात येतो त्याच्या नमुन्यादाखल उदयपूरच्या उत्सवाचे वर्णन करू

आश्विन शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी उदयपूरच्या आयुधशालेतील सुप्रसिद्ध पुराणपरपरागत चालत आलेला खाडा बाहेर काढण्यात येतो ह्या खाड्याच्या बाबतीत सामान्य राजपुताची अशी श्रद्धा आहे की, तो विश्वकर्म्याने निर्माण केला असून देवीने स्वहस्ते तो प्रसाद म्हणून बाप्पा रावळच्या कमरेस बाधला होता छत्रपति शिवाजी महाराजासही याप्रमाणेच देवीने भवानी तरवार दिल्याची आख्यायिका प्रसिद्ध आहे व आजही बाळंतीण अडल्यास सातारकर छत्रपतीच्या देवघरात असलेल्या या भवानी तरवारीचे पाणी पाजले असता ती मोकळी होते अशी श्रद्धा बाळगणारे शेकडो मराठे सापडतील अस्तु बाप्पा रावळपासून चालत आलेल्या ह्या खाड्याची प्रथम दरबारतर्फे पूजा करण्यात येते व नतर तेथून त्याची किशनपोळपर्यंत मिरवणूक काढण्यात येते ह्या ठिकाणी तो देवीचे पुजारी जे राजमहत त्याचे स्वाधीन करण्यात येतो तिसऱ्या प्रहरी तीन वाजण्याचे सुमारास नगारे वाजले म्हणजे आपल्या सर्व सरदारमडळीसह उदयपूरचा राणा अश्वशालेकडे जातो व तेथे युद्धीय अश्वाच्या पूजनाप्रीत्यर्थ एक रेडा बळी देण्यात येतो. तेथून पुढे ती मिरवणूक उपरिनिर्दिष्ट किशनपोळाजवळील अबा मदिरापाशी येते तेथे राणा राज–महताच्या आसनावर बसून आपल्या पारपरिक पवित्र खड्गाची (खाड्याची) पूजा करतो व नतर आपल्या महालात परत जातो

याप्रमाणे दररोज निरनिराळ्या मदिरात जाऊन राणा पूजा करतो व देवताच्या समोर अनेक बोकड व रेडे बळी देण्यात येतात या उत्सवातील पाचवे दिवशी हत्तीची साठमारी खेळण्यात येते सातव्या व नवव्या दिवशी सार्वत्रिक अश्वपूजन करण्यात येते ह्या दिवशी प्रत्येक सैनिक व सरदार आपल्या घोड्यास तलावावर नेऊन स्नान घालतो नवीन पोषाख व अलकार घालून त्याना सजविण्यात येते व त्यांची पूजा करण्यात येते नवव्या दिवशी तिसऱ्या प्रहरी देवीच्या मदिरात ठेवलेला खाडा राजमहताच्या हस्ते दरबारात परत आणण्यात येतो व राणाजीच्या हातात देण्यात येतो महताना सोन्यारुप्याच्या देणग्या देण्यात येतात सरदाराना इनामे वाटण्यात येतात आणि राजवाड्यातील घोडे व ढालतरवार इत्यादि शस्त्रे याची पूजा करण्यात येते.

दहाव्या दिवशी म्हणजे विजयादशमीस माताचलापर्यंत जाऊन सीमोल्लघन करण्यात येते माताचलाच्या माथ्यावर तोफाची सरबत्ती उडविण्यात येते शिपायाच्या कवायती घेण्यात येतात, घोड्यावर बसण्याचे निरनिराळे खेळ खेळण्यात येतात आणि सरदाराना पदव्या बहाल करण्यात येतात एकदर देखावा फारच परिणामकारक असतो हा समारभ अवलोकन करण्यास मूल्यवान असे रगीबेरगी पोषाख केलेले व पगड्या घातलेले हजारो जानपद व नागरिक समीलित झालेले असतात सर्व लोक राणाजीसमोर आपापले नजरनजराणे पेश करतात भाट व चारण पूर्वजाच्या पराक्रमाची स्फूर्तिप्रद गीते गाऊ लागतात ह्या उत्सवात निरनिराळे सरदार आपापल्या घोड्याची 'वाजिराज', 'हयमयूर', 'माणिक्य', 'वज्र', इत्यादिसारखी सुन्दर व अर्थपूर्ण नावे ठेऊन त्याचा जो गौरव करीत असतात तोही ध्यानात ठेवण्याजोगा आहे

आश्विनाच्या महिन्यात ह्याशिवाय देवाचा सेनापति कुमार उर्फ कार्तिकेय याची पूजा व शारदीय पौर्णिमेचा उत्सव हीही साजरी करण्यात येतात

**२६. दीपावलि इत्यादि इतर सण.** हिदु समाजातील इतर जातीप्रमाणेच दीपावलीचा सण राजपुतातही अत्यत महत्त्वाचा गणला जातो व सामान्य हिदुपद्धतीप्रमाणेच त्याच्यातही साजरा करण्यात येतो दीपावलीच्या सणातील दीपप्राचुर्याचे कारण चारण वर्णन करतो— "(मातृभूमीच्या सरक्षणार्थ) शत्रूच्या मुलखात जाऊन ज्यानी आपल्या प्राणाच्या आहुति दिल्या त्याच्या देहाना उत्तम गति देण्यासाठी ह्या मशाली व दीपज्योति पेटविण्यात आल्या आहेत ह्या हुतात्म्याना मृत्युलोकातील रामाच्या महालापर्यंतचा अधेरा मार्ग दिसावा म्हणून ह्या ज्योति प्रकाशित करण्यात आल्या आहेत"

कार्तिक शुद्ध चतुर्दशीस जलयात्रेचा विशेष उत्सव मेवाडात साजरा करण्यात येतो त्या दिवशी उदयपूरचा राणा, त्याचे मत्री व सरदार व सामान्य नागरिक ही सर्व मडळी मिरवणूक काढून एखाद्या तलावापर्यंत जातात व तेथे वरुणदेवतेची पूजा करतात पाण्यावर तरगते दिवे सोडण्यात येतात व त्यामुळे सबध तलावाचा पृष्ठभाग उज्वल दीपज्योतीनी उजळलेला

दिसतो भगवान् विष्णु आपल्या चातुर्मासिक निद्रेतून या दिवशी जागृत होतात अशी धर्मभावना आहे दुसऱ्या दिवशी म्हणजे पौर्णिमेस मकर सक्रांतीचा सण साजरा करण्यात येतो

याशिवाय राजपुताच्या आणखी बऱ्याच सणाचे, उत्सवाचे, अथवा सामाजिक चालीरीतीचे वर्णन करता येईल त्यातील बऱ्याचशा गोष्टी सामान्य हिंदुसमाजाशी जुळत्या आहेत तर कित्येक त्याचे वैशिष्टय दर्शविणाऱ्या आहेत परतु विस्तारभयास्तव त्या सर्वांचा ह्या लहानशा ग्रथात समावेश करणे शक्य नाही तथापि जाता जाता राजपुताच्या गानप्रियतेविषयी उल्लेख करणे अवश्य आहे चागल्या चागल्या गवयाना राजपूत राजानी आश्रय दिलेला आहे राजपूत राज्याचा अपकर्ष झाल्यानतर तीच गवयाची व वादकाची परपरा राजस्थानातून निघून शिदे होळकराच्या दरबारात आश्रयार्थ येऊन राहिली आणि आजही आपण सामान्यत निकडचेच गवई प्रसिद्ध असलेले पाहतो

**२७. उपसंहार–राजपुतांची उत्सवप्रियता** साराश, आतापर्यंतच्या वर्णनावरून राजपूत जाति ही मोठी उत्सवप्रिय असल्याचे दिसून येईल सतत हजार अकराशे वर्षे अखडपणे परकीय आक्रमणाचे आघात होत असताना व त्याच्या प्रतिकारार्थ प्रायश प्रत्यही लढावे लागले असताना त्यातूनही पुन अशा तऱ्हेचे आल्हादजनक सण, समारभ, उत्सव इत्यादि साजरे करणे आणि सुधारलेल्या व सुसस्कृत मानवी मनास सतोष व समाधान देणाऱ्या सर्व गोष्टीचा उपभोग घेणे ही वृत्ति राजपुताच्या ठिकाणी दिसून येते परिस्थितीमुळे अवश होऊन तीव्र स्वरूपाचा लढाऊ बाणा व आत्यतिक उद्यमशीलता ही त्याना कायम टिकवावी लागली असली, तरी सकटाच्या झझावातात व आवर्तात सापडला असताही राजपूत समाज मनाच्या विरगुळ्यास साधन होणाऱ्या उत्सवादि उच्च साधनास विसरला नाही, ह्यातच त्याच्या मनाचे औदार्य व थोरपण व्यक्त होते शत्रूची स्वारी अगावर येत असतानाही बेफिकीरपणाने आपले केश विचरून साफसूफ करीत बसलेल्या ग्रीकाना शत्रु अगदी जवळ आला आहे, अशी कोणी वर्दी दिली तेव्हा 'येऊ द्या ! त्याच्या भाल्याच्या छायेखाली आरामाने आम्हास केश विचरता येतील', असे त्यानी निर्भयपणे उत्तर

दिले ग्रीक शिपायाच्या निर्भयपणाची व थोर अंतःकरणाची साक्ष म्हणून इतिहासज्ञ लोक हे उदाहरण सांगत असतात व त्याची थोरवी गात असतात त्याच न्यायाने एखाद्या प्रसंगीच नव्हे तर सतत हजार वर्षे अत्यंत निर्भय व उदारभावाने वागून सणासमारंभापासून आनंद लुटणाऱ्या राजपुतांचेही माहात्म्य लक्षात ठेवले पाहिजे दिवसभर युद्ध करून थकलेले राजपूत देखील आपापल्या शिबिरात रात्री दाढया व केस विंचरून साफ करीत असलेले, अथवा खुर्षादिलाने एखादा टप्पा अथवा ख्याल गात असलेले, अथवा बुद्धिबळ अथवा फासे यांचा डाव मांडून बसलेले दिसतील

राजपुतांच्या खेळांत व सणासमारंभात जशी राजपुतांची सदा आनंदीवृत्ति व उत्सवप्रियता व्यक्त होते त्याचप्रमाणे समता, बंधुभाव, स्वतंत्रता इत्यादि तत्त्वांची वाढ करण्याची त्यांची इच्छाही दिसून येते आणि त्यातूनही वीरवृत्ति व लढाऊ बाण्यास पोषक असे धर्म निर्माण करण्याचे त्यांचे चातुर्य व्यक्त होते सामाजिक जीवनात राजपूत हा काही अंशी दृढमूल अशा रूढींनी बद्ध असला तरी तो बराचसा स्वच्छंदी, विलासी, उमदा, आनंदी आणि उपभोगप्रिय आहे असेच म्हणावे लागेल त्याच्या मनाच्या ह्या ठेवणीमुळेच इतक्या विविध प्रकारचे सणसमारंभ त्याने पाळले आहेत यांत शंका नाही

---

## प्रकरण पांचवें

# राजकीय कल्पनांचा विकास

**१. जुन्या गोष्टी व नवी कसोटी.** राजकारण म्हटल्याबरोबर सध्याच्या विसाव्या शतकात निरनिराळ्या गोष्टी डोळ्यासमोर उभ्या राहतात राजकारणावर जी स्वतंत्र शास्त्रीय उपपत्ति आज बसविण्यात आली आहे व जिच्या अनुषंगाने वर्तमानकालीन शासनपद्धतीची आपण छाननी करीत असतो तिच्याच सर्वथैव कसोटीवर प्राचीन काळच्या राज्यव्यवस्था घासून पाहणे योग्य होणार नाही. प्रजासत्ताक

राज्यपद्धति अथवा लोकशाही, नियंत्रित अथवा सनदशीर बादशाही इत्यादि शब्दप्रयोग हे आरिस्टॉटलच्या अथवा प्लेटोच्या ग्रथात सापडत असले तरी सध्या इतके सार्वजनिक परिभाषेचे स्वरूप त्यास यापूर्वी होते किंवा नाही हा वादग्रस्त प्रश्न आहे त्यामुळे कोणत्याही प्राचीन गोष्टीची परीक्षा केवळ नव्या कसोटीनी करणे सर्वथा अयुक्त होईल त्याबरोबरच हेही लक्षात ठेवले पाहिजे की राजकीय सुधारणाचे प्रवाह जगातील अन्य उत्क्रमणशील देशात ज्या अनुरोधाने वाहत आले आहेत त्याच अनुरोधाने आपण ज्याविषयी चिकित्सा करीत असू त्या देशातही वाहिले किंवा नाही व अन्य जागतिक राष्ट्राची जी वाढ झाली तशी अथवा त्या धोरणाने ह्याचीही वाढ होत होती किंवा नाही याचाही विचार करणे जरूर असते राजपुताच्या राजकीय कल्पनाचा विकास अवलोकन करीत असताना हाच दृष्टिकोन धारण केला पाहिजे.

आठव्या शतकापासून स्थापन झालेल्या राजस्थानातील राजपूत राज्यांमध्ये विकास पावणाऱ्या राजकीय कल्पनाचा प्रस्तुत प्रकरणी विचार करावयाचा आहे व त्याबरोबरच युरोपखडात समातर रेषेत चालणाऱ्या राजकारणाकडेही दृष्टिक्षेप करणे अवश्य आहे, तसेच राजपूत जातीवर, ती सकुचित विचाराची व देशाभिमानशून्य असल्याबद्दल काही आक्षेप घेण्यात येतात, त्याचाही विचार करावयाचा आहे

**२. राजस्थानची मर्यादा** आज जेव्हा आपण राजपूत शब्द उच्चारतो तेव्हा हिंदुस्थानच्या नकाशात पिवळ्या रगाने रगविलेला राजपुताना प्रथम आपल्या डोळ्यासमोर उभा राहतो व ह्या मर्यादित स्थलविभागात राहणारी जाति आपल्या लक्षात येते वास्तविक पाहता नकाशातल्या पिवळ्या भागात दाखविलेल्या राजपूत सस्थानातून राहणारे लोक तेवढेच राजपूत होत असे समजणे चुकीचे होय कारण पूर्वी त्याच्या बाहेर असलेल्या परतु आज स्मृतिपटलावरून देखील नष्ट झालेल्या अनेक राजपूत राज्याचा इतिहासही मोठा अद्भुत व रोमहर्षण आहे परतु आज लिहावयास बसलेल्या लेखकास फक्त वाचकाच्या दृष्टीसमोर दिसणाऱ्या राजपूत प्रदेशाचाच विचार कर्तव्य असल्याने भूतकाळाच्या उदरात गडप झालेल्या राजपूत राज्याचे भूत उभे करून वर्तमानकालाच्या छातीवर

नाचविण्याची गरज नाही केवळ वर्तमान राजपूत राज्याच्या ऐतिहासिक उत्क्रमणाचा व राजकीय विकासाचा इतिहास पाहिला तरी देखील तो उद्बोधक होईल असे वाटते

३. **वर्तमान राजपूत राज्यांच्या स्थापना.** आज राजपुताना या नावाने ओळखला जाणाऱ्या राजस्थानात उदयपूर, जोधपूर, बीकानेर, जयपूर, जेसलमीर, बुदी व कोटा ही सात प्रमुख राज्ये अथवा सस्थाने आहेत व त्याच्या हुकमतीखाली अनेक लहानमोठे सस्थानिक आहेत आठव्या शतकात बाप्पा रावळ नावाच्या महापुरुषाने चितोड येथे, सूर्यवशाच्या गुहिलोत उर्फ शिसोदिया घराण्याची प्रस्थापना केली बाप्पाने स्थापन केलेले हे मेवाडचे गुहिलोत घराणे वर्तमान घराण्यात प्राचीनतम होय त्यानतर दहाव्या शतकात अबर अथवा जयपूरच्या कच्छवाहा घराण्याच्या लोकानी धुडारच्या प्रदेशावर आपले राज्य स्थापन केले हे आपणास श्रीरामचद्राचा पुत्र जो कुश त्याचे वशज म्हणवितात शियाबुद्दीन घोरीने पृथ्वीराज चौहानाच्या पराजयानतर जयचद राठोडावर हल्ला चढविला व त्याचे एवढे मोठे कनौज शहर नेस्तनाबूद केले तेव्हा त्याचा सीहाजी नामक नातू तेराव्या शतकात तेथून निघून मारवाडात आला व तेथे त्याने राठोडाचे राज्य निर्माण केले हे राठोडही आपणास सूर्यवशीच म्हणवितात त्याच मारवाडच्या राठोड घराण्यातील बीका नामक राजपुत्राने राजस्थानातल्या वाळवटात वास्तव्य करणाऱ्या मीना नामक मूळच्या जातीना जिकून बीकानेरच्या राज्याची प्रस्थापना केली तसेच बाराव्या शतकात पजाबकडून आलेल्या यदुवशातील पुरुषानी जेसलमीर येथे भट्टी घराण्याचे राज्य अस्तित्वात आणले आणि चौदाव्या शतकात हाडावतीचा प्रदेश जिकून चौहान वशातील काही पुरुषानी तेथे बुदी व कोटाची राज्ये निर्माण केली या सर्वांत मेवाडचे राज्य प्राचीनतम आहे हे मागे सागितलेच आहे आणि कर्तबगारीच्या, पराक्रमाच्या व स्वातत्र्यसरक्षणाच्याही दृष्टीने त्या देशातील रघुवशी राजानीच ह्या सर्वांत आघाडी मारली असल्याने राजस्थानच्या सस्कृतीचा विचार करीत असताना मेवाड केद्रस्थानी धरूनच त्यासभोवार आपल्या विचारप्रणालीचे वर्तुळ आखावे लागते मोगलबादशाहीच्या उतरत्या काळात जयपूर, बीकानेर,

जोधपूर येथील राजानी वाहत्या गगेत हात धुवून घेतले व मेवाडपेक्षाही बराच अधिक प्रादेशिक विस्तार केला तथापि त्याना राज्य या दृष्टीने अव्वल दर्जाचे महत्त्व केव्हाच प्राप्त झाले नाही स्वतत्र व पहिल्या दर्जाचे राष्ट्र म्हणून मेवाडचा मान अखड आहे मेवाडच्या राजानीच राजस्थानच्या भूमीविषयी अभिमान उत्पन्न करण्याचा आणि भारतवर्षाच्या साम्राज्यपदाचे सिहासन कन्नौज व दिल्लीहून खेचून चितोडास आणण्याचा महान् प्रयत्न केला या दृष्टीने त्याच्या कर्तृत्वकेद्रासभोवारच आपणास विशेष भ्रमण करावे लागणार आहे

**४ स्वातंत्र्याभिमानी लोकांचेच प्रवाह राजस्थानांत आले.** वरील हकीकतीवरून राजपुताच्या विख्यात कुळातील पुरुष प्रथम राजस्थानात आले व त्यानी आपल्या वैयक्तिक कर्तबगारीवर आपली राज्ये स्थापन केली हे स्पष्ट आहे ज्या वेळी आर्यांच्या ह्या निर्वासित व गतवैभव घराण्यातील पुरुषानी राजस्थानात येऊन आपली राज्ये स्थापन केली त्या वेळी तेथे कशा प्रकारचे लोक राहत होते, त्यात वैदिक धर्मानुयायी होते किवा नाही, असल्यास ते प्रथम तेथे केव्हा गेले इत्यादि प्रश्न विचारणीय असले तरी त्याचा प्रस्तुत लहानशा स्थळी विचार करता येणार नाही

ज्या लोकानी आपले मूळचे प्रदेश सोडून व राजस्थानच्या बिकट प्रदेशात येऊन वास्तव्य केले व सुधारलेली राज्ये स्थापन केली, वैदिक सस्कृतीचा ध्वज फडकविला, त्याच्या मात्र परिस्थितीचा थोडा विचार केला पाहिजे मुसलमानाच्या आक्रमणानतर जेवढे प्रदेश त्याच्या ताब्यात गेले व जी राजघराणी पडली त्यातील बऱ्याचशा लोकानी मुसलमानाचा अमल कबूल केला व अनेक दृष्टीनी ते मुसलमानाच्या व त्याच्या सस्कृतीच्याही पचनी पडले परतु प्रत्येक ठिकाणी स्वाभिमानी, शूर व स्वातत्र्यप्रिय अशा लोकाचा एक वर्ग निघालाच तो सख्येने फारच अल्प असला तरी त्याला परकीयाच्या गुलामगिरीत राहणे हराम वाटले, पारतत्र्याचे जिणे नरकावह वाटले आपल्या आसपासच्या लोकाकडे त्यानी नजर फेकली तेव्हा त्याना आशेचा किरण कोठेच दिसेना त्याच्या स्वत खेरीज सर्वत्र निराशेचा घोर अधार पसरलेला होता मुसलमानी आक्रमणाचा जोर

इतका प्रबळ होता की, त्यामुळे उत्पन्न झालेल्या झंझावाताने आपल्या ठिकाणच्या स्वातंत्र्यप्रेमाचा मिणमिण जळणारा दीप देखील विझून जाईल किंवा काय अशी त्याना भीति वाटू लागली म्हणून पूर्वपरपरागत चालत आलेल्या सकुचित प्रदेशाचा अभिमान सोडून, विस्तीर्ण भरतखडाच्या पृष्ठभागावर कोठे तरी असा प्रदेश शोधून काढू की, जेथे आपले स्वातंत्र्य, कुलाभिमान व वैदिक परपरा याची उज्ज्वल पताका उच फडकत ठेवता येईल, अशा भावनेने हे लोक बाहेर पडले त्याना फिरता फिरता सर्व दृष्टीनी सुरक्षित व वसति करण्यास योग्य अशी राजस्थानची भूमि आढळून आली व तेथेच त्यानी वास्तव्य केले महमदी आक्रमणानतरच राजस्थानास राजपुताची भूमि हे नाव मिळाले असे जे कुलपति चि वि वैद्य यानी म्हटले आहे ते यामुळेच होय

अशा तऱ्हेने स्वतत्रतेच्या अभिमानाने उत्स्फर्त झालेली व परकीय सत्तेवर सारखी जळफळणारी जेवढी म्हणून माणसे होती ती सर्व या नवीनच स्थापन झालेल्या राजस्थानातील राजपूत राज्यात आश्रयार्थ येऊन राहिली परकीय सत्तेच्या धागर्डधिंग्याखाली व्यापार व उदीम ही सुरक्षित नाहीत, ती राजस्थानातील ह्या हिदु राज्यात अधिक सुरक्षित राहतील या विश्वासाने व्यापार-उदीम करणाऱ्या जैन इत्यादि जातीच्या लोकानीही राजस्थानचाच आश्रय घेतला साराश समस्त उत्तर भारत यावनी सत्तेने व्याप्त होत असता त्यातील तेजस्वी व स्वाभिमानी लोकानी महमदी राज्यात आपले जीवन असह्य होत असलेले पाहून स्वातंत्र्यसरक्षणाच्या इच्छेने राजस्थानचा आश्रय घेतला हे प्रथम लक्षात ठेवले पाहिजे स्वाभिमान व स्वातंत्र्य याची सर्व बीजे अशाप्रकारे आर्यावर्तातून निघून राजस्थानात येऊन रुजल्यामुळे आठव्या शतकानतर हिदु राज्याचे वृक्ष राजस्थानातच वाढीस लागले व त्याच्या शीतल छायेत एका स्वातंत्र्याच्या भावनेने अतर्बाह्य भरून असणाऱ्या व राजस्थानच्या भूमीतच केंद्रीभूत झालेल्या राजपुतानीही सतत एक सहस्रकपर्यंत परकीय आक्रमणाचा यशस्वी रीतीने प्रतिकार केला ह्या काळात आर्यावर्तातील दुसऱ्या कोणत्याही भागात, पजाबातील एकट्या शिखाचे उत्थान सोडून

दिल्यास, हिंदु जातीचे उत्थान होऊ शकले नाही त्याचे तरी कारण हेच होय

५. **कुलाभिमानाची वृद्धि.** एवच स्वातत्र्याचे कट्टर अभिमानी असलेले व पारतत्र्याचा व परराज्याचा मनापासून द्वेष करणारे लोकच राजस्थानात एकत्र जमले होते हे जरी ठरले तरी त्या वेळी त्याच्या ठिकाणी कोणत्याही भूमीबद्दलचा अभिमान असणे शक्य नव्हते हे लक्षात ठेवले पाहिजे त्यानी आपल्या व्यक्तीच्या, कुलाच्या व धर्माच्या स्वातत्र्यसरक्षणाकरिताच तर जुने देश सोडले व जेव्हा ते सोडले तेव्हाच भूमीवरचा अथवा देशावरचा अभिमान सोडून धर्माच्या व सस्कृतीच्या सरक्षणाचा हेतु त्यानी डोळ्यासमोर ठेवला व ज्या भूमीत—ज्या देशात—जाऊन हे कार्य करता येईल तेथे जाऊन करण्याची महत्वाकाक्षा धारण केली एवढेच त्यानी आपले कर्तव्य ठरविले म्हणून वैदिक धर्म, वैदिक सस्कृति व वैदिक परपरा ह्याचे आजतागायत सरक्षण तरी झाले ते जर आपल्या भूमीच्या अभिमानास बळी पडले असते व देशनिर्वासन करून राजस्थानात आले नसते तर बाकीच्या स्वाभिमानशून्य व गुलामगिरीत आनद मानणाऱ्या नालायक लोकाच्या बरोबर महमदी सत्तेच्या वरवंट्याखाली तेही भरडून निघाले असते व प्रसिद्ध इतिहासकार गिबनने म्हटल्याप्रमाणे "धर्मशास्त्र प्रतिपादणाऱ्या पुराणिकानी काशीत आजमितीला सुता करून महमदी धर्माची तत्त्वे व आचार ह्याची निरूपणे केली असती"

६. **आरबांच्या दिग्विजयसिंधूचा ओघ** मुसलमानी आक्रमणाची एक लाट जशी इकडे भरतवर्षावर येऊन आदळली तशीच दुसरी लाट तिकडे युरोपखडावर जाऊन आदळली कुलपती वैद्याच्याच ओजस्वी शब्दात सागावयाचे म्हणजे "आरबाच्या दिग्विजयसिंधूचा ओघ उत्तर आफ्रिका भिजवून जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीतून स्पेनमध्ये घुसला व पिऱ्यानीज पर्वत ओलाडून फरान्समध्ये उतरला, तेव्हा तेथे लायर नदीच्या काठी फरेच लोकाच्या शौर्य—खडकावर आदळून भग पावला त्याच धर्मवेडाने फुगलेला त्याच आरबाच्या दिग्विजयसिंधूचा दुसरा ओघ पूर्वेच्या बाजूने मेसापोटेमिया, इराण व बलुचिस्थान यास उदरात घेऊन व सिधनद पार होऊन सिधप्रान्त बुडवून पुढे चालला तो गेहलोत राजपुतानी

थोपवून धरून शतश विदीर्ण केला" जरी महमदी आक्रमणाची ही लाट राजस्थानच्या अभेद्य खडकावर आपटून छिन्नभिन्न झाली तरी तिने ज्याप्रमाणे बाकीचा भारत पादाक्रान्त केलाच, त्याचप्रमाणे युरोपात फरेच लोकानी तिला थोपवून धरले असले तरी अर्ध्यापेक्षाही अधिक युरोप तिने पारतन्त्र्याच्या क्षार तुषारानी भिजवून टाकलाच मूर लोकानी स्पेन व पोर्च्युगाल डुबवला होता व तुर्की साम्राज्याची मर्यादा डॅन्यूब नदीपर्यंत वाढली होती व बाकीचा यूरोपखड सोळाव्या शतकापर्यंत भयानक अधकारात केविलवाण्या स्थितीत चाचपडत पडला होता हिंदुस्थानपेक्षाही त्याची दशा अनुकपनीय होती आठव्या अथवा दहाव्या शतकात देशाभिमानाच्या कल्पना युरोपीय लोकानाही अवगत नव्हत्या असे दिसून येईल

**७. देशाभिमानही उत्पन्न झालाच.** वरील वर्णनावरून ध्यानात येईल की, राजस्थानात येऊन राहणाऱ्या व राज्यस्थापन करणाऱ्या आर्यांच्या ठिकाणी वैदिक सस्कृतीच्या अभिमानाबरोबर आपल्या कुलाचा अभिमान फारच प्रबल होता व असणेही स्वाभाविक होते त्यानतर त्याची जसजशी वाशिक अभिवृद्धि होत गेली तसतसा हा कुलाभिमान अधिक प्रखर होत गेला व बरेच दिवसपर्यंत तोच कायम राहिला परतु राजपूत राज्याची राजस्थानात स्थिरस्थावर झाल्यावर आणि राजस्थानच्या दऱ्याखोऱ्याच्या व वाळवटाच्या आश्रयाने आपण परकीय आक्रमणाविरुद्ध टिकाव धरू शकतो हे दिसून आल्यानतर ज्या ज्या कुळाने ज्या भूमीवर कब्जा केला असेल त्या भूमीचा अभिमान म्हणजे मर्यादित देशाभिमान त्याच्या ठिकाणी उत्पन्न झाला परस्पर कुलात एकमेकाच्या जमिनीविषयीची भाडणे सुरू झालेली दिसतात ती याच कारणास्तव होत समस्त राजपूत जाति म्हणजे एक होय व तिचे सघटन करणे व तिला एका निशाणाखाली सयुक्त करून शत्रूशी प्रतिकार करण्यास सज्ज करणे ही भावना पृथ्वीराज चौहानाच्या वेळेपासूनच जागृत होत होती आर्यावर्तातल्या प्रत्येक राजकुळीला आपल्या घराण्यातला अमका मनुष्य पृथ्वीराजाबरोबर पानिपतच्या सग्रामात देशाच्या कामी आला या गोष्टीचा जो अभिमान वाटतो तो याच भावनेचा दर्शक आहे ही भावना

पूर्णपणे जागृत होण्याच्या अभावी प्रारभी मेवाडचे राष्ट्र, हाडावतीचे राष्ट्र अशा प्रकारची स्वतत्र राष्ट्रेच निर्माण झाली असल्याने त्यातील लोकाना आपापल्या राष्ट्राचा अभिमान वाटू लागला होता व बाह्य शत्रूविरुद्ध राष्ट्रीय सरक्षणाच्या भावनेने ह्या लहान राष्ट्रातील का होईना पण सर्व लोक एकत्र होऊन लढत होते कर्नल टॉड म्हणतो–" राजपुतान्यात असे एक लहानसे देखील राष्ट्र नाही की, ज्याला स्वत ची थर्मापिली नाही व असे एक देखील नगर नाही की ज्याने आपला लिओनिडस निर्माण केला नाही " ग्रीसदेशातील नागरिक राष्ट्राच्या पेक्षा राजपूत राष्ट्रे अनेक पटीनी मोठी होती, त्याचा स्वराष्ट्राचा अभिमान ग्रीकाच्या अभिमानास हार जाणारा नव्हता व त्याची सस्कृति तर ग्रीक सस्कृतीपेक्षा अनेक दष्टीनी सरस होती ह्यापैकी प्रत्येक राष्ट्राने पृथक्श का होईना पण मुसलमानाशी तेजस्वी प्रतिकार केला मेवाडच्या माणसास आपण मेवाडी असल्याबद्दल, मारवाडच्या माणसास मारवाडी असल्याबद्दल, अथवा हाडावतीच्या माणसास आपण हाडा असल्याबद्दल अत्यत अभिमान असे व आपल्या राष्ट्रीय आचारविचारावर अथवा रीतीभातीवर कोणी टीका केली तर ती त्यास बिलकूल खपत नसे कर्नल टॉडच पुढे एके ठिकाणी म्हणतो, "हे लोक (राजपूत) आपणास आपल्या भूमीचे सेवक म्हणवितात आणि अभेद्य अशा दृढनिश्चयाने ते आपल्या भूमीला व पुरातन हक्काना चिकटून असतात त्याचे सरक्षण करण्याच्या प्रयत्नात पिढ्यान्‌पिढ्या निघून गेल्या परतु ज्या ज्या प्रमाणात त्याच्यावरील जुलूम वाढत गेला त्या त्या प्रमाणात त्याचे प्रतिकारसामर्थ्यही वाढतच गेले "

८. **प्रखर देशाभिमानाची उदाहरणें.** आपापल्या राष्ट्रातील माणसाचा राजपूत राजाना केवढा अभिमान असे व राष्ट्रीय इभ्रतीची ते किती पर्वा करीत, तसेच आपल्या मातृभूमीच्या नावाचा राजपूत लोकाना किती अभिमान वाटे व तिच्या सरक्षणाकरिता केवढा आत्मयज्ञ करण्यास ते तयार असत याविषयीची एक सुदर व उद्बोधक आख्यायिका जेसलमीरच्या इतिहासातून टॉडने दिली आहे

देवरावळ येथे देवराज नावाचा राजपूत राजा राज्य करीत होता. ह्या देवरावळचा यशकरण नावाचा एक व्यापारी धारानगरीस गेला

असताना तेथील प्रमार राजाने त्यास पकडले व बरीच मोठी खडणी घेऊन सोडून दिले यशकरणने परत येऊन देवराजला आपल्या अपमानाचे सर्व वर्तमान निवेदन केले देवरावळच्या एका व्यापाऱ्याचा अपमान म्हणजे आपल्या राष्ट्राचा अपमान होय असे म्हणून देवराजने 'जोपर्यंत मी अपमानाचा सूड घेणार नाही तोपर्यंत तोडात पाण्याचा थेब देखील घालणार नाही' अशी प्रतिज्ञा केली देवरावळहून धार किती लाब आहे याचे त्यास त्या वेळी भान राहिले नाही आपल्या प्रतिज्ञेचे शब्दश पालन होणे अशक्य आहे हे दिसून आल्यामुळे त्याने आपल्या शहराबाहेर गाऱ्याची–मातीची–एक खोटीच धारानगरी बनविली व तिच्यावरच आपण हल्ला करून तिला जमीनदोस्त करू व पाणी पिऊ आणि नतर खरोखरच्या धारवर हल्ला करू असे त्याने ठरविले देवराजच्या सैन्यात काही प्रमार वशाचेही लोक होते त्याना ह्या बनावट का होईना पण धारानगरीवर हल्ला करण्यात येणार ही गोष्ट सहन झाली नाही त्याचा आपल्या मातृभूमीचा–धारचा–अभिमान इतका जाज्वल्य होता की, त्यानी देवराजला कळविले की, 'आम्ही तुझे सैनिक असलो व तू आमचा धनी असलास तरी आम्ही आमच्या मातृभूमीच्या विरुद्ध तुझ्या बाजूने लढणार नाही एवढेच नव्हे तर ह्या मातीच्या धारवर देखील तू हल्ला करशील तर आम्ही तिचे सरक्षण करू' परतु त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून देवराजने ह्या बनावटी धारेवर हल्ला करण्यास शिपायाना हुकूम दिला त्या १२० तेजस्वी प्रमारानी–

जहा पवार त्याँ धार है और धार त्याँ पवार।
धार बिना पवार नही और पवार बिना धार ॥

–"जेथे पवार आहेत तेथे धार सुरक्षित असलीच पाहिजे व जेथे धार आहे तेथे पवार असलेच पाहिजेत धारवाचून पवार जगू शकत नाही व पवारावाचून धार असू शकत नाही" असे म्हणन तेजसिंह नामक आपल्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखाली तरवारी उपसल्या व देवराजच्या सैन्याशी सामना दिला आपल्या मातृभमीच्या त्या मृण्मय प्रतिमेच्या सरक्षणासाठी त्या बहादूर १२० प्रमारानी देवराजच्या तरवारीखाली लढता लढता आपले प्राण सुद्धा अर्पण केले पण आपल्या जिवतपणी

तिची विटबना होऊ दिली नाही हे त्याचे कृत्य उदात्त व दिव्य अशा देशाभिमानाचे नाही असे कोण म्हणेल व देवराजचा तरी निश्चय राष्ट्रीय अपमानाचा सूड घेण्यासाठीच झाला नव्हता काय ?

**९. पूर्वजांच्या रक्ताने भिजलेला खडक !** थोर राष्ट्रीयत्वाचे व प्रखर देशभक्तीचे म्हणून राणा हमीरचे खलील उद्‌गार वाचकानी अवश्य ध्यानात ठेवावेत "हा चितोडगडचा खडक ! हा माझ्या पूर्वजाच्या रक्ताने भिजून ओलाचिब झाला आहे व्यानमातेच्या प्रसादाने मला तो परत मिळाला आहे म्हणून अत्यत पूजनीय आहे तो आपल्या पृष्ठभागी मला धारण करीत आहे व करीत राहील माझ्या पूर्वजाप्रमाणे एखाद्या सुदरीच्या मुखचद्रास भाळून मी त्याचे स्वातत्र्य पुन कधीही धोक्यात घालणार नाही"

बहादूरशाहाने घातलेल्या चितोडच्या वेढ्याच्या वेळी राणी कर्मवतीने आपल्या सरदाराना जे पत्र लिहिले होते ते स्त्रियाच्या प्रकरणात दिलेच आहे त्यातील "समजा तुमचा स्वामी अयोग्य आहे तरी पण जे राज्य वशपरपरा तुमचे आहे ते शत्रूच्या हाती गेल्याने तुमचीच अपकीर्ति होणार नाही काय ?" यासारख्या वाक्यात तिच्या ठिकाणचा उत्कट देशाभिमानच प्रकट होत नाही काय ?

मारवाडच्या मेहत्रीच्या तरुण सरदाराने स्वत च्या ऐन लग्नात नववधूचा हात त्याच्या हातात असताना व विवाहग्रथि बाधली गेली असताना राष्ट्रीय आपत्तीची वार्ता त्यास समजली तेव्हा आपल्या तरुण पत्नीचा हात तसा झिटकारून आपल्या अगरख्यास बाधलेला तिचा पदर तोडून टाकला व तशा पिवळ्या अगाने ऐशी कोस जमीन तो घोड्यावरून चालून गेला आणि स्वदेशसरक्षणाच्या कार्यात त्याने आपला देह ठेवला त्याच्या या दिव्य कृत्याचे चारण फारच स्फूर्तिदायक वर्णन करतात त्याची प्रत्येक मारवाड्यास मुखोद्‌गत असलेली पुढील कविता तरुण मेहेत्री सरदाराचे त्या वेळचे दृश्य आपल्या डोळ्यासमोर आज देखील उभे करिते. चारण म्हणतो–

कान ए मोती बलबल्ला गल्ला सोनि आ माला।
असी क्रोस कढो हो आया कुवर मेहत्रीवाला॥

"ज्याच्या कानात मोत्याची बाळी चमकते आहे व गळयात सोन्याची

माळा विराजते आहे असा मेहत्रीचा कुमार ऐंशी कोस जमीन चालून आला " यापेक्षा अधिक देशाभिमानाचे उदाहरण सापडू शकेल काय ? आपल्या हाताने रायाजीचे लग्न बाजूस सारून शिवरायाच्या आज्ञेवरून सिंहगडावर चालून जाणाऱ्या व स्वराज्याच्या कार्यी देह ठेवणाऱ्या तानाजीची स्मृति वरील मेहत्री सरदाराची गोष्ट वाचून कोणाच्या मनात जागृत होणार नाही ?

**१०. व्यापक संघटना–जर्मनीशी तुलना.** साराश, अशा प्रकारे ह्या लहान लहान राष्ट्रातही कुलाभिमानाची परिणति उत्कट देशाभिमानात झालीच होती आता त्याला व्यापक करण्याची जरूरी भासू लागली होती भिन्नभिन्न देशाच्या पात्रातून वाहणारे देशाभिमानाचे हे सर्व प्रवाह एकत्र जोडण्याची आवश्यकता उत्पन्न झाली होती तमाम राजपूत जातीचे सघटन करून अखिल राजस्थान हा एक देश आहे ही भावना राजपुताच्या मनात ओतण्याची आवश्यकता विचारशील राजकारणी पुरुषाना पटू लागली होती, याची अनेक प्रत्यतरे इतिहासातून दाखविता येण्यासारखी आहेत राजपूत जातीचा स्वभावविशेष लक्षात घेतला असता एखादा गोष्ट तिच्या मनोभूमीत पक्की रुजली की ती तो सहसा सोडीत नाही असे दिसून येईल ह्याच गुणामुळे स्वतच्या व्यक्तीचा, कुलाचा व धर्माचा अभिमान जो एकदा तिच्या ठिकाणी रुजला तो कायमचा ! तद्वतच व्यापक देशाभिमानाची, अखिल राजस्थानला मातृभूमि समजण्याची, कल्पना तिच्या मनात एकदा भरली असती म्हणजे तिचे जे सघटन निर्माण झाले असते ते अभेद्य राहिले असते व मुसलमानाच्या मराठ्याच्या अथवा इग्रजाच्या हल्ल्यानीही ते फुटले नसते तसे सघटन झाले पण टिकू शकले नाही हे दुर्दैव होय

या बाबतीत जर्मनीचे उदाहरण घेण्यासारखे आहे जर्मनी व राजस्थान याची सारखीच परिस्थिति होती अनेक दृष्टीनी त्याची तुलना करता येण्यासारखी आहे प्रत्येक जण आपल्यापरीने एकाच परपरेच्या व वशाच्या लोकाचा सघ आहे दोन्ही ठिकाणी लहान लहान अशा अनेक राज्याचे गट राहत आले आहेत. दोन्ही ठिकाणच्या लोकामध्ये आपल्या सस्कृतीचा, कुलाचा व बारक्या बारक्या देशाचाही प्रखर अभिमान आहे.

जर्मनीत प्रशियाचे राज्य प्रबळ तसे राजस्थानात मेवाडचे राज्य प्रबळ. प्रशियाच्या कर्तबगार राजानी बाकीच्या जर्मन सस्थानाचा सघ बनविण्याचा प्रयत्न केला, तसा मेवाडच्या कर्तृत्ववान व शूर राजानी राजपूत सस्थानाचा सघ निर्माण करण्याचा प्रयत्न केला प्रशियाचे प्रयत्न अनेकदा अपेशी झाले तसे मेवाडचेही जर्मनीच्या तीन बाजूनी फरान्स, रशिया व आस्ट्रिया याचे प्रचड सत्ताधारी बादशहा त्याच्यावर डोळा ठेऊन त्यास गिळकृत करण्यास टपून बसले होते, तसेच राजस्थानच्या तीन बाजूनीही दिल्ली, माळवा व गुजराथ येथील प्रबळ सुलतान राजस्थानचा घास गिळण्यास टपून बसले होते इतक्या सगळ्याच्या तावडीतून बचावून प्रिन्स बिस्मार्कने तिसऱ्या नेपोलियनच्या विरुद्ध उत्तर-दक्षिण जर्मन सस्थानाचे सघटन निर्माण केले तद्वतच ह्या तीनही मुसलमान सुलतानाना आपल्या तरवारीचे पाणी पाजून राणा सग्रामसिहाने उर्फ सगाने राजपूत राज्याचा सघ निर्माण केला बिस्मार्कचा हा प्रयत्न १९ व्या शतकात झाला, तर त्यापूर्वी तीनशे वर्षे राणा सगाने आपला उपक्रम सिद्धीस नेला दोन्ही ठिकाणी एकाच प्रकारची सयुक्त राज्यपद्धति (Federal Govt ) निर्माण झाली होती असे म्हणता येईल परतु बिस्मार्कचा जय झाल्यामुळे जर्मनाचे राजकीय सघटन टिकू शकले व आज सघटित व प्रभावशाली राष्ट्र म्हणून जर्मनी जगाच्या छातीवर नाचत आहे आणि राणा सगाचा बाबराने पराभव केल्यामुळे राजपुताचे सघटन मोडले व विस्कळित व पददलित राष्ट्र म्हणून जग राजस्थानकडे पाहून नाके मुरडीत आहे !

**११. व्यापक संघटनेचे प्रयत्न** एवच, वर सांगितल्याप्रमाणे सकुचित राष्ट्रीय भावनाच्या गर्तेतून काढून राजपूत जातीला उच्च व व्यापक देशाभिमानाच्या शिखरावर चढविण्याचेही प्रयत्न करण्यात आले होते हे अवश्य लक्षात ठेवले पाहिजे असला प्रथम प्रयत्न राणा हमीरने केला त्याने महमद खिलजीचा जगी पराजय केला होता दिल्ली, माळवा व गुजराथ ह्या तीनही बाजूस मुसलमानी सत्ता असूनही हमीरच्या विजयाचा वारू बेफामपणे पुढे चालला होता त्याच्या माराने भयभीत झालेल्या मुसल्मानानी नंतर शभर वर्षे राजस्थानाकडे तोड वळविले नाही हमीरच्या वेळी स्वतत्र प्रवृत्तीचा एकही हिंदु राजा आर्यावर्तात

उरला नव्हता महमद खिलजीच्या जुलमाने सर्व हिंदु प्रजा त्रस्त झाली होती अशा वेळी आपला उद्धारकर्ता म्हणून तिचे हमीरकडे लक्ष जाणे स्वाभाविकच होते रा ब. ओझाजी म्हणतात "हमीर मोठाच वीर नृपति होता महाराणा कुभाने लिहिलेल्या गीतगोविंदावरील रसिकप्रिया नामक टीकेत हमीरास 'विषमघाटीपचानन' म्हणजे बिकट आक्रमणात सिहाप्रमाणे तळपणारा असे म्हटले आहे कर्नल टॉड म्हणतो, "(१४ व्या शतकात) हिंदुस्थानात हमीर हाच प्रबळ राजा राहिला होता सर्व प्राचीन राजवश नष्ट झाले होते मारवाड व जयपूरचे राजेही बूदी, ग्वाल्हेर, चदेरी, काल्पी इत्यादि ठिकाणच्या राजाबरोबर आपल्या सेना हमीरच्या सेवेत सादर करीत होते" हमीरचा हा राजपूत सघटनेचा प्रारभ होता त्याचा परिणाम म्हणून महाराणा कुभाच्या वेळेस हिंदुस्थानात पाटलिपुत्र, कनौज, हस्तिनापूर व अवति यासारख्या चक्रवर्ती सिहासन धारण करणाऱ्या राजधान्याच्या रागेत चितोड येऊन बसले होते ह्यापूर्वी ज्याने दिल्ली जिकली तो भरतवर्षाचा सम्राट झाला अशी स्थिति होती पण मेवाडच्या राजानी जोपर्यंत कोणीही वीरपुरुष मेवाड जिकू शकत नाही तोपर्यंत भारताचा सम्राट म्हणवून घेण्याचा त्यास कोणताही अधिकार नाही ही गोष्ट शाबीत केली होती कुभाच्या वेळी राजपुताचा भाग्यभानु अगदी मध्याकाशात तळपत होता. राजस्थानातले समस्त हिंदुराजे त्याच्या रक्तलाछित आदित्य ध्वजासमोर आदरपूर्वक मान लववीत होते दिल्ली, गुजरात व माळव्याचे सुलतान प्राणभयाने त्याजकडे वक्र कटाक्ष करू शकत नव्हते राणा सगाच्या वेळेस ही स्थिति पूर्णतेस पोचली होती राणा सगाच्या आधिपत्याखाली समस्त राजस्थानचे सघटन तयार झाले होते त्याचा प्रतिस्पर्धी मोगलबादशाह बाबर स्वत सगाविषयी काय म्हणतो पहा —"राणा सग आपल्या शौर्याने तरवारीच्या बळावर फारच मोठा पुरुष झाला होता त्याचे सामर्थ्य इतके वाढले होते की, माळवा, गुजराथ व दिल्लीच्या सुलतानापैकी कोणीही त्यास हारवू शकत नव्हता सुमारे २०० शहरातील मशिदी त्याने पाडवून टाकल्या होत्या त्याच्या राज्यातील उत्पन्न दहा कोट रुपयाचे होते त्याच्या सेनेत एक लक्ष घोडेस्वार होते. त्याच्याबरोबर (राजस्थानचे)

७ राजे, ९ राव आणि १०४ लहानमोठे सरदार व रावत राहत असत"
बाबराने केलेल्या वरील वर्णनावरून सगाने राजपूत राजाचे केवढे प्रबळ सघटन निर्माण केले होते याची कल्पना येते ओझाजी म्हणतात, "त्याच्यानतर सतत तीन राजे जर तसेच वीर व योग्य निघाले असते तर मोगलाचे राज्य भरतवर्षावर जगू शकले नसते" पण आम्हास ओझाजीपेक्षाही महाराणा प्रतापसिहाचे "उदयसिहाच्या ऐवजी महाराणा सगाच्या पोटी मी आलो असतो तर औषधाला देखील तुर्क भारतात उरू दिला नसता," हेच बोल अधिक यथार्थ वाटतात राणा सगाचा पराभव झाल्यानतर देखील राणा प्रतापसारख्या फक्त एकाच पुरुषाची आवश्यकता होती म्हणजे सगाने निर्माण केलेल्या सघटनेचा त्यास फायदा घेता आला असता व हुमायूनच्या आपत्कालात भरतखड यवनशून्य करून टाकता आले असते

साराश, व्यापक देशाभिमानाची कल्पना राजपुताच्या ठिकाणी जागृत होती व तिचाच फायदा घेऊन सर्वांना सामान्य असणाऱ्या परकी शत्रूविरुद्ध त्याचे सघटनही करण्यात आले होते परतु राणा सगाचा बाबराने पराजय केल्यामुळे व त्याच्यामागे रत्नसिह, विक्रमाजित व उदयसिह यासारखे नालायक राजे मेवाडच्या गादीवर आल्यामुळे सगाने केलेले सर्व कार्य पुसून टाकले गेले उलट मोगल बादशहात मात्र अकबरासारखा अतिधूर्त, सघटनाकुशल व राजकारणपटु पुरुष उत्पन्न झाल्याने त्याने उदयसिहाचा कमकुवतपणा ओळखून आपले सिहासन प्रथम स्थिर करून घेतले राणा सगानतर पुन प्रतापसिहाने राजपूत जातीचे सघटन करण्याचा प्रयत्न केला होता परतु राजनीतिधुरधर अकबराने तो सिद्धीस जाऊ दिला नाही त्याने पृथक्पणे प्रत्येक राजपूत राजाचा समाचार घेतला व अतर्गत स्वातत्र्य रक्षण करण्याचे आश्वासन देऊन त्यास आपला अकित करून घेतले राणा प्रताप गादीवर येण्याच्या पूर्वीच अकबराचे हे कार्य पूर्ण झाले होते पूर्वीच्या सघटनात राजस्थानच्या अन्य राजाची मदत प्रथम मिळाली की प्रजेची मिळालीच असे होत असे तो फायदा आपल्या वरील नीतीने त्याने प्रतापसिहास मिळू दिला नाही त्यावर तोड म्हणून मोगलाच्या अधीन झालेल्या सर्व राजपूत राजावर सामाजिक बहिष्कार पुकारून प्रतापसिहाने एकदर

राजपूत जातीची सहानुभूति आपणाकडे मिळविलीच परंतु प्रताप व अकबर याच्या साधनानुकूलतेत जमीनअस्मानचा फरक पडल्याने एवढे संघटन करण्याचा प्रयत्न करूनही त्या बळावर प्रतापला फक्त स्वतःचे व मेवाडचे निर्भेळ स्वातंत्र्यच कायम राखता आले, जास्त कार्य करता आले नाही. त्याच्यानंतर हा संघटनाचा यशस्वी प्रयत्न फिरून महाराणा राजसिंहाने केला. त्याने औरंगजेबासारख्या बलाढ्य बादशाहाचाही तीन वेळा पराभव केला व शाहजादा अकबरला हाती धरून त्याचे सिंहासनदेखील उलथून पाडण्याचा प्रयत्न केला. पण ह्या विजयाचा पूर्ण फायदा पदरात पडण्याच्या आधीच इकडे राजस्थानात महाराणा राजसिंह व तिकडे दक्षिणेत छत्रपति शिवाजीमहाराज हे दोघेही एकाच वर्षी म्हणजे १६८० साली मरण पावले व त्यानंतर पुनः अनवस्था प्रसंग ओढवला. ह्यानंतर म्हणण्यासारखा असा राजपुताच्या संघटनेचा प्रयत्न झाला नाही. त्याची जातीय शक्तीही या पुढे क्षीण पडत गेली. असो.

**१२. समता, बंधुता व स्वातंत्र्य** उत्कट देशाभिमान व व्यापक प्रादेशिक संघटन करण्याची इच्छा ह्या दोन्ही भावना राजपुतात उत्पन्न झाल्या होत्या हे आपण पाहिले. आता त्याच्या राज्यव्यवस्थेच्या प्रकाराकडे थोडे लक्ष पुरविणे जरूर आहे. युरोपात फ्रेंच राज्यक्रांतीनंतर वाढीस लागलेल्या तत्त्वाचा काही अंकुर राजपुतातही उत्पन्न झाला होता किंवा नाही याचाही त्याच्याबरोबरच विचार केला पाहिजे. समता, बंधुता व स्वतंत्रता ही फ्रेंच राज्यक्रांतीनंतर जन्मास आलेली तत्त्वे होत. ज्या एका विशिष्ट परिस्थितीत हिंदुस्थानच्या इतर भागातून राजपूत राजस्थानात आले त्या परिस्थितीनेही फ्रेंच राज्यक्रांतीसारखेच कार्य केले व वरील तीनही तत्त्वे राजपुताना शिकविली. समतेचा व बंधुतेचा लगाम हाती धरून स्वतंत्रतेच्या अश्वावर राजपूत आरूढ झाले म्हणूनच त्याना महमदी आक्रमणाचा प्रचंड आवेग सहन करता आला. नव्हे या तत्त्वाच्या मुळेच संघटित होऊन त्यानी मुसलमानी आक्रमणाचा ओघ राजस्थानात पिऊन टाकला. व्यवहारात विषमता वाढवील असा फारसा भेदभावच त्याच्यात शिल्लक राहिला नव्हता. राजापासून रंकापर्यंत सर्व माणसे ही एकाच परमेश्वराची लेकरे आहेत ही कल्पना नास्तिकवादी पाश्चिमात्य जगात

नवीन असली तरी राजपुताना अभिनव नव्हती राजपुतातील जानपदाचे महात्म्य त्याच्या सणासमारभाचे वर्णन करताना विशद करून सांगितले आहे त्याची समता व स्वतत्रता स्त्रियाच्या ठिकाणीही त्यानी प्रदान केली होती राजपुताच्या इतकी बधुता दुसऱ्या कोणत्याच जातीत सापडणार नाही साराश ही तीनही तत्त्वे त्याच्या ठिकाणी होती यात शका नाही पण या तत्त्वावर आज व्यवस्थाशास्त्रात जे महत्त्वाचे फेरबदल झाले आहेत व त्यामुळे लोकशाहीच्या तत्त्वावर राज्यघटना निर्माण होऊ लागल्या आहेत तसा प्रकार राजपुतात झाला किवा काय हा प्रश्न आहे व त्याचे थोडया फार अशाने झाला, असे प्रारभीच उत्तर देणे जरूर आहे परतु याचा अर्थ, युरोपात सुरू झालेली मतदानपद्धति राजपुतात अमलात होती व निवडणुकीच्या आजच्यासारख्या दगली त्याच्यात चालत असत, असा मात्र करण्याचे कारण नाही

**१३. उत्तम राज्यव्यवस्थेची लक्षणे.** एखाद्या देशात राज्यव्यवस्थेचा कोणता प्रकार प्रचलित आहे ह्या गोष्टीला खरे महत्त्व नसून त्या राज्यव्यवस्थेखाली राज्यकर्ते व प्रजा ह्याच्यात परस्पर सलोखा व सहकार्य किती आहे ह्या गोष्टीला खरे महत्त्व आहे जोपर्यंत राज्यकर्ते व प्रजा ह्याच्यात असले सबध निर्माण होत नाहीत, तोपर्यंत प्रजासत्ताक राज्यपद्धति जरी अमलात आणली तरी बेबदशाही होऊन सर्वत्र अदाधुंदी माजल्याशिवाय राहणार नाही प्रजासत्ताक राज्यपद्धतीचे आद्य उगमस्थान जे ग्रीस त्याचेच उदाहरण घेऊ व तिचा पुरस्कर्ता जो आरिस्टॉटल त्याचाच काळ घेऊ "अधिक व्यवहार्य व सर्वांना अनुकरण्यासारखी म्हणून ज्या प्रकारची राज्यव्यवस्था आरिस्टॉटलने सुचविली ती काही थोडया लोकाची सत्ता (Oligarchy) व प्रजासत्ता (Democracy) याच्या मधली पण प्रजासत्तेकडे अधिक झुकणारी अशा प्रकारची होती. तिला तो सनदशीर राज्यव्यवस्था (Constitutional Govt) असे म्हणत असे. ह्या व्यवस्थेत, स्वतत्र नागरिकाच्या बहुमताने महत्त्वाची राज्ययत्रे चालवावीत, विशेषत त्यानी आपले न्यायाधीश निवडावेत व त्याना जबाबदार धरावे असे त्याचे म्हणणे. पण आरिस्टॉटलच्या ह्यातीत तरी ह्या प्रकारची राज्यव्यवस्था अमलात येऊ शकली नाही. श्रीमत व

गरीब ह्याच्यामधला कलह वाढतच गेला व जो वर्ग जिकेल त्याच्यातल्या स्वार्थी व जुलमी लोकानी सत्ता बळकाऊन बसावे असा प्रकार सुरू झाला. त्यामुळे थोडया लोकाचा अमल (Oligarchy) झाला काय किवा प्रजेच्या हाती सत्ता (Democracy) आली काय परिणाम एकच व तो म्हणजे स्वार्थलपटपणा व जुलूम ! ह्या अदाधुदीत कित्येक वेळा एखादा धटिंगण सर्व सत्ता आपणच बळकाऊन बसे व सुलतानशाही (Tyrannus) गाजविण्यास प्रारभ करी" याप्रमाणे आपल्या 'राज्यशास्त्राची प्राथमिक तत्त्वे' (Elements of Politics) नामक ग्रथात हेन्री सिज्विकने म्हटले आहे एकदरीत प्रजासत्ताक राज्यपद्धतीच्या तत्त्वाची पद्धतशीर वाढ होऊन देखील ग्रीक राष्ट्रात बेबदशाही माजावयाची ती माजलीच म्हणून राज्यव्यवस्थेच्या प्रकाराला तादृश महत्त्व नसून श्री हरविलास शारदा आपल्या 'भारतीय श्रेष्ठत्व' नामक ग्रथात म्हणतात त्याप्रमाणे "ठोकळ मानाने पाहता राज्यव्यवस्थेचा उत्तम प्रकार तोच की, ज्यायोगे उच्च शीलाच्या, उदार मनाच्या, व्यापक सहानुभतीच्या आणि गभीर सद्गुणाच्या व बुद्धिमत्तेच्या माणसाना वर यावयास मिळेल आणि क्षुद्र मनाच्या, हलक्या योग्यतेच्या, आकुचित सहानुभतीच्या आणि तत्त्वहीन वृत्तीच्या माणसाना सत्ता बळकावता येणार नाही हर्बर्ट स्पेन्सरने म्हटल्याप्रमाणे सरकारची महत्त्वाची कर्तव्ये दोन (१) राष्ट्राचे परकीय आक्रमणापासून सरक्षण करणे, आणि (२) एका व्यक्तीचा अथवा वर्गाचा दुसऱ्या व्यक्तीपासून अथवा वर्गापासून बचाव करणे" आणि हीच उत्तम राज्यव्यवस्थेची लक्षणे होत असे म्हणता येईल

**१४ राजपूत राजा व प्रजा यांचे संबंध.** आता या दृष्टीने राजपुताच्या राज्यव्यवस्थेकडे पाहिले तर अध पाताच्या काळात उत्पन्न होणारे अपवाद सोडून दिल्यास सामान्यत राजा व प्रजा याचे सबध सलोख्याचे राहिले आहेत ज्या मूळच्या भिल्ल इत्यादि जातीना जिकून त्यानी आपली राज्ये स्थापली त्याना सुद्धा त्यानी आपलेसे करून घेतले होतें व आपल्या धनुष्यबाणासह हजारोच्या सख्येने ते राजपूत राजाच्या सेवेस आनदाने जात असत प्रत्येक आपत्तीच्या वेळेस ह्या लोकानी राजपूत राजांना मन पूर्वक मदत केली, यावरूनच त्याचे व त्याच्यावर

शासन करणाऱ्या राजपुताचे सबध कसे होते हे ध्यानात येते जित लोकाशी इतक्या समरसतेने व्यवहार करणाऱ्या राजपूत शासनकर्त्यानी आपल्या रक्ताच्या व जातीच्या बाधवाबरोबर प्रजाहितैषी वृत्तीने वर्तन केले असल्यास व राजा व प्रजा ह्यात प्रेमबधन निर्माण केले असल्यास आश्चर्य काय ? प्रजेचे आरोग्य, सपत्ति व लोकसख्या याची राजपूत अमदानीत सारखी वाढ झाली आहे सतत एक हजार वर्षे त्यानी यशापयशाचे भागीदार होऊन शर्थीने मारलेल्या लढाया ही एकच गोष्ट वरील विधान सिद्ध करण्यास पुरे आहे शिक्षणाच्या बाबतीतली राजपूत जातीची प्रगति त्यानी केलेल्या वाङमयाभिवृद्धीवरून मोजता येण्यासारखी आहे सपत्ति, शिक्षण, लोकसख्या व आरोग्य ही चारच प्रजेच्या उत्कर्षाची प्रधान लक्षणे होत व ती सर्वही राजपूत राजानी वाढविली आहेत राणा हमीरपासून राणा सगाच्या कारकीर्दीचा अत होईपर्यतचा काळ राजपूत इतिहासातले सुवर्णयुग होय त्याचे कर्नल टॉड वर्णन करतो, "ह्या काळातील मेवाडच्या प्रजेस केवळ चिरशातीच नव्हे तर उत्कट उत्कर्षाचाही लाभ मिळाला, असे त्यात निर्माण झालेल्या भव्य इमारती व अन्य सार्वजनिक स्मारके यावरून म्हणावे लागते ह्या काळात उभारलेला एकेक विजयस्तभ आजच्या मेवाडच्या राजाना आपल्या सस्थानचे दहादहा वर्षांचे सपूर्ण उत्पन्न खर्च करूनही बाधता येणार नाही मेवाडच्या घराण्यात उत्पन्न झालेले राजे कलाकौशल्याचे व विशेषत स्थापत्यशास्त्राचे मोठे पुरस्कर्ते होते केवळ जमिनीच्या कराच्या रूपाने येणाऱ्या उत्पन्नामध्येच मोठमोठाली दिग्विजयी सैन्ये पोसणे आणि त्याबरोबरच सौंदर्य व कलाना इतक्या तऱ्हेने उत्तेजन देणे या गोष्टी त्याना कशा साधता आल्या याचे कोणासही आश्चर्य वाटेल चिरकाल टिकणारा अभ्युदय व प्रजावत्सल व सौम्य अशी राज्यपद्धति ह्याच्या योगेच ह्या गोष्टी सिद्ध होऊ शकतील"

**१५. सरदारांच्या हातांत खरी सत्ता. (Feudalism.)** राजा व प्रजा ह्याचे सबध अशा प्रकारचे राहिले तेव्हाच राज्यकारभार सुरळीत चालू शकले पण खरे पाहिले तर राजपूत राज्यातील खरी सत्ता राजाच्या हाती नसून सरदाराच्याच हाती होती देशातील पुष्क-

ळशी जमीन त्याच्या ताब्यात असून त्या जमिनीच्या उत्पन्नावर त्यानी फौज बाळगावी व राजा बोलावील त्या वेळी त्याच्या सेवेत फौजेसह तत्पर व्हावे अशी योजना असे ह्या सरदाराचे अगदी अलीकडल्य काळात म्हणजे १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात फारच पतन झाले बाकी तत्पूर्वीच्या एकदर हजार वर्षांच्या काळात त्याच्या कर्तबगारीकडे पाहिले तर त्यानी उत्कृष्ट देशाभिमान व प्रजाहिततत्परता व्यक्त केली आहे असेच कबूल करावे लागेल आपला राजा न्यायाने व प्रजाहितैषी बुद्धीने वागतो किंवा नाही व आपल्या देशाचे सरक्षण करतो किंवा नाही ह्या गोष्टीकड त्यानी डोळयान तेल घालून लक्ष दिले जेव्हा जेव्हा राजा अन्यायी, जुलमी अथवा नालायक निघाला तेव्हा तेव्हा त्यास बाजूस सारून त्यानी सर्व सत्ता आपल्या हाती घेऊन देशाचे सरक्षण केले अथवा प्रजेची जुलमापासून मुक्तता केली या दृष्टीने राजपूत राजामध्ये काही थोडया सत्ताधारी सरदाराची हुकमत असल्याने तिला Aristocratic form of Govt उर्फ 'सरदारशाही' असे आधुनिक भाषेत म्हणता येईल वास्तविक Oligarchy आणि Aristocracy ही एकाच राज्यपद्धतीची म्हणजे काही मूठभर लोकाच्या हातात सत्ता असलेल्या राज्यपद्धतीची नावे होत तथापि त्यातल्या त्यात अनुक्रमे सत्तेचा सदुपयोग व दुरुपयोग करण्याच्या दष्टीने पहिलीला Aristocracy व दुसरीला Oligarchy अथवा मराठी सज्ञा वापरावयाच्या म्हणजे पहिली 'सज्जनशाही' व दुसरी 'दुर्जनशाही' अशी नावे देऊन त्याच्यात आरिस्टॉटलने भेद दाखविला आहे व तो बहुतेक राज्यशास्त्रज्ञास समत आहे सिज्विकनेही Aristocracy उर्फ सज्जनशाहीची व्याख्या ऑरिस्टॉटलला अनुसरून ' कार्यहितदक्षता, सुशिक्षितपणा व राज्यकारभाराचा अनुभव या सद्गुणविशेषानी युक्त असलेल्या लोकाची राज्यपद्धति ' अशीच केली आहे व या व्याख्येनुसार राजपूत सस्थानातून सामान्येकरून ही सज्जनशाहीच प्रचलित होती व राजास नेहमी सरदाराच्याच तत्राने वागावे लागे असे दिसून येईल

१६ **सज्जनशाहीची नमुनेदार उदाहरणे** सरदाराच्या राजावर देखील चालणाऱ्या या हुकमतीची काही ठळक उदाहरणे येथे देणे अवश्य आहे

राणा सगाचा पुत्र विक्रमाजित हा अत्यत नालायक राज्यकर्ता निघाला त्याने जुन्या व प्रामाणिक सरदाराचाही भरदरबारात अपमान करावा, पहिलवानाच्या व दुर्व्यसनी लोकाच्या घोळक्यात बसून राहावे, आणि राज्यकारभाराकडे अजीबात दुर्लक्ष करावे अखेरीस त्याच्या नालायकीस व उद्दामपणास कटाळून राजपूत सरदारानी त्यास पदच्युत केले व राणा सगाचा बालपुत्र उदयसिह यास गादीचा वारस ठरवून त्याचा पालक या नात्याने त्याचा चुलत भाऊ बनबीर यास राज्यकारभारावर नियुक्त केले परतु सत्ता हाती आल्याबरोबर बनबीर उन्मत्त बनला व त्याने विक्रमाजिताचा खून करून उदयसिहास देखील ठार मारण्याचा प्रयत्न केला पण सुप्रसिद्ध पन्नादाईने त्याचे प्राण वाचविले पुढे सात वर्षेपर्यंत बनबीराचा धुमाकूळ तसाच चालू राहिला तेव्हा अखेरीस पुन राजपूत सरदारानी बनबीरला पदच्युत करून अज्ञातवासात असलेल्या उदयसिहास आणून सिहासनासीन केले अशा तऱ्हेने लागोपाठ दोन नालायक सत्ताधीशाना राजपूत सरदारानी काढून टाकले

**१७. राणा प्रताप—सरदारनियुक्त राजा.** पुढे उदयसिहही नालायक व आळशी निघाला हे पाहून मोगल बादशाद अकबराने मेवाडवर चढाई करून चितोडगडास वेढा दिला उदयसिह पळून गेला परतु राणी कर्मवतीच्या उत्तेजनाने राजपूत सरदारानी सर्व सत्ता आपल्या हाती घेऊन स्वनामधन्य जयमल व पत्ता ह्याच्या नेतृत्वाखाली अकबराशी सामना दिला व देशाच्या स्वातत्र्यसरक्षणाच्या कार्यांत अद्भुत पराक्रम गाजवून व त्रिखड कीर्ति सपादन करून आपले प्राण अर्पण केले यानतर उदयसिहाने स्वत चा मृत्यु जवळ आलेला पाहून परपरागत न्याय व नीति याचा काही एक विचार न करता आपला धाकटा पुत्र जगमाल यास युवराज नेमले रा ब ओझाजी म्हणतात "सर्व सरदार उदयसिहाची दहनक्रिया करण्यास गेले होते ग्वाल्हेरचा राजा रामसिह याने मडळीत जगमाल दिसेनासा पाहून राजपुत्र सगरजीस विचारले 'जगमाल कोठे आहे ?' सगरने उत्तर दिले 'स्व० महाराण्याने त्यास आपला उत्तराधिकारी नेमला आहे हे आपणास विदित नाही काय ?' यावर अखैराज सोनगऱ्याने रावत कृष्णदास व सागा याना म्हटले, 'आपण चोडयाचे वशज

असल्याने हे कार्य आपल्याच समतीने व्हावयास पाहिजे बादशाह अकबरासारखा शत्रू डोक्यावर आहे चितोड हातातून गेला आहे व मेवाड उजाड झाला आहे अशा स्थितीत हे घरगुती भाडण काढले तर राज्य नष्ट होईल यात शका नाही ' रावत कृष्णदास व सागा यानी उत्तर दिले 'ज्येष्ठ पुत्र प्रतापसिह हा होय तोच सर्व प्रकारे योग्य आहे व तोच महाराणापदावर बसेल ' " ह्याप्रमाणे विचार ठरल्यावर उत्तरक्रिया आटोपून सर्व सरदार परतले त्या वेळी जगमाल सिहासनारोहणाचा समारभ करण्यात गर्क होता सरदारानी जगमालला सिहासनावरून उतरवून प्रतापसिहास गादीवर बसविले व जगमालला सागितले की, "तुझी बैठक राजसिहासना च्या समोर आहे तेथेच तुला बसले पाहिजे " अशा तऱ्हेने प्रख्यात प्रतापी प्रतापसिह मेवाडच्या गादीवर आला तो त्याच्या सरदारानी निवडलेला राजा होता ही गोष्ट अत्यत महत्त्वाची आहे

**१८. स्वातंत्र्याच्या प्रतिज्ञेचें स्मरण.** प्रतापसिहानतर त्याचा पुत्र अमरसिह गादीवर आला तो विलासी निघाला 'तू आमच्या सम्राज्याचा माडलिक हो ' म्हणून जहागीर बादशहाने त्यास फर्मान पाठविले त्या वेळच्या परिस्थितीचे आमच्या 'वीरोद्यान' नामक अप्रकाशित ग्रथात आम्ही पुढील प्रमाणे वर्णन केले आहे "बादशहाकडून त्यास फर्मान आले होते वीस वर्षांच्या आरामाने उत्पन्न झालेल्या शैथिल्यामुळे त्याचा स्वीकार करावा असे त्यास वाटू लागले युद्धाची भीषण चित्रे त्यास भेडसावू लागली केवळ काल्पनिक मानापमानाच्या व गौरवाच्या भावनेसाठी मेवाडची समस्त प्रजा बरबाद करणे त्यास प्रशस्त वाटेना.

"मोगलाच्या रणभेरी सीमाप्रान्तावर झडत असताना त्यास उत्तर देण्यासाठी राजपूती नगारे नगराबाहेर काढण्याऐवजी राणा अशा दुर्बळ मनोवृत्तीत गढून गेला असल्याचे सरदाराना आढळून आले सलूम्ब्याच्या चोडावत सरदाराने सर्व सरदाराना, त्यानी राणा प्रतापच्या मृत्युसमयी त्याच्या पायाशी बसून व बाप्पा रावळच्या सिहासनाची शपथ घेऊन जी प्रतिज्ञा केली होती, तिचे स्मरण करून दिले सर्वांच्या अत करणात शपथेच्या स्मृतीने नवीन चैतन्य उत्पन्न केले

"आम्ही वाटेल ते कष्ट सहन करू

"आम्ही गुलामीची शृखला धारण करणार नाही

"आम्ही देशाच्या स्वातत्र्याकरिता मरू

"अशा त्यानी पुनश्च प्रतिज्ञा केल्या आणि सर्वांनी मिळून अमरसिहाच्या महालात प्रवेश केला त्या ठिकाणी युरोपीय बनावटीचा एक मोठा आरसा ठेवण्यात आला होता व राणा आमोदप्रमोदात मग्न होता चोडावत सरदाराने ललकारून प्रतापसिहाच्या आज्ञेचे पालन करण्याविषयी अमरला सुचविले आपल्या सुखसेवनात विघ्ने आणणाऱ्या या सरदाराचा त्यास अतिशय राग आला कपाळावर आठ्या घालून तो सर्वांच्याकडे पाहू लागला राणा मोहनिद्रेत गर्क असून आर्जवाच्या उपायानी त्याचे चित्त ठिकाणावर येणे शक्य नाही असे सर्वांना दिसून आले तेजस्वी चोडावताला हे सहन झाले नाही त्याने गादीच्या कोपऱ्यावरील पितळी वजन उचलले व वेगाने त्या मोहपूर्ण आरशावर फेकून मारून त्याचा चक्काचूर करून टाकला अमरचे चित्त व्यथित झाले एका हाताने अमरसिहाची भुजा धरून त्यास महालातून बाहेर ओढीत व दुसऱ्या हाताने आपले खड्ग विकोश करीत सलूब्र्याच्या त्या चोडावताने गर्जना केली—

"करा! सरदारानो, आपापल्या अश्वावर आरोहण करा!! आणि गौरवहीनतेपासून प्रतापच्या पुत्राचे रक्षण करा!!!

"अमरसिहाच्या चित्तात क्षणभरात नाना विकारलहरी उत्पन्न झाल्या त्याने राजद्रोही म्हणून चोडावत सरदाराचा धिक्कार करण्यास देखील कमी केले नाही पण भावी पवित्र कार्यावर दृष्टि ठेऊन त्याने ते सर्व सहन केले त्याने अमरसिहास अश्वारोहण करण्यास भाग पाडले क्रोधसतप्त झालेल्या अमरच्या नेत्रातून या अपमानामुळे अश्रूचा पूर वाहू लागला

"अशाच स्थितीत सर्व सरदार आपापल्या सेनासह पर्वतपठारावरून खाली उतरले राजपूत सेनेतील रणवाद्ये आपल्या आवाजाने आकाश दुमदुमू लागली वीस वर्षांत लढाई मारण्यास न मिळाल्याने समरसन्मुख झालेले राजपूत वीर आपापल्या तरवारी म्यानातून काढून व उच हवेत धरून त्याचा खणखणाट करू लागले रणमदाने मस्त झालेले अश्व वारवार खिकाळू लागले राणा अमर अद्याप अश्रुमोचन करीतच

होता बराच वेळ अश्रुमोचन केल्यानतर त्याचे किल्बिश पार धुवून निघाले त्याच्या मोहनिद्रेचा हळूहळू नाश झाला त्याचे हृदय स्वस्थ व शात झाले त्याच्या ठिकाणी कर्तव्यरवीचा प्रबोध झाला त्यासरशी त्याला वीर्याचे स्फुरण होऊ लागले त्याने मिशावरून हात फिरविला गर्जना करून वेग-वान सर्वांना त्याने एकदम थाबविले, कृतकर्माबद्दल सर्वांची क्षमा मागून त्याना अभिवादन केले व नतर सलूब्र्याच्या चोडावताकडे वळून तो म्हणाला, "चद्रावत सरदार, आमचे नेतृत्व धारण करा! तुम्हाला तुमच्या गत राण्याच्या मृत्यूबद्दल शोक करण्याची पाळी येणार नाही!! विश्वास ठेवा!!!" वरील जरा सविस्तर पण स्फूर्तिदायक वर्णनावरून राजपूत सरदाराचा त्याच्या राजावर केवढा प्रभाव असे व राष्ट्रीय सरक्षणाच्या कार्यांत ते किती दक्ष असत याची पूर्ण कल्पना येईल

**१९. दुर्जनशाहीत रूपांतर–बेबंदशाही.** परतु सरदाराचा हा राष्ट्राभिमान व प्रजाहिततत्परता शेवटपर्यंत टिकली नाही १८ व्या शतकापासून सज्जनशाहीचे दुर्जनशाहीत रूपातर होऊ लागले १९ व्या शतकाच्या प्रारभी पूर्ण दुर्जनशाही (oligarchy) स्थापित झाली होती. स्वार्थलपटपणा व जुलूम या दुर्गुणामुळेच राजपूत सरदारानी मराठे, पेंढारी व इग्रज यांच्या आहारी आपला देश दिला

एवच, राजपूत राज्ये अशा प्रकारच्या राजकीय स्थित्यतरातून गेली राज्यसत्तेची प्रस्थापना प्रथमत अनियत्रित राजसत्तेवर (Absolute Monarchy) झाली असली तरी तिचे लवकरच सज्जनशाहीत रूपातर झाले राजकुलात उत्पन्न झालेल्या, अतएव राजाच्या हाडामासाच्या (Kith and kin) सरदाराची सख्या जेव्हा वाढली तेव्हा त्याच्याच हाती सत्ता जाणे अपरिहार्य होते राजाच्या रक्ताशी त्यावा साक्षात् सबध असल्याने त्याना जशी राजाच्या कल्याणाची काळजी असे, तशीच ज्या मातृभूमीत आपण उत्पन्न होऊन लहानाचे मोठे झालो तिच्याही कल्याणाची काळजी त्याना वाटत असे मातृभूमीच्या व राजसिंहासनाच्या सरक्षणासाठी त्यानी अलोट स्वार्थत्याग केल्यामुळे व अद्वितीय शौर्य प्रकट केल्यामुळेच त्याचा राजावर अधिकार बसत गेला शिवाय, कित्येक प्रसगी काही कारणानी वडील भावानी स्वार्थत्यागपूर्वक व बापाच्या इच्छेस मान देऊन

सिंहासन धाकट्याच्या स्वाधीन केल्याने त्याच्या कुळात उत्पन्न झालेल्या पुरुषाना सर्वांच्या पेक्षा अधिक मान राजाकडून स्वाभाविकपणेच प्राप्त होत होता. चोंडावत सरदार हे अशाच प्रकारचे होते अशा प्रकारे आपल्या देशाकरिता व राजाकरिता स्वार्थत्याग करण्याची वृत्ति जोपर्यंत राजपूत सरदारात राहिली तोपर्यंत राष्ट्रीय सत्ता सज्जनशाहीवर आरूढ होती परतु स्वार्थसाधुपणाबरोबरच दुर्जनशाहीचा अवतार झाला १९ व्या शतकाच्या प्रारभी अत्यत लहान लहान घटकातून सत्तेची विभागणी झाली, प्रत्येक लहान मोठा सरदार व दहा शिपायाचा नायकही आपल्याच हाती खरी सत्ता आहे असे समजून वागू लागला राजाच्या पागेत त्याच्या खास हुकूमतीचा असा फक्त खास देखील घोडा उरला नाही, व राजा म्हणजे केवळ सिंहासनावरचे बाहुले बनून राहिला, तेव्हा दुर्जनशाहीतून एकदम बेबदशाही (Mobocracy) अवतरली व ह्याच अदाधुदीच्या काळात राजस्थानची राज्ये इग्रजाच्या स्वाधीन झाली

**२०. राज्यकारभाराचे कायदेकानू-स्मृतिग्रंथ.** आता ह्या ठिकाणी असा प्रश्न उद्‌भवतो की, राजा अथवा सरदार ह्याना राज्य-कारभार चालविण्याच्या बाबतीत काही कायदे अथवा नियम होते किंवा नाही ? अथवा हम करेसो कायदा अशी स्थिति होती ? ह्याचे उत्तर असे की, ज्या कायद्यानी सर्व हिंदू राजे आपणास बाधून घेत होते व ज्याच्या पलीकडे जाऊन त्याहून भिन्न अथवा त्यास विरोधी असा कायदा करण्याचा आपणास अधिकार नाही असे ते समजत असत त्याच ऋषि-प्रणीत स्मृत्युक्त कायद्यानी राजपूत राजेही बद्ध असत मनु अथवा याज्ञ-वल्क्यादिकानी शुद्ध, बुद्ध व मुक्त अशा अवस्थेत ईश्वरी प्रेरणेने करून ठेवलेले अतएव त्रिकालाबाधित स्वरूपाचे राजा व प्रजा याच्या सबधीचे कायदे पालन करण्यास राजपूत राजेही जबाबदार असत व अशा प्रकारे ईश्वरी चोदनेपुढे त्यानी आपला अधिकार मर्यादित करून घेतला होता ह्या ठिकाणी मनु व याज्ञवल्क्य यानी केलेले कायदे राज्यकारभाराच्या दृष्टीने किती उत्तम आहेत व त्याची मोठमोठ्या पाश्चिमात्य कायदेपडि-तानीही किती प्रशसा केली आहे हे सागण्याची गरज नाही पण राजपूत राजे त्याच्या तत्राने चालत होते एवढे सागितले म्हणजे त्याच्या राज्यात

राज्यकारभाराच्या दृष्टीने पूर्ण सुव्यवस्था होती हे वाचकाच्या लक्षात येईल, व एवढाच त्याचा निर्देश करण्यात हेतु आहे ग्रामपचायतीपासून व नगरसस्थेपासून तो जिल्हे व प्रात इत्यादिकापर्यंत सर्व प्रकारची सुव्यवस्थित राज्यव्यवस्था राजपुतात होती एवढी गोष्ट जरी वाचकानी लक्षात ठेवली तरी पुरे आहे

साराश, आजकालातल्या विचारवत, तत्त्वान्वेषी व शहाण्या लोकाच्या उत्तम राज्यव्यवस्थेच्या ज्या कल्पना आहेत त्या राजपूत समाजात विद्यमान होत्या त्याचा देशाभिमान तीव्र व प्रजाहिततत्परतेची भावना उत्कट होती, नालायक राजाना काढून टाकण्याचा अधिकार आपल्या हाती आहे व राजा हा जरी परमेश्वरी अश असला तरी प्रजाही त्याच परमेश्वराची लेकरे असून तिचे, आपल्या मातृभूमीचे, सस्कृतीचे व धर्माचे सरक्षण करण्याचे कार्य जर राजा नीटपणे करगार नाही व अन्यायाने वागू लागेल तर त्यास पदच्युत करून सर्व सत्ता आपल्या हाती घेण्याचा हक्क आपणास आहे, इत्यादि प्रकारच्या भावना त्याच्यात जागृत झाल्या होत्या असे निश्चितपणे म्हणता येते

---

## प्रकरण सहावें

# संकलित समालोचन

**१. संस्कृतीचें लक्षण.** सस्कृति म्हणजे काय ? तिची निश्चित स्वरूपाची अशी व्याख्या कोणीही ठरवू शकला नाही निरनिराळ्या व्याख्या पाहिल्या असता आम्हास ज्ञानकोशात दिलेली एक छोटीशी व्याख्याच बरी वाटली थोडी सोपी बनविण्याच्या दृष्टीने किंचित् फरक करून ती अशा तऱ्हेने माडता येईल—

"जातिराष्ट्रादिसघाना चरितस्य यत्साकल्य तत्सस्कृतिशब्देन व्यक्त भवति ।"

मनुष्याची एखादी जाति अथवा राष्ट्र अथवा त्याचाही सघ याच्या चारित्र्याचे जें साकल्य ते सस्कृतिशब्दाने व्यक्त होते असा या व्याख्येचा अर्थ

आहे ही व्याख्या अतिशय व्यापक आहे खुद्द ज्ञानकोशकारानीच म्हटल्याप्रमाणे "सस्कृतीचे अखिल मानवजातीची प्रगति अशा दृष्टीने परीक्षण करून शिवाय निरनिराळ्या मानव समाजाची प्रगति या मर्यादित अर्थानेही या शब्दाचा उपयोग होतो" एखाद्या विशिष्ट मानववशापासून अथवा जातीपासून तो राष्ट्रापर्यंत अथवा राष्ट्राच्याही सघापर्यंत ह्या व्याख्येची व्याप्ति वाढविता येते व प्रत्येकाला सस्कृति ही सज्ञा लावता येते

**२. राजकीय पेक्षा सांस्कृतिक इतिहास महत्त्वाचा** सस्कृतीची किमत फार मोठी असते कोणत्याही जातीच्या अथवा राष्ट्राच्या सपूर्ण शरीराचे व आत्म्याचे चित्र डोळ्यासमोर आणावयाचे असेल तर त्याच्या सस्कृतीकडेच लक्ष पुरविले पाहिजे राजकीय अथवा सामाजिक इतिहास त्या समाजाची फार तर एक बाजू आपल्या समोर धरील पण सास्कृतिक इतिहासाचे तसे नाही ज्ञानकोशकार औचित्यपूर्णतेने म्हणतात, "स्थानिक इतिहास जितके महत्त्वाचे त्याहूनही सास्कृतिक इतिहास अधिक महत्त्वाचे आहेत फार मोठ्या जनसख्येवर परिणाम घडविणाऱ्या आणि आपल्या विविध शक्तीचा उपयोग करणाऱ्या अशा शक्ति राजकीय नसून सास्कृतिक असतात राष्ट्राचे इतिहास हा सस्कृतीच्या इतिहासातील एक अल्प भाग होय"

**३. संस्कृतीच्या शाखा.** मानव्यतेची एका जाती, राष्ट्र अथवा सघ याच्या चारित्र्याचे साफल्य म्हणजे जर सस्कृति होय तर हे साफल्य बनते किती गोष्टीचे हेही पाहणे जरूर आहे ह्या साफल्यासबधीची व्यापक कल्पना देण्याचा ज्ञानकोशकारानीच पुढीलप्रमाणे प्रयत्न केला आहे "सास्कृतिक स्थिति शोधावयाची तर सस्कृतीची अनेक अगे म्हणजे खाद्येपेये, वस्त्रेविभूषणे, गृह आणि तदनुषगाने वायव्य, ग्राम्य व आरण्य पशु, मनुष्यामनुष्याचा सबध, विवाह, व्यापार व राज्यव्यवस्था आणि समाजव्यवस्था याचा विचार केला पाहिजे मानवी कार्यक्रमात निश्चितता आणण्यासाठी केलेल्या कालमानादि गोष्टीकडे पाहिले पाहिजे तसेच मेलेले लोक उर्फ पितृगण, देव, दैवते, याच्याविषयीच्या कल्पनादि, यानी आयुर्नियमन कितपत होत होते हे पाहिले पाहिजे" कलकत्ता

हायकोर्टाचे माजी न्यायाधीश सरजॉन वुड्रोफ यानी आपल्या 'हिंदुस्थान सुसंस्कृत आहे काय ?' (Is India Civilised ?) नामक ग्रंथात, एखाद्या जातीची संस्कृति म्हणजे काय, असा प्रश्न उपस्थित करून त्याचे जे उत्तर दिले आहे ते वाचकास अधिक निश्चित स्वरूपाचे व ग्राह्य वाटेल अशी आशा आहे सर जॉन वुड्रोफ म्हणतात "जिला जातीय संस्कृति म्हणतात ती सुद्धा, पुन, त्या जातीच्या आत्म्याचे अथवा प्रकाशमान ओजाचे स्फुटीकरणच होय हा आत्मा ज्ञानशक्ति (Thought) इच्छाशक्ति (Will) आणि क्रियाशक्ति (Action) याच्या स्वरूपात प्रकट होत असतो व ह्या शक्तीनाच आपण धर्म व तत्त्वज्ञान, कला व साहित्य आणि सामाजिक जीवनाशी संबंध येणाऱ्या संस्था या नावानी ओळखीत असतो" अर्थात संस्कृति म्हणजे त्या जातीच्या ठिकाणी जे प्रकाशमान ओज, जो आत्मा अथवा रसरसून वाहणारी चैतन्यशक्ति असेल तिचे स्फुटीकरणच होय व हे स्फुटीकरणच वर दिलेल्या स्वरूपात होत असल्याने त्याना संस्कृतीच्या शाखा अथवा अंगेउपांगे म्हणता येईल प्रस्तुत ग्रंथात केलेल्या राजपूत संस्कृतीच्या पर्यालोचनात आम्ही सर जॉन वुड्रोफचा हा दृष्टिकोणच धारण केला आहे व त्या अनुषंगाने धर्मसंस्था, कला व साहित्य, स्त्रिया, सामाजिक खेळ, सणसमारंभ वगैरे आणि राजकीय कल्पनांचा विकास या संबंधीचे विवरण केले आहे

**४ चौऱ्याण्णव लक्ष राजपूत जाति.** आज हिंदुस्थानात राजपूत जातीचे एकूण ९४ लक्ष लोक आहेत ते पंजाब, संयुक्त प्रांत, बंगाल, बिहार, मध्य-भारत, मध्यप्रदेश व वऱ्हाड आणि महाराष्ट्र इतक्या विशाल भूपृष्ठावर पसरलेले आहेत तथापि राजस्थान हे त्याचे केंद्रस्थान होय ह्या केंद्रस्थानी राजपूत जातीची जनसंख्या अवघी सात लक्ष आहे परंतु मागील प्रकरणात दिसून आलेले तिचे सांस्कृतिक वैशिष्ट्य पाहावयाचे असेल तर ते ह्या सात लक्षातच सापडते इतरात तितक्या ठळकपणे सापडत नाही म्हणून राजपूतांच्या संस्कृतीचा विचार करताना ह्याच सात लक्ष जनसमुदायाकडे व ज्या भूप्रदेशावर ते वास्तव्य करतात त्याच्याकडे कोणाही तत्त्वान्वेषी पुरुषाचे लक्ष प्रथमत च आकृष्ट होते शिवाय कुलगुरु नानासाहेब वैद्य म्हणतात त्याप्रमाणे "ज्याच्या वंशवृक्षाची मुळे अखंडपणे

नवव्या शतकापर्यंत मागे गेली आहेत अशी या व्यतिरिक्त, राजघराणी पृथ्वीच्या पाठीवर कोठेही सापडावयाची नाहीत " आणि म्हणूनच राजपूत मस्कृतीचा विचार करताना प्रामुख्याने राजस्थानचा विचार करावा लागतो व त्यानली जी ही प्राचीन राजघराणी आपल्या मोडक्या तोडक्या का होईना पण स्वातत्र्यासह जिवत आहेत त्याचे अस्तित्व दृष्टीआड करून चालत नाही

**'. स्पर्धाक्षेत्रांतील संस्कृतींची लढत.** राजपूत सस्कृति ही जिवत सस्कृति आहे, मृतकल्प नाही. हिदु अथवा वैदिक सस्कृतीशी स्पर्धा करण्यासाठी ८ व्या शतकात यावनी मस्कृति भरतखडाच्या मैदानावर उतरली हिदु मस्कृतीची व यावनी सस्कृतीची ही लढत सतत एक हजार वर्षे चालली हिदुसस्कृतीच्या आखाड्यातील बाकीचे पहेलवान यावनी सस्कृतीच्या प्रभावशाली आक्रमणाखाली चीत व नामोहरम झाले असता ज्या एका पहेलवानाने तिची टाग उलटवून तिच्यात गळयान घातली व तिचे दात पाडले तो पहेलवान म्हणजे राजस्थानातील राजपूत राष्ट्रें होत हिदु सस्कृति व महमदी मस्कृती याच्या लढ्यात समस्त हिदु जातीचे तेज राजपूताच्या द्वारा प्रकट झाले म्हणून वस्तुत ह्या लढ्याचा इतिहास म्हणजेच राजपूत सस्कृतीचा इतिहास होय मुडकोपनिषदात म्हटल्याप्रमाणे

यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनू स्वाम् ।।

" परमेश्वराची ज्याच्यावर कृपादष्टि होते, त्याच्याच देहातून तो प्रकट होत असतो " अशा भाग्यशाली देहापैकी राजपुताचा देह होय, मराठ्याचा देह होय व शिखाचा देह होय या तीनही देहातून वैदिक सस्कृतीचे तेज व चैतन्य प्रकट झाले आहे दोन सस्कृतीची स्पर्धा सुरू झाल्याबरोबर प्रथम हे तेज राजस्थानच्या शरीरातून प्रकट झाले राजपूत देहातून प्रकट होणाऱ्या हिदुजातीच्या आत्म्याचा हा ज्योतिस्फोट सतत हजार वर्षे टिकला मराठे व शीख ह्याही अशाच भाग्यवत जाती खऱ्या ! त्याच्याही मस्तकावर परमेश्वरी वरदहस्त राहिला परतु त्याचे तेज पहिलीचे दोन शतके व दुसरीचे एक शतक इतकेच टिकले. त्या दृष्टीने राजपूत जातीचे भाग्य अधिक थोर ! जिने भयकर बिकट अशा स्पर्धाक्षेत्रात वैदिक सस्कृतीचे मस्तक उन्नत, मुखउज्ज्वल व दृष्टि स्वातत्र्याभिमुख ठेवली त्या राजपूत

जातीचे व तिच्या सस्कृतीचे समस्त हिंदु लोक ऋणी आहेत व राहतील यात शका नाही

**६. जगड्व्याळ संघटनेचे प्रयत्न.** आज परमेश्वराची ही कृपा कोण्या एका विशिष्ट जातीवर राहिली नसून तिचे पाघरूण समस्त भरतवर्षावर पसरले आहे सध्या नवतेजाचे वारे अखिल हिदुस्थानभर वाहत आहे आधुनिक भरतवर्षाला यावनी व ख्रिस्ती अशा दोन सस्कृतीशी स्पर्धा करावी लागत आहे स्पर्धेचे क्षेत्रही अत्यत व्यापक झालेले आहे सर्व जगाचे एक राष्ट्र बनवून त्याची अशी एक भव्य सस्कृति बनवावी ? की, जिच्यात बाकीच्या लहान लहान सस्कृति सुखाने नादतील असा आतरराष्ट्रीय सघ (World Federation) निर्माण करण्याचा प्रयत्न करावा ? समुद्रास मिळणाऱ्या नद्या जशा आपले स्वतत्र अस्तित्व विसरतात तशी जगातील सर्व सस्कृतीची ह्या व्यापक सस्कृतीत समरसता झाली पाहिजे, अशी काहीची अपेक्षा आहे पण वैदिक सस्कृति ही नदी आहे का ? का ती स्वतःच समुद्र आहे ? व तिच्यातच बाकीच्या सस्कृति मिळावयाच्या आहेत ? भविष्य काळाच्या उदरात काय लिहिले आहे ते कुणी सागावे ? पण ह्या जागतिक स्पर्धेत "भरतवर्षाचे लोक आजपर्यंत आपण त्याना जसे ओळखीत आलो, तशा वैशिष्टयपूर्ण हिदु जीवनासह जगतील काय ? आपले स्वत्व गमावणारे लोकही त्याच्यात निर्माण होत आहेत" अशी सर जॉन वुड्रोफप्रमाणेच आम्हासही चिता वाटते म्हणून भविष्यकालात कितीही महत्त्वाचे फेरबदल झाले तरी भारतातील वैदिक सस्कृतीच्या बीजाचे सरक्षण हे केलेच पाहिजे त्याचा केव्हाना केव्हा तरी विशाल वृक्ष होईलच.

**७. संस्कृतीचा अभिमान धरा.** हे सरक्षण करावयाचे म्हणजे प्रत्येकास आपल्या सस्कृतीचा अभिमान वाटला पाहिजे हा अभिमान वाटण्याचा मार्ग म्हणजे तिच्या इतिहासाचे अध्ययन करणे होय. प्रचड स्पर्धाक्षेत्रातील वैदिक सस्कृतीचा इतिहास म्हणजेच राजपूत सस्कृतीचा इतिहास असल्याने तिचे अत्यत स्थूल व विहगम दृष्टीचे पर्यालोचन करण्याचा प्रयत्न ह्या ग्रथात केला आहे त्यातून सस्कृतीची अनेक उपागे सुटली आहेत राजपूत जाति ही इतर मानव समाजाप्रमाणे

दोषापासून सर्वथा अलिप्त नाही पण हे दोषदिग्दर्शनाचे कार्य अनेक लोक अनेक हेतूनी आपापल्या परीनी करीतच असतात त्यामुळे त्याची येथेही पुनरावृत्ति करण्याची जरूर वाटली नाही शिवाय प्रत्येक वस्तु दिक्कालावच्छिन्न असल्याने हा ग्रथही त्यास अपवाद असू शकत नाही

८ **सामुदायिक प्रार्थना.** आता थोडे खुद्द राजपूत जातीस उद्देशून लिहिणे जरूर आहे हिंदुस्थानातल्या ९४ लक्ष राजपुतानी सघटित होण्याचा व परस्पराकडे आपुलकीच्या भावनेने पाहण्याचा काल आता आला आहे आपल्या पूर्वजाच्या पराक्रमाकडे व त्याच्यामधून प्रकट झालेल्या ईश्वरी तेजाकडे त्यानी लक्ष दिले पाहिजे राजस्थानच्या सात लक्ष राजपुतावर तर ही जबाबदारी विशेष आहे स्पर्धाक्षेत्रात ते फारच मागे पडत चालले आहेत व त्याची मानसिक दुर्बलता वाढत आहे सर्वच सस्थानी प्रजेला तिच्या पूर्वतेजाचे विस्मरण पडत आहे तीच स्थिति पूर्वी ज्याच्या ज्याच्या पूर्वजानी पराक्रम गाजविला व तेजस्वीपणा प्रकट केला त्या बहुतेक जातीची आहे त्या सर्वांनी उपनिषदाच्या खालील तेजस्वी व उद्बोधक वचनात ग्रथित करून ठेवलेल्या प्रार्थना नेहमी केल्या पाहिजेत

**असतो मा सद्गमय ।**
**तमसो मा ज्योतिर्गमय ।**
**मृत्योर्मा अमृतङ्गमय ।**

'मला असत्यापासून सत्याकडे ने
मला अधारापासून तेजाकडे ने
मला मृत्यूपासून अमृतत्वाकडे ने'

॥ इति शम् ॥

## परिशिष्ट

# राजस्थानची सद्यःस्थिति : सामाजिक दिग्दर्शन

लेखक दिवाकर बळिराम गडकरी, एम् ए

१. **प्रास्ताविक.** श्रीयुत हरिहरराव देशपाडे ह्यानी आपल्या तेजस्वी वाणीने आतापर्यंत केलेले पुण्यप्रताप राजपुताच्या अमरकीर्तीचे रसभरित वर्णन वाचून वाचकाची अत करणे एक प्रकारच्या अद्भुत भावनेत रगून गेली असतील ह्यात काही सशय नाही राजपुताच्या सस्कृतीचा उदारपणा आणि तेजस्विता याची कल्पना सामान्यत्वेकरून या पुस्तकावरून वाचकास पूर्णपणे येईल असे मला वाटते त्यामुळे हे पुस्तक वास्तविक येथेच सपावयाचे परतु मनुष्याच्या मनाचा असा एक सहज धर्म आहे की एखादी मनोरजक गोष्ट ऐकली म्हणजे तिच्यापासून झालेल्या तृप्तीच्या आनदात त्या गोष्टीतील व्यक्तीची कल्पनाचित्रे रेखाटीत बसण्यात त्याला मोठी मौज वाटते व त्या व्यक्ति कशा असतील, त्याचे पोषाख कसे असतील, ते चालले कसे असतील, बोलले कसे असतील, याची चित्रे तो आपल्या मनात काढतो प्रस्तुत पुस्तकाने राजपूत सस्कृतीची कल्पना येऊन, राजपूत लोक मनात भरल्यावर त्याच्याविषयी देखील अशी चित्रे रेखाटण्याची प्रवृत्ति कित्येक वाचकास होणे साहजिकच आहे अशा वाचकाच्या कल्पनेतील चित्राना पूर्णता येण्यास थोडी बहुत मदत म्हणून ह्या भागातील सामग्री वाचकाच्या पुढे ठेवण्यात येत आहे आणि त्या दृष्टीनेच त्यानी या भागाकडे पाहावे

२. **राजपूत लोक—वैदिक क्षत्रियांचेच अस्सल वंशज.** राजपुताचा वश हा अस्सल वैदिक क्षत्रियाचाच असून तो मुळात परकीय नाही हे श्री देशपाडे यानी आपल्या पुस्तकात दाखविलेच आहे इतिहाससशोधकास कधी कधी लहर येऊन आपल्या कमी अधिक विद्वत्तेप्रमाणे त्यानी राजपूत

वश परकीय असल्याची विधाने केलेली आढळतात अर्थात त्याला वेळोवेळी सडेतोड उत्तरेही मिळत गेली आहेत मागे कै राजवाडे यानी सरस्वती-मदिर मासिकातून अशा तऱ्हेचे उत्तर दिले होते श्री चि वि वैद्य ह्यानीही आपल्या 'मध्ययुगीन भारता'त राजपूत मुळात परके नाहीत असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे तरी, अगदी अलीकडील ठळक उदाहरण म्हणजे डॉ केतकरासारखे अजस्र सशोधक आपल्या 'प्राचीन महाराष्ट्रा'त मोठ्या शिताफीने राजपूत वश मुळात परकीय असल्याचे सूचित करतात "उदेपूरचे राजे शक आहेत असा जो वाद उत्पन्न झाला त्यात काही ऐतिहासिक सत्य आहे की तो केवळ प्रवाद आहे याविषयी आज भिन्न मते आहेत तथापि श्रीमाळी ब्राह्मण हे मगाच्या वशातून उत्पन्न झाले आणि शकातून उदेपूरचा राजवश निघाला ह्या गोष्टी आज शक्यतेच्या बाहेर वाटत नाहीत" उदेपूरचे राजपूत घराणेच मुळी शक किंवा मगाचे वशज आहे असे प्रतिपादन करण्याचा त्याचा प्रयत्न दिसतो ह्यासबधी येथे थोडा विचार केल्यास अप्रस्तुत होणार नाही असे वाटते

डॉ केतकराच्या मताप्रमाणे उदेपूरचे घराणे परकीय आहे हे जर खरे असेल तर त्या घराण्याला सर्व राजपुताच्या घराण्याकडून अग्रमान का दिला जातो हे कळत नाही येथे बरीच वर्षे राज्य केलेल्या इतर घराण्यानी उदेपूरच्या घराण्याला हा जो मान दिला तो केवळ त्याचे गुप्त, अशोक किंवा राष्ट्रकूटासारखे सार्वभौमत्व किंवा अतुल पराक्रम ह्याला नमून दिला असावा असे दिसत नाही उदेपूरचे घराणे पराक्रमी तर खरेच, पण ते राजपुतान्याच्या बाहेर मात्र फारसे गेले नाही तेव्हा त्याचा जुनेपणा, अस्सलपणा व तदतर्गत जो मोठेपणा त्यामुळेच हा मान त्याना मिळतो हे उघड आहे.

उदेपूरचा राजवश शक वा मग (शक व मग हे एकाच डाहळीच्या दोन शाखा आहेत हे दाखविण्याचा प्रयत्न एक समीकरण माडून त्यानी केलेला दिसतो) असावा असे जे डॉक्टरसाहेबाना वाटते त्यात दुसरी एक अडचण आहे श्रीमाळी ब्राह्मण हे इतके दिवस राजस्थानमध्ये राहून अजून तेथील इतर ब्राह्मणाशी एकजीव होऊ शकले नाहीत आणि उदेपूरचे राजघराणेच

कसे हिंदु वर्णव्यवस्थेपैकी अस्सल क्षत्रियाशी एकरूप झाले ? ही विसगति डॉक्टरसाहेब कशी स्पष्ट करतात कोण जाणे !

तिसरी एक अत्यत महत्त्वाची गोष्ट नजरेसमोर येते ती अशी की जेवढे शक हिंदुस्थानात आले व हिंदुधर्माचे अनुयायी झाले तेवढयानी वैष्णव पथ स्वीकारला, एवढेच नाही तर विष्णुभक्ती कडेच त्याची सर्व ओढ दिसून यते त्याच्या उलट राजपुताचा 'एकलिगजी' दृष्टीसमोर आणला म्हणजे राजपूत हे शिवशक्ति उपासक असून त्याच्यापैकी सर्वमान्य असे जे उदेपूरचे राजघराणे त्यातील पुरुष स्वत स 'एकलिगजीचे दिवाणजी' म्हणवून घेतात तेव्हा ते त्या वैदिक परपरेला चिकटून असलेले वैदिक आर्यांचेच वशज आहेत असे स्पष्ट होते

उदेपूरचे घराणे इ स ६ व्या शतकापासून आजनागायत मेवाडात एकसारखे राज्य करते आहे प गौरीशकर ओझा ह्यानी असे अभिमानोद्गार काढले आहेत की, साडेतेराशे वर्षे एका प्रदेशावर एकाच राजवशाने एकसारखे अव्याहत राज्य केल्याचे जगाच्या इतिहासात असे दुसरे उदाहरण नाही ज्या सस्कृतीमुळे हे सामर्थ्य या राजघराण्यात आले तिची आणि ती टिकविणाऱ्या या राजवशाची खरोखरच धन्य आहे ! इतिहासावरून आपणास असे निश्चित दिसून येते की हिंदुस्थानवर शकाचे आक्रमण अशोकानतर सुरू झाले आणि इ स च्या चौथ्या शतकात गुप्तानी त्याचे येथून उच्चाटन केले म्हणजे सरासरी तीन चारशे वर्षांचा काल त्याच्या येथील स्थायिकपणाला मिळतो एवढया काळात त्याची कित्येक घराणी इकडे स्थायिक होऊन त्यानी आर्य सस्कृतीचा स्वीकार केला असणे शक्य आहे या काळातील जे क्वचित् काही उल्लेख सापडतात ते देखील अशा लोकाच्या शकपणाचा स्पष्ट उल्लेख करणारे आहेत बेसनगरचा गरुडस्तभ उभारणारा वैष्णव असला तरी शक म्हणून त्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे साराश, आज ज्याप्रमाणे एकाद्याने ख्रिश्चनधर्म स्वीकारला म्हणजे तो लगेच आपल्या नावापासून सर्व पालटून टाकतो तशी त्या वेळेला स्थिति नव्हती आणि शकाचे वर्चस्व असताना तर तसे होण्याचे काही कारणही नव्हते अशा लोकाच्या मूळ जातकुळीचा आणि त्याच्या शकवशीयत्वाचा विसर पडून ते इकडच्या लोकात मिळून गेले असतील तर

ते नतरच वश आणि जाती याच्या शुद्धतेला जीव की प्राण समजणाऱ्या भारतीय लोकात असे होण्यास पुष्कळच काळ लागत असे चद्रगुप्त विक्रमादित्यापासून पुरी दोनशे वर्षे गेली नाहीत येवढया थोडया वेळात असे एकादे शक घराणे केवळ अस्सल भारतीय समजले जाणे, इतकेच नव्हे तर भारतीय क्षत्रियातील अतिशय श्रेष्ठ असा जो सूर्यवश त्याच्याच पैकी समजले जाणे, ही गोष्ट सामान्यत कोणासही असभवनीय कोटीतील वाटेल श्रीमाळी ब्राह्मण मग आहेत म्हणून त्यानी म्हटले आहे परतु अजूनही अस्सल भरतवर्षीय ब्राह्मणातून ते वेगळे उमटून पडतात असे त्यानीच म्हटले आहे म्हणजे बाहेरच्या लोकाना भारतीय सस्कृति पत्करून भारतीय लोकात अगदी नि शेष जिरून जाण्यास किती भयकर काळ लागतो हे त्यानीच दाखविले आहे कारण चद्रगुप्त मौर्यानतर, आणि त्याच्या वेळीही, इतकेच नव्हे तर त्याच्या पूर्वीही, पुष्कळ काळ पार्शी लोकाचा हिदुस्थानशी सबध आक्रमक म्हणून तुटून गेला होता तेव्हा श्रीमाळी ब्राह्मण हे मग–पार्शी आहेत असे घटकाभर कबूल करून पाहिले तरी अडीच हजार वर्षांत जी गोष्ट त्याना शक्य झाली नाही ती शक लोकाना अडीचशे वर्षांत साधली असे म्हणणे हास्यास्पद वाटते

३. **लोकसंख्या, समाज व जाती.** राजस्थानचा पूर्वभाग हा जलार्द्र, सुपीक व वसतियोग्य असल्यामुळे त्या भागातील वस्तीही विशेष दाट आहे अलवार, जयपूर, धोलपूर व भरतपूर ही पूर्वेकडील सस्थाने सर्वांत अधिक दाट वस्तीची आहेत जयपूर सस्थानात लोकवस्तीचे प्रमाण दर चौरस मैलास १७१, धोलपूर मध्ये २३५, अलवारमध्ये २६४, तर भरतपूर मध्ये ३१६ इतके पडते याच्या उलट पश्चिमेकडील रुक्ष, वाळवटी प्रदेशात लोकवस्तीचे प्रमाण अल्प असलेले आढळते क्षेत्रफळाच्या दृष्टीने राजस्थानातील सर्वांत मोठी राज्ये–जोधपूर, बिकानेर व जेसलमीर–पश्चिमेकडील भागातच आहेत परतु त्यातील लोकसख्या पूर्वेकडील छोटया सस्थानाच्या मानाने फार कमी आहे पश्चिमेकडील सस्थानापैकी जोधपूर उर्फ मारवाडमध्ये दर चौरस मैलास ५५ मनुष्ये इतके लोकवस्तीचे प्रमाण आहे जोधपूरच्या उत्तरेकडील बिकानेर सस्थानात हे प्रमाण दर चौरस मैलास २५ इतके आहे तर वायव्येकडील

जेसलमीर संस्थानात हे प्रमाण दर चौरस मैलास फक्त ४५ इतके आहे. पसतीस हजार चौरस मैल क्षेत्रफळ असलेल्या जोधपूर संस्थानची लोकसंख्या एकोणीस लक्षाच्या आतच आहे, तर त्याच्या निम्याहूनही कमी विस्तार असलेल्या जयपूर संस्थानची लोकसंख्या सत्तावीस लक्षावर आहे तेवीस हजार चौरस मैल क्षेत्रफळाच्या बिकानेर संस्थानात एकदर मनुष्य वस्ती सुमारे साडेसहा लक्ष आहे, तर सोळा हजार चौरस मैल, म्हणजे जवळ जवळ वऱ्हाड इतके क्षेत्रफळ असलेल्या जेसलमीर संस्थानातील वस्ती अवघी सत्तर हजार आहे

धर्माच्या दृष्टीने पाहिले असता राजस्थानात हिंदूच्या संख्येचे प्रमाण इतर सर्व धर्माच्या संख्येच्या मानाने फार मोठे आहे हे साहजिकच आहे सरकारी गणतीप्रमाणे एकदर लोकसंख्येपैकी शेकडा ८३ लोक हिंदु आहेत मुसलमानाची संख्या एकदर लोकसंख्येच्या मानाने शेकडा ९ ५ इतकी असून पिशाच अथवा जडवस्तूचे पूजक (Animists) शेकडा ३ ७५ व जैन शेकडा ३ ५ इतके आहेत सरकारी गणतीनुसार भिल्ल, गिराशी इत्यादि रानटी लोक पिशाचपूजक म्हणून निराळे गणले जात असले तरी हिंदु संस्कृति व हिंदु चालीरीती याचा प्रभाव त्याजवर विशेष असल्या-कारणाने आणि त्याचे धार्मिक विधि व रिवाज हिंदु संस्कृतीत समाविष्ट होण्याजोगे असल्याकारणाने त्याची गणना हिंदूतच करण्यास खरोखरी हरकत नाही डोगर, नद्या, वृक्ष किंवा देवी, महामारी इत्यादि रोग याच्या ठायी अदृश्य देवता वास करीत असून त्याच्या कृपेवर मनुष्याचे जीवन अवलबून असते, असा या रानटी लोकाचा समज असतो या समजानुसार नद्या, धोडे, झाडे इत्यादि जडवस्तूना बळी देऊन व जतर मतर करून हे त्याची आराधना करितात ह्या जडवस्तुपूजक भिल्ल व गिराशी लोकाची वस्ती दक्षिणेकडील बासवाडा, डुगरपूर, प्रतापगड इत्यादि संस्था-नातूनच विशेषत असलेली आढळते

मुसलमानापैकी जे एतद्देशीयामधूनच बाटलेले आहेत, त्याच्यावर हिंदु संस्कृतीची व चालीरीतीची छाप अद्याप कायम आहे स्थानिक देवता व अवतारी सत याची पूजा मुसलमान लोक करितात व लग्नादि कौटुबिक कार्यांत मुसलमान काजीबरोबर ब्राह्मण पुरोहित हाही उपाध्येपण करितो

तात्पर्य धर्ममताच्या दृष्टीने हे मुसलमान असले तरी बाह्य आचाराच्या दृष्टीने हिंदूशी याचे बरेच साम्य दिसते

जैनाचे दिगम्बर, श्वेताम्बर व धूडिया असे तीन पथ आहेत दिगबराचे देव व साधु पूर्ण नग्न असतात व या पथाप्रमाणे स्त्रियाना मोक्ष नाही उलट श्वेताबराचे देव श्वेतवस्त्रधारी असतात व त्याच्या मतानुसार स्त्रियाना मोक्षप्राप्ति होऊ शकते याच्यापासूनच निघालेला धूडिया पथ आहे त्याने अहिंसेचे तत्त्व पराकोटीस पोचविले असून ते देवाच्या मूर्तीऐवजी गुरूची पूजा करितात एकदर जैन वस्तीपैकी शेकडा ३२ दिगम्बर पथी, शेकडा ४५ श्वेताम्बर पथी व बाकीचे धूडिया पथी आहेत

राजपुतान्यातील हिदुसमाज हा इतर प्रदेशामधील हिदु समाजाप्रमाणे भिन्न भिन्न जातीमध्ये विभागलेला आहे हे सागावयास नकोच सख्याबळानुसार त्याच्यामधील प्रमुख जाती अगर समाज ब्राह्मण, जाट, महाजन चाभार, राजपूत, मिना, गुजर, भिल्ल याप्रमाणे सागता येतील. याशिवाय आणखी काही बारीक जाती आहेत, पण त्या सर्व येथे उल्लेखण्याइतक्या प्रमुख नाहीत आपण असे पाहतो की प्रत्येक समाजाचे किवा जातीचे काही तरी वैशिष्टय असते व आता ह्याच दृष्टीने वर उल्लेखिलेल्या जातीचा आपण क्रमश विचार करू

**ब्राह्मण**—ब्राह्मणाची लोकसख्या शेकडेवारीने पाहता १०४ म्हणजे दुसऱ्या कोणत्याही जातीपेक्षा मोठी आहे असे दिसून येते हे सर्व राजस्थानभर व विशेषत जयपूरमध्ये वस्ती करून राहिले आहेत. ह्याचा धदा धार्मिक कृत्ये सपादण्याचा पाढरपेशा धदा किवा शेती करण्याचा दिसतो बहुतेक ब्राह्मणाना शेतसारा माफ आहे व त्यामुळे राष्ट्रावर काय आपत्ति आली आहे हे मागे सविस्तर आलेच आहे

**जाट**—ह्यानतर दुसरी मोठी जात जाटाची दिसते ह्याच्या लोकसख्येचे प्रमाण शेकडा ८७ आहे बिकानेर, किसनगड व जोधपूर ह्या ठिकाणी ह्याची वस्ती फार आहे. हे शेतीभाती करतात एवढेच नाही, तर त्याच्यासारखे उत्तम शेतकरी नाहीत असा त्याचा लौकिक आहे. भरतपूर व धोलपूर या ठिकाणी राज्य करणाऱ्या राजाच्या जातीचेच हे लोक असल्यामुळे ह्याना राजकीय दृष्टया एक प्रकारचे महत्त्व प्राप्त

झाले आहे बिकानेरमध्ये तर तेथील राणा गादीवर बसू लागला म्हणजे त्याला तिलक लावण्याचा मान बिकानेरातील एका जाट कुळाकडेच आहे त्याशिवाय समारंभ यथासांग होत नाही अशी परंपरा चालत आली आहे

**महाजन**–ह्यांना बनिया या नावाने, अखिल हिंदुस्थानात ओळखतात शेकडा ७ ८ इतके ह्यांच्या लोकसंख्येचे प्रमाण दिसूत येते ह्यांच्या नावाबरोबरच त्यांचा आर्थिक जगातील मोठेपणा व तत्संबंधी उलाढाली नजरेसमोर आल्यावाचून रहात नाहीत हे लोक सर्व हिंदुस्थानभर पसरले आहेत ह्यांच्या संबंधी एक वाक्य येथे उद्धृत केले म्हणजे पुरे.

"There is hardly a town where the, thrifty denizen of the sands of western and northern Rajputana has not found his way to fortune, from a petty grocer's shop in a Deccan Village to the most extensive banking and broking connexion in the commercial capitals of both east and west India."

मराठी रूपांतर—पश्चिम व उत्तर राजपुतान्यातील रेताड भागातून पैसा मिळविण्याकरिता आलेला कंजूष मारवाडी ज्या गावात आढळणार नाही असा गाव विरळाच दक्षिणेतील एखाद्या छोटयाशा खेडयात तागडी घेऊन धंदा करणाऱ्या लहानशा वाण्याच्या दुकानापासून तों पूर्व आणि पश्चिम हिंदुस्थानच्या, व्यापारी राजधान्यामधून प्रचंड पेढ्याचे व्यापक आर्थिक व्यवहार हे लोक उलगडताना दिसून येतात

**चांभार**–शेकडा ७ वस्ती चांभाराची आहे चांभारकाम, मोलमजुरी किंवा शेतीची कामे करणारे हे लोक दिसतात हे आपल्यास ब्राह्मणाचे वंशज समजतात त्यासंबंधी एक मनोरंजक आख्यायिका आहे एकदा पांच ब्राह्मण भाऊ रस्त्याच्या बाजूला स्वयपाक करीत होते इतक्यात तेथे जवळच एक गाय येऊन मरून पडली तेव्हा ते मढे कोणी दूर न्यावे असा वाद उत्पन्न झाला तेव्हा त्यापैकी सर्वांत धाकटा भाऊ सदिच्छेने ते काम करावयास तयार झाला त्याने तसे केले पण पुढे ते सर्व वडील भाऊ त्यास 'चर्मकार' म्हणून दूर ठेवू लागले, ही दंतकथा कोण्या दृष्टीने मननीय आहे हे सुज्ञ वाचक पाहतीलच

**राजपूत**–शेकडेवारीने पाहता ६ ४ म्हणजे लोकसंख्येच्या बाबतीत चोथा नबर लागेल इतकी थोडी लोकसख्या राजपुताची दिसते ह्याचे समाज दोन, एक सूर्यवशी व दुसरा चद्रवशी उदेपूरचे सिसोदिया घराणे, जोधपूरचे राठोड घराणे व जयपूरचे कच्छवाह घराणे ही सूर्यवशी व करोलीचे जाडोन घराणे, जेसलमीरचे भाटो घराणे वगैरे लहान लहान घराणी चद्रवशी आहेत एकदरीने पाहता ह्या दोन्ही समाजात सरदारी वृत्ति नसानसातून खिळलेली दिसते आपले पूर्वज मोठे तरवारबहाद्दर होऊन गेले व त्यानी रक्त साडून कमाऊन ठेवलेली वतने आपण उपभोगीत आहोत ही जाणीवच अशा वृत्तीला कारणीभूत होत असावी अशा वृत्तीमुळे एखादा गरीब राजपूत देखील मोठ्या जमीनदाराइतका मानमरातब मिळावा अशी अपेक्षा करतो त्याला तरवार हातात बाळगण्याशिवाय दुसरा कोणताही धदा करणे कमीपणाचे वाटते तेव्हा हल्लीच्या काळी हे तरवारबहाद्दर मागे पडून लेखणीबहाद्दर पुढे सरसावले ह्यात नवल काय ?

राजपूत लोक हे राजस्थानावर राज्य करणाऱ्याच्या वर्गापैकी असल्यामुळे तेथील लोकसमाजात साहजिकच त्याचा दर्जा विशेष उच्च समजला जातो सत्ताधारी वर्ग तो असल्यामुळ राजस्थानातील बरीचशी जमीन त्याच्या मालकीची झाली आहे त्याच्यापैकी पुष्कळ लोक जमीनदार असून शेत कसणाऱ्या कुळाकडून ते खड घेतात पूर्वजाच्या मोठेपणाचा अभिमान व सरदारी वृत्ति याच्या अगात भिनली असल्यामुळे हे लोक सध्याच्या काळी आळशी बनलेले असून इतर कष्टाळू व उद्योगी जातीच्या मानाने मागे पडत चाललेले आहेत याच्या आळशी व मिजाशी वृत्तीमुळे स्वत शेती कसणे याच्या हातून नीट होत नाही

ह्याच्यात असगोत्र (exogamy) विवाहपद्धति असावी असे दिसते, त्याचप्रमाणे अनुलोम विवाहही प्रचलित आहेत अशा विवाहापासून होणारी सतति कोणत्याही दृष्टीने हीन समजली जात नसावी असे दिसते त्यामुळे त्याच्यात मुलीची सख्या जास्त वाढून हुडयाची पद्धत बरीच बोकाळली होती, पण वाल्टरकृत सभेने ह्या पद्धतीला बरेच सौम्य स्वरूप दिले आहे

**मिना**–मिना लोक राजस्थानचे आद्य रहिवाशी असून राज्यकर्ते होते असा समज आहे त्याचे अस्सल घराणे 'ओसर' आहे ह्याशिवाय

कमी दर्जाची पुष्कळ कुळे आहेत त्याचे दोन समाज आहेत एक जमीनदार आणि दुसरा चौकीदार पैकी जमीनदार लोक धीर, सद्वर्तनी व कष्टाळू शेतकरी म्हणून प्रसिद्ध आहेत ह्याच्या उलट चौकीदार वर्ग लूटमारीकरिता प्रसिद्ध असल्याचे दिसते

**गुजर व इतर कांही जाती**-अगदीच किरकोळ नव्हे पण वैशिष्टयपूर्णही नव्हे असा एक गुजराचा वर्ग आहे हा शेतीभाती व गौळीपणाचा धदा करतो गुजराचा व जाटाचा रोटीव्यवहार होण्याइतका सलोखा असला तरी ते जाटापेक्षा सामाजिक दृष्टीने कमीच लेखिले जातात

ह्याशिवाय भिल्ल व काही इतर रानटी जाती राजपुतान्यात असल्याचे दिसून येते पण ह्याचा शेतीवर किवा इतरत्र काबाडकष्ट करण्याकरिताच उपयोग होन असल्यामुळ राजकीय तर नाहीच पण सामाजिक दृष्टीनेही ते हीन स्थितीतच आहेत, हे सर्वसाधारण नियमास धरून आहे आज जरी अशी परिस्थिति असली तरी एक काळ असा होता की जेव्हा भिल्लाना राजकीय दृष्टीने मोठा मान असे उदेपूर दरबारी राजपूत व भिल्ल हे दोघे राज्यरक्षक समजले जात व त्याप्रमाणे त्याचा मानमरातब राखला जाई महाराणा अमरसिह (दुसरा) याच्या काळापर्यंत, अथवा इ स. १७३४ अखेरपर्यंत, उदेपूरच्या राजाला राज्याभिषेक होतेवेळी भिल्लाने आपली करागली मीराने चिरून तिलक लावण्याची चाल चालू असल्याची इतिहास साक्ष देत आहे भिल्ल लोकाचा लढाईंत तसा प्रत्यक्ष उपयोग होत नसला तरी शत्रूची रसद व खजिना लुटणे व अचानक छापे घालून शत्रूस बेजार करणे इत्यादि लहान पण अत्यत महत्वाची व उपयुक्त कामगिरी हे लोक करीत असत काल बदलला ! तरवारीच जेथे गज खात पडल्या तेथे भिल्लाच्या तिरकामठ्यास कोण विचारतो ? बिचारे आज 'अगदीच रानटी' झाले आहेत

**४. शेतीभाती व उद्योगधंद.** राजस्थान हा कृषिप्रधान देश आहे असे म्हटल्यास तेथील वालुकामय प्रदेश व पावसाची अवकृपा ह्या दोन गोष्टी नजरेसमोर येऊन सकृद्दर्शनी हे म्हणणे खोटे वाटेल वस्तुस्थिति मात्र उलट आहे तेथील शेकडा ५६ लोक शेतीवरच आपली उपजीविका करतात त्यापैकी शेकडा ५१ लोक जमिनीचे मालक आहेत व शेकडा

५ निवळ शेतावर मजूरी करणारे आहेत हे सर्व लोक अलीकडे दुसऱ्या विशेष धंद्याच्या अभावी आपल्या शेतवाडीला लागून राहतात त्यामुळे राजस्थानमध्ये गावातून राहणाऱ्या लोकसंख्येपेक्षा खेड्यातून राहणाराची सख्या किती तरी मोठी आहे अगदी प्राचीन कालापासून ह्या देशात शेतीलाच महत्व आहे व अलीकडे तर तरवार आराम करीत असल्यामुळे उदरनिर्वाहाला लहान मोठयाना शेतीशिवाय दुसरा चागला मार्ग नाही हे उघड आहे

शेतीच्या दृष्टीने अगदी उत्तम भाग म्हणजे पूर्वेचा अर्धा भाग सिरोही सस्थान व लुनी नदीचे खोरे हीच काय ती उत्तम सुपीक जमीन सोडली तर पश्चिम व उत्तरेकडील भाग रेताडच गणला जातो पूर्वेच्या भागाला पाऊस चागला होतो त्यामुळे ह्या भागाला सर्व तऱ्हेची समृद्धि असते गहू व जव ही धान्ये विनाआयास व वर्षातून दोनदा होतात ह्याच्या उलट जेसलमीर, बिकानेर, जोधपूर वगैरे बाजूस पाऊस तर नाहीच पण विहिरीचे पाणी सुद्धा ७५ फूट खोल असते व त्यामुळे कालव्याने ओलीत करणे सुद्धा अतिशय त्रासाचे असते जोधपूर व बिकानेरमध्ये कालव्याने पाणी देऊन गहू वगैरे होऊ शकतो, तसेच लूनी नदीस पूर आला म्हणजे जो गाळ नदीच्या बाजूस साचतो त्यातून पिके काढण्यात येतात इकडेही वर्षातून दोन पिके काढतात पण कोठेही लोकाना पावसाळी पिकावरच जास्त अवलबून राहावे लागते पावसाळी पिकाना त्याच्या देशभाषेत सिहाळू व हिवाळ्यातील पिकास उन्हाळू म्हणतात

पहाडी मुलखातून राहणाऱ्या भिल्ल लोकाच्या लागवडीचा प्रकार जरा वेगळा आहे. त्यास वाल्हर असे म्हणतात पहाडी जागेतून नागर फिरविणे अशक्य असते त्यामुळे तेथील झाडेझुडपे तोडून पाडून पेटवून देतात त्यामुळे जमीन अनायासे भाजली जाते व राख खात म्हणून उपयोगास येते

प्राचीन कालापासून शेतकरी लोकाना अफूचे उत्पन्न चागले होत असावे असे दिसते, पण अगदी अलीकडे ही लागवड कायद्याने नियमित केल्यामुळे शेतकऱ्याची एक मोठी उत्पन्नाची बाब नाहीशी झाली आहे शेतकऱ्याची दुसरी उत्पन्नाची बाब म्हणजे बागायती फळे व भाज्या होत. ह्या बाबीत राजस्थान कोणत्याही दृष्टीने मागे नाही आबे, पेरू, डाळिब,

लिंबू, केळी, चिंच वगैरे सर्व प्रकारची फळे व कोबी, गाजर, बटाटे, टमाटे वगैरे सर्व प्रकारच्या भाज्या भक्कम होतात व त्यामुळे शेतकऱ्याना चागले उत्पन्न होते ह्याशिवाय शेतकऱ्याचे दूधदुभत्याचे उत्पन्न न सागता कोणाच्याही लक्षात येईल उत्पन्नाच्या बाबीसबधी बोलल्यानतर लगेच त्याच्या सापत्तिक स्थितीचा विचार पुढे येतो ह्या बाबतीत सुद्धा तिकडील शेतकरी वर्ग आपल्या इकडील शेतकऱ्याइतकाच गाजलेला आहे सस्थानाकडून बी, बैल, विहिरी वगैरे सुधारण्याकरिता बिनव्याजी कर्ज मिळत असते. त्याचा फायदा लोक घेतात, शिवाय नापिकीच्या वर्षाला 'तकाई' म्हणून कर्ज मिळते ह्या कर्जापासून शेतकऱ्याना धोका नसतो परतु हे शेतकरी बोहऱ्यापासून खाजगी कामाकरिता कर्ज काढतात व त्यासाठी शेकडा १२ ते ३६ पर्यंत व्याज देतात पुन्हा चक्रव्याढ व्याजाने ती रकम फुगत जाऊन हळू हळू तो शेतकरी सावकाराच्या घशात जातो ही स्थिति देखील आपल्याला अपरिचित नाहीच

शेतीनतर दुसरे महत्त्वाचे उद्योगधदे खनिज पदार्थांसबधी, लोकरीसबधी, हस्तिदत व रगाईसबधी आढळून यतात राजपुतान्यात अरवली वगैरे भागात चागले दाट जगल आहे खरे पण त्यातून इमारती लाकूड तर नाहीच पण दुसरे कोणतेही उत्पन्न होण्यासारखे पदार्थ होत नाहीत जळाऊ लाकडे आणणे हाच काय तो त्याचा उपयोग ह्या बाबीत राजस्थान दुर्दैवी असला तरी कोठेही आढळून न येणारे मिठाचे तलाव तेथे आहेत प्रसिद्ध साबर सरोवर, दीदवान, पचभद्र, पालोडी व लुनी नदीच्या जवळपासचा प्रदेश ही मीठ काढण्याची प्रमुख ठिकाणे होत साबर सरोवर जयपूर व जोधपूर सस्थानाकडून व बाकीची ठिकाणे जोधपूर सस्थानाकडून ब्रिटिश सरकार मक्त्याने आपले स्वाधीन करून घेते कचोर रेवासा येथे एक मिठाचा तलाव असून जयपूर सस्थान तो मक्त्याने ब्रिटिश सरकारला देऊन टाकते. 'दैव देते पण कर्म नेते' ह्याप्रमाणे १११ लाखाच्या वर उत्पन्नाचे मीठ हिंदुस्थान सरकार काढते अफूप्रमाणेच मिठावरही हिंदुस्थान सरकारचे नियत्रण आहे. मात्र बिकानेर, जेसलमीर, जोधपूर व कोटा ह्या सस्थानानी मीठ काढण्याचे हक्क आपल्या स्वाधीन ठेवलेले आहेत बिकानेरमध्ये लुनकरणसारला व जेसलमीरामध्ये कानोड येथे मीठ तयार होते

हे मीठ हलक्या प्रकारचे असते आणि शिवाय ह्या संस्थानाना काही ठराविक टनापेक्षा जास्त मीठ तयार करता येत नाही असे कायद्याचे नियंत्रण आहे जोधपूर व कोटा दरबारला खारी नावाचे मीठ खाणीतून काढण्याची परवानगी आहे पण त्यावरही हिंदुस्थान सरकारचे नियंत्रण आहेच हे खारी नावाचे मीठ उद्योगधंद्याच्या कामास येते

खनिज पदार्थांत लोखंड, कोळसा, चांदी, शिसे, तांबे, उत्तम बांध-कामास लागणारे निरनिराळया प्रकारचे दगड, मुलतानी माती आणि काही रत्ने वगैरे पदार्थांची पैदास होते देशातील दळणवळणाची साधने वाढल्यापासून बराचसा कच्चा माल बाहेर जातो पूर्वीच्या काळी देशातल्या देशात त्याची चीजवस्त होत असल्यामुळे लोक त्या वस्तूवर संतुष्ट असून उद्योगधंदे भरभराटीत असतात अलीकडे मात्र उत्तम व स्वस्त वस्तु बाहेरून येतात व त्यामुळे जुने उद्योगधंदे बसलेले आढळून येतात तरी पण आज-तागायत कसा तरी जीव धरून असलेले उद्योगधंदे म्हणजे मस्लीनचे कापड तयार करणे, सुती कापड रंगविणे व खडी काढणे, गालिचे, शाली, ब्लँकेट वगैरे लोकरीच्या वस्तु करणे, धातूवर रंगीत काम करणे (Enamel-ling), मातीची भांडी व चित्रे करणे, हस्तिदंत, लाख, पितळ, पोलाद, गडद व लाकूड ह्यावर खोदकाम व कलाकौशल्याचे काम करणे, हे होत

ह्यापैकी काही उद्योगधंद्याची माहिती मागे आलेलीच आहे येथे आणखी थोड्या उद्योगधंद्याची माहिती देणे अवश्य वाटत आहे लाखेची किंवा मातीची खेळणी व चित्रे फार सुंदर होतात बिकानेर वगैरे कडे लाखेचे वारनीश करून कातड्याच्या चंबूना लावतात हा कातड्याचा चंबू सुद्धा राजस्थानातील विशेष वस्तु आहे हे तेले वगैरे ठेवण्याच्या कामी येतात पितळी व तांब्याची भांडी तर सर्व देशभर करतात पण विशेषत जयपूरची भांडी नक्षीदार म्हणून प्रसिद्ध आहेत निरनिराळया प्राण्याच्या आकृति, देवाच्या मूर्ति, गंगेचे चंबू वगैरे कामे जी पाहण्यात येतात ती सर्व येथूनच येतात उत्तम नक्षीकाम करून त्यात निरनिराळे रंग भरलेले राजस्थानी लोटे मधून मधून कुणाच्या घरी आढळून येतात पोलादी सामानही बरेच तयार करतात तरवारीचे पाते, सुऱ्या, चाकू, तलवार, सिरोही आणि उदेपूरमध्ये होतात. सिरोहीमध्ये जे सामान तयार होते

त्यावर चादीसोन्याच्या ताराचे काम फारच सुदर केलेले आढळते शिल्प-कलाही अशाच परिणत अवस्थेस पोचलेली विद्या आहे अगदी अलीकडे पूर्वीइतके सुदर खोदकाम होत नाही हे खरे, तरी अलवार, भरतपूर, जयपूर, जेसलमीर आणि जोधपूर वगैरे ठिकाणी दगडी खोदकाम अजूनही फार सुदर झालेले पहावयास मिळते तसेच इटावा किंवा भरतपूर येथील हस्तिदताचे, चदनी लाकडाचे खोदीव काम व त्यावर चादीसोन्याच्या तारानी केलेले नक्षीकाम ह्यामुळे त्या वस्तु किती तरी मोहक वाटतात विलासी व कलाप्रिय लोकाच्या दिवाणखान्यांतून अशा तऱ्हेचे काम पाहावयास मिळते तसेच चादी सोन्याची भाडी व दागिने ह्याही प्रदर्शनीय वस्तु म्हणून ठेवण्याच्या योग्यतेच्या कौशल्यपूर्ण होतात

५. **चालीरीति पेहराव, खाणेपिणे, व्यसनें वगैरे.** हिंदुस्थानात धार्मिक व सामाजिक जीवनाचा निकटचा सबध फार जुन्या काळापासून चालत असल्यामुळे इतका एकजीव होऊन बसला आहे की आमची आज सामाजिक परिस्थिति जरी साफ बदलून गेली असली तरी त्या आमच्या धार्मिक पद्धति मात्र तशाच अथवा त्याच थाटात चालू आहेत 'काप गेले आणि भोके राहिली' असाच काहीसा हा प्रकार आहे आज राजस्थानमध्ये अशी परिस्थिति आहे शौर्य, पराक्रम, तेज, राज्यलक्ष्मी वगैरे सर्व ज्यानी प्रत्यक्ष पाहिले असे लोक आज राजस्थानमध्ये जिवत असणे शक्य आहे तेव्हा त्या वीरतेच्या कालात उत्साहाने आपण ज्या गोष्टी ज्या थाटाने केल्या त्या गोष्टी आज त्या म्हाताऱ्याला अगदी नाममात्र कराव्या लागतात हे पाहून त्यास काय वाटत असावे याची सहज कल्पना करता येणे शक्य नाही असो! निरनिराळे सस्थानिक आजच्या परिस्थितीतही आपआपल्या इतमामाप्रमाणे राहतात ह्यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही जी गोष्ट सस्थानिकाची तीच सरदारापासून तो थेट लहान कारकुनापर्यंत वीरश्रीचे, वैभवाचे व बाणेदारपणाचे स्वरूपच लहानापासून तो मोठ्यापर्यंत सर्वांच्या रहाणीत व चालीरीतीत प्रतिबिबित झालेले आढळून आल्याशिवाय राहत नाही

**अन्न**–बहुतेक सर्व लोकात तीनदा जेवण्याची पद्धत आढळून येते सकाळची न्याहरी ही बहुतेक शिळी भाकरी किंवा ताकात शिजविलेल्या

कण्या यावर होत असते. त्यानतर दुपारी बाराला मुख्य जेवण व सायकाळी सूर्यास्तानतर केव्हाही दुसरे जेवण होत असते ज्वारी, बाजरी, जव, दाळ, नाक, भाज्या ह्याच पदार्थांचा उपयोग लोक फार करतात मासाहार फारसा प्रचारात नाही असे दिसते तरी राजपूत वगैरे लोक बकरा व रानडुकराचे मास खानात बकरीचे किंवा पक्ष्याचे मास रुचीत व पौष्टिकपणात हीन समजले जाने काही हिंदु आपल्या ऐपतीप्रमाणे मासाहारच घेतात तादूळ ही एक तिकडे नव्हाळी आहे त्यामुळे उपयोग केलाच तर श्रीमन किंवा मध्यम वर्गांतील लोक कधी कधी त्याचा उपयोग करतात तसेच साखर, गोडधड किंवा मेवामिठाई ह्याचा उपयोग सणावारीच होतो असे दिसते भिल्ल वगैरे रानटी जातीना तर धान्य वगैरे मिळाले तर ठीकच नाही तर त्याना कोणत्याही प्राण्याचे किंवा पक्ष्याचे मास चालते, त्यामुळे त्याना उपासमारीची केव्हाही भीति नसते दुष्काळाच्या दिवसात सर्वच जातीची अशी स्थिति झालेली ऐतिहासिक माहितीवरून कळते, एवढेच नव्हे तर वाटेल त्या झाडाचा पाला सुद्धा खाऊन लोक राहतात असेही नमूद आहे सर्व जातींची ही दुष्काळाच्या दिवसातील स्थिति असली तरी ह्या रानटी जातीचीनी दररोजची सवयच होऊन बसली आहे

**पोषाख**–अगदी मरदारी थाटाचा पोषाख म्हणजे अचकान नावाचा एक लाब कोटाचा प्रकार, आत अगरखा, डोक्याला व गळ्याभोवती रुमाल आणि खाली चोळणा किंवा धोतर अशा पद्धतीचा असतो पोषाखाच्या बाबतीत हिंदुमुसलमानात फार फरक नाही मुसलमान बहुतेक चोळणाच वापरतात व हिंदूच्या नेहमी काही तरी विरुद्धच पद्धत जणू आचरावयाची की काय म्हणून ते हिंदूच्या उलट बाजूला म्हणजे डाव्या बाजूला आपल्या कोटाच्या गुड्या लावतात सर्वसाधारण लोक धोतर किंवा लुगी, सदरा, वर एक जाकीट, खाद्यावर रुमाल किंवा उपरणे व डोक्यास फेटा अशा पद्धतीचा पोषाख करतात भिल्लाच्या पोशाखाची कल्पना आपल्याकडील तशाच लोकाच्या पोषाखावरून सहज करता येईल यात चूक होण्याची मुळीच भीति नाही येवढी येथे हमी दिली म्हणजे पुरे !

हिंदु स्त्रियाच्या पोषाखाची कल्पना द्यावयाची झाल्यास आपल्याकडील मारवाडणीच्या पोषाखाचेच वर्णन होईल घोळदार लहगा, पोल-

त्र्यासारखी कोपरापर्यंतची चोळी व वरून ओढणी असा तो पोषाख असतो लाख भरून तयार केलेले पुष्कळसे अलकार ऐपतीप्रमाणे जितके अगावर घालता येणे शक्य आहे तेवढे त्या घालतात, हेही आपण येथे पाहतोच मुसलमानी स्त्रिया पायजामे वापरतात अगात मदन्यासारखा लाब बाह्याचा व गुडघ्यापर्यंत लाब असा कुडता घालतात व वरून ओढणी घेतात कुठे कुठे तिलक नावाचा, लहगा व कुडता एकच अशा तऱ्हेचा पोषाख वापरण्यात येतो गरीब भिल्लाच्या बायका मामुली पद्धतीप्रमाणे लुगडेच नेसतात त्याचे विशेष असे की त्याना पायात व हातात पुष्कळ पितळी माठ्या ( पाटल्यासारखा दागिना ) घालण्याचा हव्यास आहे हा काहीसा अनुकरणाचाच प्रकार आहे श्रीमत लोक कोपरापर्यंत सोन्याचे अलकार घालताना आपण पाहतोच हेच पाहून त्या गरीब बाया पितळी माठ्या घालीत असाव्यात असे वाटते

**पडद्याची चाल**-महाराणा राजसिह दुसरा, म्हणजे १७६१ पर्यंत पडद्याची चाल नव्हती म्हटले तरी चालेल निसर्गत स्त्रीच्या विनयाला व कुळाच्या इभ्रतीला शोभेशा स्त्रीपुरुषात मर्यादा पाळल्या जात होत्या व हे आमच्या सस्कृतीचे आम्ही अभिमानाचे वैशिष्टयच समजतो आचार्य, पुरोहित वगैरे वडीलधाऱ्या माणसाना स्त्रियात जाता येता येत असे एवढेच नव्हे तर महाराणीने प्रसगोपात्त राजदरबारात येणे, स्त्रियानी शिकारीला जाणे व कधी कधी तर लढाईवर जाणे वगैरे धाडसाची कामे सुद्धा राजपूत स्त्रिया पुरुषाबरोबर करीत असत पण १७६१ नतर म्हणजे सर्व देशात अदाधुदीची व झोटिगपाच्छाईची स्थिति माजल्यानतर स्त्रियाच्या शीलसरक्षणाकरिता त्याना पडद्यात ठेवण्याची प्रथा पडत गेली एकदा हा लाडग्याच्या भीतीने शेळ्या कोंडण्याचा प्रकार जो सुरू झाला तो आज रूढ होऊन बसला अजूनही जेथे मुसलमानाचे राज्य किंवा विशेषसे वर्चस्व नाही अशा ठिकाणी हिदु स्त्रिया मोकळेपणी देवदर्शनास जातात, उत्सवात व मिरवणुकीत भाग घेतात आणि अगदी साधारण लोकसमाजात तर अलीकडे ही पडद्याची प्रथा जवळ जवळ नामशेषच झालेली आहे

**लग्नसंस्था**-बालविवाह जरी पूर्वी फार प्रचलित असला तरी ती प्रथा अलीकडे मोडली गेली आहे असे म्हणावयास हरकत नाही 'वाल्टरकृत

राजपुत्र हितकारिणी सभे'ने ह्या बाबतीत बरेच श्रेय सपादन केले आहे, हे मागे येऊन गेलेच आहे कर्नल वाल्टर हे १८८८मध्ये राजस्थानची राज्यसूत्रे हलविणारे गव्हर्नर जनरलचे हस्तक होते ह्यानीच ही सभा स्थापन केली राजपूत व चारण ह्या लोकात लग्नप्रसगी होणारा फार खर्च थाबविण्याकरिता व बालविवाह बद करण्याकरिता ही सभा स्थापन झाली सुरवातीस तिच्या कार्याचा प्रचार लोकातून चागला झाला नाही परनु पुढे प्रत्येक सस्थानातून एकएक सभासद घेऊन जोराने प्रचार सुरू झाला त्यानतर १७ वर्षांनी झालेल्या खानेसुमारीवरून असे दिसते की शेकडा १३ लग्नात वयाची अट पाळली गेली व शेकडा ५६ लग्नात खर्चाची योग्य काटकसर करण्यात आली ह्या सभेमुळे लग्नात व मरणोत्तर कार्यांत जो अनाठाई खर्च करून लोक कफल्लक होण्याच्या मार्गास लागत ते थाबले आहे ह्या सभेने लग्नाचे वेळी मुलाचे वय कमीत कमी १८ व मुलीचे वय कमीत कमी १४ असावे असे ठरविले आहे ह्या नियमाचा इष्ट तो परिणाम लोकावर झालेला आज दृष्टोत्पत्तीस येत आहे

श्रीमत लोक किवा भिल्ल जर सोडले तर बहुतेक एकपत्नीत्वाची चाल आढळून येते एक बायको जिवत असता सहसा कोणी दुसरी बायको करीत नाही श्रीमत लोक मात्र अनेक पत्न्या व उपपत्न्या करतात व हे त्याच्या मोठेपणाचे एक लक्षण समजले जाते राजपूत लोकात कुलशीलाचा फार विचार करतात असे दिसते आपल्या योग्यतेची किवा आपल्यापेक्षा जास्त योग्यतेची वधू वरपक्ष नेहमी शोधीत असतो (Isogamy and hypergamy) मुलीचे लग्न प्रत्यक्ष वर-मुलाशी न लावता कटयारीशी लावण्याची एक विशेष पद्धत ह्यांच्यात आहे ही कटयार लग्नप्रसगात सदैव वराच्या हाती किंवा कमरेस असावी लागते. लग्नप्रसगातून गाणी म्हणण्याच्या वगैरे ज्या आणखी चालीरीती आहेत त्या सर्वांचा उल्लेख येथे करणे शक्य नाही राजपुतात आणखी ज्या विवाहपद्धति आहेत त्यांचे दिग्दर्शन मागे त्या जातीसबधाने लिहिताना आलेच आहे

खालच्या जातीतून पाटाची चाल आढळून येते पण ज्यास आपण आज पुर्नविवाह म्हणतो तो प्रकार मात्र कोठे आढळून येत नाही ब्राह्मण राजपूत, खत्री, चारण, कायस्थ व काही महाजन ह्यात विधवाविवाह

निषिद्ध मानला जातो ज्या जातीमधून अशीं लग्ने होतात त्यास धार्मिक स्वरूप मुळीच नसते त्याला उपाध्याची गरज नसते वराने वधूला वस्त्र-प्रावरणे देऊन आपल्या घरी न्यावे की झाला विवाह अशा विवाहानतर मयत पतीच्या मालमत्तेवरचा तिचा हक्क उड्न जातो मयत पतीपासून झालेली सतति असल्यास तिच्या सरक्षणाचा बोजा मयताच्या कुटुबातील माणसावर पडतो भिल्लात तर अशी एक चाल आहे की वडील भावाच्या विधवेने त्याच्या धाकट्या भावाबरोबर लग्न केलेच पाहिजे जर तिने अन्य पुरुषाशी विवाह केला तर तो त्या गहस्थाचा मोठा अपमान होतो व त्याचा मोबदला त्याला त्या नव्या नवऱ्याकडून यथेच्छ मिळाल्याशिवाय हा गब्रू चूप बसत नाही सती, पूजाअर्चा, उपासना वगैरे चालीरीतीसबधी माहिती मुख्य पुस्तकात आलेलीच आहे तेव्हा आता आणखी एकदोन किरकोळ गोष्टीचा येथे उल्लेख करून पुढे जाऊ

**अंत्यविधि**—हिंदु प्रेतास अग्नि देतात अगदी लहान म्हणजे दात न आलेल्या मुलाना मात्र पुरतात सन्याशी, गोसावी किंवा नाथसप्रदायी कानफाटे ह्याना मातीच देण्याची पद्धत आहे चाभार, कोळी व रंगार लोकात सुद्धा माती देण्याची पद्धत आहे, कारण त्याची अग्नि देण्याइतकी ऐपत नसते भिल्लात मात्र अगदी अपवाद खेरीज करून अग्नि देण्याचीच प्रथा आहे त्याच्यात एक मजेदार पद्धत अशी आहे की मातेच्या साथीने जो माणूस पहिल्याने मरेल त्यास ते गाडून टाकतात व काही ठराविक दिवसात जर दुसरा कोणीही इसम दगावला नाही तर मात्र त्या प्रेतास उकरून काढून अग्नि देतात तेवढ्या ठराविक दिवसात जर का कोणी त्या मयताच्या दुर्दैवाने मेला तर मात्र बिचाऱ्यास मातीत सडत कुजतच स्वर्गास जावे लागते

**जादूटोणा**—काही ठिकाणी अजूनही जादूटोण्याचे प्रस्थ फार असल्याचे आढळून येते अशा तऱ्हेच्या खोडसाळ विद्या अवगत असलेल्या व्यक्ति आज हिंदुस्थानात आहेत ह्यात शका नाही अगदी परवाच वऱ्हाड मध्यप्राताच्या सरहद्दीवरील एका लहान गावात अशा तऱ्हेच्या मांत्रिकाचा खून झाल्याचा खटला उमरावतीला कोर्टात चालू आहे त्या मांत्रिकाच्या त्रासाला कटाळून कोणी त्याचा खून केला, अशी वदता

आहे असो भूतप्रेतबाधा व त्यावर विश्वास बहुतेक स्त्रियातून फार आढळून येतो घरातील कोणी आजारी झाल्यास अगोदर अशा तऱ्हेचे इलाज केले जातात अर्थात अलीकडे त्यावरचा विश्वास हळूहळू कमी होऊ लागला आहे हा भाग वेगळा.

**व्यसनें**—राजपुतान्यात अफूचे व्यसन असणे साहजिकच आहे, कारण तेथे अफू फार होते दुसरे व्यसन दारूचे आढळून येते दु खात सुख येवढेच की विलायती दारू मुळीच प्रचारात नाही म्हटले तरी चालेल देशातच मोह, काकवी किवा अशाच अन्हेच्या पदार्थापासून दारू तयार करतात व ती फार खपते ह्यानतर गाजा, भाग, चरस, तबाखू, कुमुबा ह्याचाही शौक आढळून येतो पण ह्या सर्व व्यसनात अफू व तबाखू, ह्या दोन व्यसनानी पछाडलेली बरीच मडळी दिसून येईल तबाखू आणि गुडाखू ओढण्याचाही प्रघात फार आहे आपल्याकडे आलेल्या इष्टमित्रास जसे आपण शिष्टाचार म्हणून चहाचा पेला पुढे करतो तसेच राजस्थान मध्ये जर आपण गेलो तर चहाच्या पेल्याऐवजी तबाखूची चिलीम अथवा गुडगुडीच पुढे येण्याचा सभव फार

**यात्रा**-शेवटी त्याच्या भाविकपणाचे निदर्शक म्हणून त्याच्या पवित्र क्षेत्राचा उल्लेख करावासा वाटतो आश्विन कार्तिकाच्या अदाजात पुष्करला मोठी यात्रा जमते तेथे एक तलाव आहे ह्या तलावात स्नान केल्यास जन्मजन्मातरीची पापे धुवून जाऊन स्वर्गसुखे प्राप्त होतात अशी धार्मिक समजूत आहे तेथेच एक ब्रह्मदेवाचे व ह्याशिवाय सावित्री, बद्रीनारायण, वराह व शिव अशी चार देवळे आहेत ह्या गावच्या शिवेत कोणत्याही प्राण्याचा प्राण घेता येत नाही यात्रेच्या वेळी गुराचा फार मोठा बाजार भरतो राजपुताची प्रसिद्ध उपास्य देवता 'श्री एकलिगजी' याचे मदिर उदेपूरपासून उत्तरेस १२ मैलावर आहे हे मदिर ८ व्या शतकात बाप्पा रावळाने बाधले असावे येथे चार तोडाची काळ्या सगमरवरी दगडाची केलेली शिवाची मूर्ति आहे जवळच नागदा नावाचे इतिहासप्रसिद्ध स्थळ आहे येथे विष्णूची मूर्ति आहे खोदकाम व एकदर देवळाची आरास प्रेक्षणीय आहे तेथेच जैनाची 'अद्भबुधजी' ची मूर्ति भव्यपणामुळे प्रसिद्ध आहे. अलवार सस्थानात राजगडला नीलकठ महादेवाचे एक प्रसिद्ध मदिर

असून तेथे मोठी यात्रा जमते. जयपूरमध्ये अबरला एक शीलादेवीचे पुरातन मंदिर आहे तेथे पूर्वी दररोज नरबलि दिला जात असे असे म्हणतात पण अलीकडे बकराच बळी देतात. तसेच रामगड तलावावर जुमदा देवीचे मंदिर आहे तेथे जाऊन काही धार्मिक विधि केल्याशिवाय राजाला राज्याभिषेक होऊ शकत नाही अशी जयपूर दरबारी चाल आहे उदेपुरात राजसमुद्रावर एक द्वारकाधीशाचे मंदिर आहे औरंगजेबाच्या छळाला भिऊन वल्लभाचार्यांचे वंशज आपली श्रीकृष्णाची मूर्ति घेऊन मथुरेहून पळाले ते १६६९ मध्ये राजपुतान्यात आले तेव्हा त्यानी आपल्याबरोबर आणलेली मूर्ति व ह्या देवळातील मूर्ति एकच असा समज आहे

तिलवार,पर्वतसार वगैरे ठिकाणीही मोठमोठ्या यात्रा जमतात बरेच लोक व्यापारानिमित्त किंवा दर्शनानिमित्त एके ठिकाणी येतात अशाप्रसंगी विशेषत गुराचा बाजार फार मोठा भरतो व चांगली खरेदी विक्री होते राजस्थानमध्ये ह्याशिवाय शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने शोभतील अशी किती तरी देवालये व तलाव, यात्रेच्या व सौंदर्याच्या दृष्टीने उल्लेखनीय आहेत पण प्रस्तुत त्या शिल्पकलेच्या सौंदर्याकडे दुर्लक्ष करून धार्मिक दृष्टीने महत्त्वाची अशी काही ठिकाणे, जेवढी शक्य होते तेवढ्याचा उल्लेख केला आहे

६. **शिक्षण–लोकभाषा–लोककथा व लोकगीतें** आमच्याकडे शिक्षण नव्हते असे जे आंग्लभाषाभिमानी म्हणत असतील ते म्हणोत. आणि त्यांचे म्हणणेही एका अर्थाने खरेच आहे. ते आज ज्यास शिक्षण म्हणतात त्या तऱ्हेचे पुस्तकी शिक्षण आमच्याकडे खास नव्हते आमच्याकडे मुलामुलींना जे शिक्षण दिले जात असे ते हे शिक्षण नसून सुशिक्षण होते मुलगा किंवा मुलगी आईबापाच्या हाताखाली निरनिराळ्या विषयाचे प्रत्यक्ष व सप्रयोग ज्ञान संपादन करीत असत व म्हणूनच १५–२० वर्षांइतक्या अल्पवयात देखील अनेक बालवीरानी ह्या भरतखंडाच्या रणभूमीवर अतुल पराक्रम गाजवून दाखविला, मुत्सद्देगिरी करून दाखविली व अनेकदा राज्यसूत्रे हाती घेउन संबध हिंदुस्थान कळसूत्री बाहुलीप्रमाणे नाचवून दाखविले पण त्या जुन्या आठवणी येथे कशाला ?

राजस्थानात प्रचलित शिक्षणपद्धति सुरू होउन आज पाउणशे वर्षे तरी होउन गेली येवढ्या अवधीत संस्थानिकाकडून व इंग्रज सरकार

कडून साक्षरता वाढविण्याचे यशस्वी प्रयत्न अनेक करण्यात आले व त्याचे मूर्त फलही आपल्या डोळ्यासमोर आहे प्राथमिक व दुय्यम शिक्षण म्हणजे अ, आपासून तो मॅट्रिकपर्यंत शिक्षण देणाऱ्या पुष्कळ सस्था आहेत व लोक त्याचा उपयोग करून घेतात जयपूर व जोधपूर येथे दोन महाविद्यालयेही आहेत येथून विद्यार्थी आग्रा विद्यापीठाच्या एम् ए पर्यंतच्या परीक्षेचे शिक्षण घेतात पजाब विद्यापीठाचे, जयपूरमध्ये, प्राच्यविद्याचे महाविद्यालय केले गेले आहे ह्यातून सस्कृत, तसेच फारसी किवा आरबी ह्या भाषाचे पडित होण्याची व्यवस्था केली आहे. ह्याशिवाय एक कलाभुवन जयपूरला १८६८ साली उघडण्यात आले ह्या कलाभुवनात बरेच विद्यार्थी शिक्षण घेतात असे खानेसुमारीच्या अहवालावरून दिसते तसेच तेथे एक नार्मल स्कूलही आहे चित्रकला, गालिचे, जमिनीची पाहणीमोजणी, तारमास्तराचे काम इत्यादि कामे शिकविण्याकरिताही स्वतत्र सस्था आहेत. तेव्हा आजच्या काळात अवश्य असणारी बहुतेक सर्व प्रकारची शिक्षणसामग्री व सस्था राजस्थानमध्ये उपलब्ध आहेत असे ह्यावरून दिसून येईल

जुन्या काळी राजेलोक आपल्या मुलामुलीना शिकविण्याकरिता घरीच पडित ठेवीत व सर्वसाधारण लोकाकरिता पाठशाळा असत राजपूत लोकाना आपल्या तरवारीचे वेड फार असल्यामुळे शिक्षणावर त्याचा विश्वास बसावयास फार वेळ लागला त्यामुळे शाळातून शिकून विश्वविद्यालयाच्या उच्च पदवीपर्यंत ज्याची मजल गेली आहे असे पदवीधर आजही राजस्थानात क्वचितच सापडतात थोडीबहुत का होईना, पडद्याची चाल असल्यामुळे स्त्रीशिक्षणाची मजलही फार दूरवर जाणे शक्य नाही हे उघडच आहे पूर्वी घरीच मुलीना धार्मिक ग्रथ वगैरे वाचावयास शिकवीत. अलीकडे ज्या शाळा निघाल्या आहेत त्यात लिहिणे, वाचणे गणित व विणकाम इत्यादि विषय शिकवितात असे आढळून येते

**लोकभाषा**—शेकडा ७२ लोकाची भाषा राजस्थानी आहे ह्या भाषेच्या १६ बोली आहेत त्याचे साधारणपणे चार प्रातीय विभाग पडतात. ते असे मारवाडी, जयपुरी, मेवाडी व मालवी ह्यात मारवाडीच महत्त्वाची भाषा आहे सुमारे ४५ लक्ष लोकाकडन ती बोलली जाते ती

सर्व पश्चिम राजस्थानची लोकभाषा असून लक्षावधि लोकाच्या तोंडी आहे ही भाषा बोलणारे लोक हिंदुस्थानभर इतस्तत विखुरलेले आढळतात ह्या भाषेच्या निरनिराळ्या चार बोली असून त्यापैकी 'थाली' नावाची रेताड प्रदेशात प्रचलित आहे 'मेवाडी' ही उदेपूर सस्थानात, बिकानेरच्या काही भागात 'बागरी' आणि जयपूर सस्थानच्या वायव्येकडील भागात 'शखावती' भाषा बोलतात जयपुरी भाषा राजस्थानचा पूर्वभाग व पूर्वदक्षिणेच्या साध्यावरच्या भागास बोलली जाते ही सुमारे २२ लक्ष लोकाच्या तोंडी आहे जयपुरी भाषेची 'हारावती' नावाची एक प्रमुख उपभाषा आहे 'मेवाती' भाषा राजस्थानीचा प्रकार खरा पण तो पश्चिम हिंदी या भाषेशी अगदी जवळचा वाटतो ही अगदी उत्तरेकडील अलवार व भरतपूर या सस्थानात प्रचलित असून तिकडील ब्रजभाषेशी ती हळू हळू एकरूप होऊन जाते ही भाषा बहुतेक अलवार व भरतपूरमध्ये राहणाऱ्या मिऊ लोकाच्या तोंडी आढळून येते 'मालवी' भाषा झाल्वाड, कोटा, प्रतापगड या अगदी पूर्वेकडच्या माळवा प्रातास लागून असलेल्या भागात अगदी शुद्ध स्वरूपात प्रचलित आहे इचे मारवाडीशी समिश्रण होऊन एक भाषा होते तिला 'रागडी' असे म्हणतात ती राजपुताच्या तोंडी असल्याचे दिसते ह्याशिवाय पश्चिम-हिंदी, ब्रजभाषा व उर्दू उर्फ हिंदुस्थानी अशा तीन भाषा सर्व राजस्थानभर सामान्यत्वेकरून प्रचलित असल्याचे दिसते ह्याव्यतिरिक्त गुजराथीवरून निघालेल्या पण राजस्थानी भाषेचा तोंडवळा घेऊन बसलेल्या किती तरी बोली भिल्लाच्या तोंडी आहेत त्या सर्वांचा उल्लेख व पहाणी करणे अत्यत दीर्घकालाचे काम आहे

**लोककथा व लोकगीतें**—राजपूत लोक अतिशय उत्कट भावनाचे असल्यामुळे आणि आपल्या सस्कृतीस पोषक अशा उदात्त भावनाचे शिक्षण आणि सवर्धन मोठ्या कसोशीने करण्यावर त्याचा मोठा कटाक्ष असल्याने त्याच्या वाङमयात एक प्रकारची ओजस्विता आणि माधुरी उत्पन्न झाली आहे त्याच्या लोकगीतातून त्याच्या सस्कृतीचे प्रतिबिंब मोठ्या सुदरतेने आढळून येते महाराष्ट्रातील मासिकातून मधून मधून त्याचे मासले प्रसिद्ध झाले आहेत, ते वाचण्याजोगे आहेत घरी बसणाऱ्या नवऱ्यास दूरदेशी

जाऊन पराक्रम करण्यास प्रोत्साहन देणारी आणि त्याच्या चिंतनात गढून तयार केलेल्या सुताचा पोषाख त्याच्या अंगावर चढवून त्याला डोळे भरून पहाण्याची हौस धरणारी वीररमणी कोणाच्या अंतःकरणास चटका लावणार नाही? छोट्या भावजयीने काढलेले गोपालकृष्णाचे चित्र पाहून वेडावलेल्या दिराने पतीचा खून केला असता त्याच्यावर न रागावता त्याची कीव करून शांतपणे त्याला पतीच्या प्रेताचा पत्ता विचारणारी आणि त्याने तो न सांगितला असता आपल्या पावित्र्याच्या जोरावर हातावर पदर चोळून उत्पन्न केलेल्या अग्नीने स्वतःस पाहता पाहता जाळून भस्म करून घेणारी सती पाहून कोणाचे अंतःकरण सर्व प्रकारचे अभिमान सोडून तिच्या चरणी लीन होणार नाही? राजपुताच्या लोकगीताचे विषय हे असे आहेत. मनुष्याचे अंतःकरणच मेले असेल तर गोष्ट वेगळी, परंतु ज्या कोणाच्या म्हणून अंतःकरणात थोडा तरी जीव आहे त्याच्यात पराक्रमाची, शूरत्वाची आणि उदात्तपणाची स्फूर्ति ही लोकगीते ऐकून भरल्याशिवाय राहणार नाही. असल्या लोकगीतांनी राजपुताची पराक्रम-ज्योत शतकानुशतके देदीप्यमानपणे तेवत ठेवली ह्यात नवल काय?

त्यातून राजपुताच्या संस्कृतीचा मुख्य गुण जो "रघुकुलरित चली आई। प्राण जाई पर वचन न जाई॥" अशी वचननिष्ठा, तिचे बाळकडू लहान मुलास सहजासहजी मिळत असे. भारतीय क्षत्रियाची धारणाच अशी असे की सर्व प्रकारच्या धर्म्य सुखोपभोगात बेहोषपणे निमग्न होऊन जावयाचे परंतु अधर्माचा वास त्यास येतो असा नुसता संशय त्यास आला तरी सापावर पाय पडल्याप्रमाणे दचकून मागे सरावयाचे आणि विषयोपभोगाच्या ऐन रंगातही दुदुंभिरव कानी पडला म्हणजे विनायक कवींनी आपल्या 'जोहार' ह्या स्फूर्तिदायक कवितेत म्हटल्याप्रमाणे चटकन तटका तोडून मरणास तयार व्हावयाचे. हाच विशेष क्षत्रियाच्या राजपूत वंशजात पूर्णपणे उतरला होता. आणि त्याची पुटे अंतःकरणावर दृढ चढतील अशाच त्याच्या लोककथाही आहेत.

समाप्त

# सूची

# کتب خانہ

## جامعہ عثمانیہ

۱- اراکین مجلس اعلیٰ، مجلس رفقا، مجلس انتظامی، صدور شعبہ جات و نصاب پانچ کتابیں ایک ماہ تک اپنے پاس رکھ سکیں گے۔

۲- اساتذہ جامعہ عثمانیہ و کلیہ جات ملحقہ و گزیٹڈ عہدہ داران جامعہ اور اراکین دارالترجمہ دس کتابیں ایک ماہ تک اپنے پاس رکھ سکیں گے۔

۳- طلبا میں رجسٹر شدہ دو کتابیں بی۔اے اور انٹرمیڈیٹ کے طلبہ تین کتابیں ایم۔اے، ایل ایل بی و تحقیقاتی جماعتوں کے طلبہ پانچ کتابیں دو ہفتہ تک اپنے پاس رکھ سکیں گے۔

۴- مدت مقررہ پر کتابیں واپس نہ ہوں تو طلبہ سے بحساب ایک آنہ یومیہ فی کتاب وصول کیا جائیگا۔

۵- بشرط موقع کتابیں مکرر جاری کی جا سکینگی مگر اس غرض کے لئے کتب خانہ میں کتاب کا لانا لازم ہے۔

۶- کتابیں گم یا خراب ہو جائیں تو مستعیر پر ذمہ داری عائد ہوگی۔

۷- کتابوں پر کسی قسم کا نشان سیاہی یا پنسل سے نہ لگایا جائے۔

۸- قلمی نسخے اور حوالے کی کتابیں جاری نہ کی جا سکینگی۔